# अधिकार-योग.

अथवा

## नानास राज्याधिकार मिळाल्याचा इतिहास.

# अधिकार-योग.

अथवा

नानास राज्याधिकार मिळाल्याचा इतिहास.

कर्ते

## वासुदेव वामनशास्त्री खरे.

पुणें येथें

आर्यभूषण छापखान्यांत हरि नारायण गोखले यांनीं छापिलें.

प्रकाशक.

महाराष्ट्र बुकडीपोचे मालक मुरलीधर मल्हार अबे.



शके १८२९ सन १९०८.

किंमत दहा आणे.

हें पुस्तक

श्रीमंत राजश्री सर गंगाधरराव बाळासाहेब के. सी. आय्. ई.

मिरज संस्थानाचे अधिपति

यांस

स्वामिभक्तिपूर्वक

अर्पण केलें असे.

पुस्तककार.

# प्रस्तावना.

प्रस्तुतचें पुस्तक तयार होण्यास मूळ कारण वेळास येथील नाना फडनविसांचा वार्षिक उत्सव होय. नानांच्या पूर्वजांचें मूळ वतनी गांव रत्नागिरी जिल्ह्यांत बाणकोटाजवळ वेळास हें आहे व या गोष्टीचा तेथील रहिवासी लोकांस मोठा अभिमान वाटतो. ह्या अभिमानाचा उत्तम परिणाम असा झाला आहे कीं, गेलीं आठ वर्षे तेथील कित्येक सद्‌गृहस्थ मोठ्या हौसेनें व आस्थेनें नानांचा वार्षिक उत्सव तेथें करीत असतात व त्या समारंभांत मराठी इतिहासाची चर्चा होत असते. गतवर्षींच्या चर्चेकरितां उत्सव-संपादकांच्या सांगण्यावरून आह्मीं " नानास राज्याधिकार कसा मिळाला ? " या विषयावर तेथें एक निबंध वाचिला होता व त्यांतलेच उतारे केसरी व ज्ञानप्रकाश या पत्रांत त्या वेळीं प्रसिद्ध झाले होते. तो निबंध पुष्कळ लोकांस आवडल्याचें दिसून आल्यावरून त्यांतच अधिक तपशीलवार माहितीची भर घालून व कित्येक नवीन प्रकरणें लिहून हें पुस्तक तयार केलें आहे.

पटवर्धन सरदारांचीं जुनीं दप्तरें तपासण्याचा आह्मांस लाभ झाल्यापासून नानांच्या कारकीर्दीतल्या प्रत्येक मोहिमेची प्रमाणभूत भरपूर माहिती यद्यपि आम्हांस मिळाली आहे, तथापि तिचा समावेश प्रस्तुत पुस्तकांत सविस्तर करतां येणें शक्य नाहीं. कारण कीं, हें पुस्तक कांहीं " नाना फडनवीस यांच्या कारकीर्दीचा इतिहास " नव्हे अगर " नाना फडनवीस यांचें चरित्र"ही नव्हे. मुख्य राज्याधिकार मिळेपर्यंत नानानीं जीं कारस्थानें केलीं, तेवढ्यांचें मात्र या पुस्तकांत वर्णन येणार. नानांचे हे पराक्रम मंत्रसभेमधले असून ते बुद्धिवैभवाचे, वक्तृत्वाचे व कमलबहादुरीचे आहेत. समरांगणांतली अंगमेहनत, कौशल्य व तरवारबहादुरी यांचें या पुस्तकांत प्राधान्य नाहीं ! तथापि कारस्थानें नीट समजावीं ह्मणून तितक्या बेतापुरता प्रत्येक मोहिमेचा आह्मीं तपशील दिलाच आहे. एकदोन ठिकाणीं अधिक विस्तारपूर्वक वर्णन केलें आहे तें हौशी वाचकांनीं त्या त्या प्रसंगासंबंधें इंग्रज इतिहासकारांनीं लिहिलेल्या मजकुराशीं ताडून पहावें ह्मणून दिलें आहे.

एकेरी अथवा दुहेरी अवतरण चिन्हांत दिलेला मजकूर त्या त्या काळच्या अस्सल पत्र-व्यवहारांतून घेतलेला आहे. हरिवंशाच्या बखरींतून जेथें उतारे घेतले आहेत तेथें त्या बखरींचा निर्देश केलाच आहे. कंसांतला मजकूर अर्थाच्या स्पष्टीकरणार्थ आम्हीं पदरचा घातला आहे. मूळ पत्र-व्यवहारांत हिंदु शक, महिना व तिथि अगर मुसलमानी सन, महिना व तारीख आहे; परंतु या पुस्तकांत आम्हीं इंग्रजी कालमानाची पद्धत स्वीकारिली असल्यामुळे हिंदु व मुसलमानी कालमान बदलून त्यांच्या इंग्रजी तारखा, महिने व सन जंत्रींतून पाहून घातले आहेत.

मिरज, ता० २० मार्च
सन १९०८.

वासुदेव वामनशास्त्री खरे.

# अधिकार-योग.

## प्रकरण पहिलें.

### माधवरावसाहेबांची [illegible]कीर्द.

इ० स० १७६१ पासून [illegible] इ० [illegible] पर्यंतचा काल हा मराठी साम्राज्याचा ऱ्हास[illegible] होय. राष्ट्राला उतरती कळा लागली [illegible] प्रमुख राजकीय पुरुषांत [illegible], [illegible], स्वार्थसाधनाची हांव, बेइमानी, आळस, अभि[illegible]-शून्यता इत्यादि नाना दुर्गुण दृष्टीस पडूं लागतात; तसे ते वर निर्दिष्ट केलेल्या [illegible] प्रमुख लोकांत पदोपदीं दिसून येत होते. अशी स्थिति झाली ह्मणजे राष्ट्र रसातळास जाण्यास उशीर लागत नाहीं. परंतु याच काळांत नाना फडनवीस यांच्या हातीं राज्याधिकार गेल्यामुळें त्यांच्या एकनिष्ठेच्या व करामतीच्या जोरावर मराठी राज्याचा कांहीं कालपर्यंत बचाव झाला. ' [illegible] ' बद्दल नानांच्या कीर्तीचे पोवाडे आमचेच लोक गात आहेत असें नाहीं, तर परकीय लोक सुद्धां प्रांजलपणानें त्यांची आजपर्यंत वाहवा करीत आले आहेत. अशी ही उज्ज्वल कीर्ति ज्याच्यायोगानें नानास संपादितां आली, तो राज्याधिकार पूर्णपणें त्यांच्या हातीं येईपर्यंत त्यांस किती कष्ट व मेहनत पडली, कशीं जिवावरचीं संकटें आलीं, त्यांच्या अंगीं असलेले अनेक सद्गुण कसोटीस लागण्याचे कसे वारंवार प्रसंग येत गेले, या सर्व गोष्टींचें विवेचन—म्हणजे नानांच्या राजकीय चरित्राच्या पूर्वार्धाचें विवेचन—प्रस्तुत पुस्तकांत करण्याचें योजिलें आहे.

नाना फडनवीस यांचा राज्यकारभारांत प्रवेश त्यांच्याच म्हणण्याप्रमाणें माधवराव बल्लाळ पेशवे यांच्या कारकीर्दीपासून झाला. त्यापूर्वीं ते श्रीरंगपट्टणच्या व पानपतच्या स्वारीस गेले होते हें खरें, तथापि पट्टणच्या स्वारींत वय लहान असल्यामुळें ते फक्त फडनविशीचे दरकदार या नात्यानें

सन १७६१.

हजर होते. कामाचा बोजा अर्थातच त्यांजवर नव्हता. पानपतचे स्वारींतही तोच प्रकार असून शिवाय नानांचा देश पहाण्याचा व तीर्थयात्रा करण्याचा आणखी एक हेतु होता. तथापि ह्या काळीं म्हणजे राज्यकारभारांत शिरण्यापूर्वी त्यांच्या भावि थोरपणास उचित असे सद्गुण व प्रौढ विचार तितक्या लहान वयांत सुद्धां त्यांच्या अंगीं वसत होते, असें त्यांच्या लेखांवरून दिसून येतें. पानपत झाल्यावर चोहोंकडे पळापळ झाली; तींत लाखों लोक मारले गेले व लष्कराबरोबर बायकापोरें होतीं तीं गिलच्यांनीं धरून नेलीं. ह्या गर्दीत नानांची आई नाहींशी झाली. तिचा त्यांनीं पुष्कळ शोध केला, तरी तिचा थांग लागला नाहीं. ती बहुधा मारिली गेली असावी व ती आतां जिवंत सांपडणें अशक्य आहे असाच त्यांचा ग्रह झाला होता. अशा स्थितींत असतां आपली आई अबदालीच्या लष्करांत कैदेत आहे अशी अफवा त्यांच्या कानीं पडल्यावरून त्यांनीं सिरोंज ( प्रांत माळवा ) येथून पेशव्यांचे वकील दामोदरराव हिंगणे दिल्लीस होते त्यांस एक पत्र लिहिलें आहे. त्यांत ते लिहितात कीं, " तीर्थरूप मातोश्रीची खबर अबदालीचे लष्करांत आहे म्हणून लागली आहे. आपण त्यांचे लष्करांत गेले असले तर फारच उत्तम झालें. नसले गेले तर जाऊन शोध करावा. आम्ही द्रव्याचे संग्रही किती आहों हें तुम्हांस ठाऊकच आहे. तुम्ही ज्याप्रमाणें गृहस्थपण व भलेपण मिळविलेंत, पैक्यावर नजर न दिलीत, त्याप्रमाणेंच आमचे वडिलांनीं व आम्हीही भलेपण मिळवीतच गेलों. मोठ्या घराचा पोकळवासा याप्रमाणें आब आहे ! याकरितां माझ्या शक्तीप्रमाणें जें द्यावयास पडेल तें देऊं करून–निदान माझें सर्वस्व देऊं करून–त्यांची मुक्तता होय हेंच करावें. हें काम झालियानें करोडों कामें केलींशीं होतील. मुक्त जाहलियावर जातीविशीं शोध पुरता करावा. जर यथास्थितच प्रकार आहे तर देशास पाठवावी. नाहीं तर प्रयागास ( गंगेंत देहत्याग करण्यासाठीं ) परभारेंच रवानगी करावी. जर शुद्धच आहेत आणि त्यांचा आग्रह यात्रेस जावयाचा असला तरी त्यांस पाठवावी. मनांत गोष्टी सोडविण्याच्या फारच येतात त्या किती लिहाव्या ! कदाचित् ब्राह्मण्यास आंचवली असली, तथापि सर्वस्व खर्च करून प्रयागास पाठवून द्यावी ह्मणजे पुत्रधर्माचें सार्थक ! "

आईची मुलाशीं कायमची तुटातूट होणें, तीही अशा घोर प्रसंगामुळें होणें, यासारखी हृदयद्रावक गोष्ट संसारांत कोणचीच नाहीं ! त्यांतून नानांसारख्या निस्सीम मातृभक्तास ती परम दु:सह झाली असेल. तथापि अशा प्रसंगीं ते स्वधर्माच्या कर्तव्यास पराङ्मुख झाले नाहींत ! मातोश्री शुद्ध असो वा नसो, सर्वस्व भरीस घालून तिची मुक्तता करावी, यांतच तिच्या पोटीं जन्म घेतल्याचें सार्थक्य, याप्रमाणें जरी त्यांचा संकल्प दृढ होता, तरी पण ती भ्रष्ट झाली असल्यास तिनें गंगेंत देह टाकावा हेंच विहित होय, तिचें आपणास दर्शनही नको, असाही त्यांचा निर्धार होता ! पुढें दक्षिणेंत आल्यावर आपली आई मरण पावल्याची त्यांस खात्रीलायक बातमी कळल्यावर तिच्या उत्तरकार्याकरितां ते टोंकें येथें गेले. तेथून त्यांनीं या मजकुराचें पत्र हिंगणे यांस लिहिलें आहे. त्यांतच आणखी मजकूर लिहिला आहे कीं, आमचे महादेवाची तसबीर [ दिल्लीस ] लाला बाळ गोविंद यांजपाशीं आहे ती जरूर आणून राजश्री त्रिंबक शिवदेव यांजपाशीं देववावी म्हणजे आम्हास पावेल. ही गोष्ट जरूर जाणून करावी. महादेवाचें चित्र आधीं पाठवावें. " आपली रोजचें ध्यान करण्याची महादेवाची तसबीर टोंक्याहून पांचशें कोसांवर एका माणसाजवळ राहिली होती ती पाठवून देण्याविषयीं निकडीनें व आग्रहानें नाना फडनवीस या पत्रांत लिहीत आहेत ! यावरून त्यांची ईश्वर–निष्ठा उत्तम रीतीनें व्यक्त होत आहे. वाचकांनीं ध्यानांत धरावें कीं, हें सारें लिहिणें ज्याच्या वयास बीस वर्षें पुरतीं झालीं नाहींत अशा मुलाचें आहे ! कारण हीं पत्रें लिहिण्याच्या वेळीं नानांचें वय इतकेंच होतें.

माधवराव बल्लाळ यांस पेशवाईचीं वस्त्रें मिळाल्यावर ते अल्पवयी असल्यामुळें त्यांच्या राज्याचा कारभार रघुनाथराव दादासाहेब व त्यांचे दिवाण सखारामबापू पाहूं लागले; परंतु ही गोष्ट पेशव्यांची आई गोपिकाबाई हीस आवडेनाशी झाली. राज्याचा सर्व कारभार आपणच आटोपून माझ्या मुलास हे दोघे भिकेस लावितील हें तिला भय होतें. आपण केलेला कारभार बाईस पसंत पडत नाहींसें पाहून दादासाहेब व सखारामबापू रागानें राजीनामे देऊन घरीं बसले. तिनें आपलीं आर्जवें करून आपणास पुन: कामावर बोलावावें अशी त्यांची अपेक्षा होती. पण तसें कांहीं न घडतां तिनें

नाना फडनवीस यांचे चुलते बाबूराव फडनवीस व त्रिंबकराव मामा पेठे यांस कारभारी नेमिलें. ह्यामुळें फडनवीस ह्यांच्या घराण्याशीं दादासाहेब व सखारामबापू यांचा विरोध उत्पन्न झाला. बाबूराव यांची दिवाणगिरी फार दिवस टिकली नाहीं. पेशवे व त्यांची आई ह्यांच्या पक्षाचा पाडाव करण्यासाठीं दादासाहेबांनीं मोगलांची कुमक मिळविली व घोडनदीवर पेशव्यांचा पराजय करून त्यांस नजर कैदेंत ठेविलें व त्यांच्या पक्षाचे रास्ते, पटवर्धन वगैरे सरदार होते त्यांची दाणादाण करून राज्याचा सर्व कारभार पुनः आपल्या हातीं घेतला. ह्यानंतर आपल्या बाजूस बळकटी आणण्याकरितां व प्रतिपक्षास बळहीन करण्याकरितां दादासाहेबांनीं ज्या उलाढाली केल्या, त्यांत त्यांनीं आज तीन पिढ्या भानूंच्या घराण्याकडे चालत आलेली फडनविशी त्यांजकडून काढून चिंतो विठ्ठल रायरीकर यांस दिली. या वेळीं दादासाहेबांचा नाना फडनविसांवर तादृश रोषही नव्हता व लोभही नव्हता, यामुळें त देशींच राहिले. पण बाबूराव फडनवीस यांस दादासाहेबांचा इतबार न पुरल्यामुळें ते आपला मुलगा मोरोबादादा यास बरोबर घेऊन मोगलाईंत पळून गेले. या संकटाच्या प्रसंगीं नाना व बाबूराव या दोघाही फडनविसांनीं आपलें द्रव्य मिरजेच्या किल्ल्यांत पटवर्धनांजवळ ठेविलें होतें. पुढें लवकरच पेशव्यांची व मोंगलांची लढाई सुरू होऊन मोगलानें देशीं येऊन पुणें जाळून लुटून फस्त केलें. पुण्याचे रहिवासी मावळांत डोंगराडोंगराच्या आसऱ्यास जाऊन दडून बसले होते. नानांच्या ताब्यांत लोहगड किल्ला होता त्याच्या पायथ्यास ते व पुण्याचे इतर हजारों रहिवासी राहिले होते. या दडणीच्या जागा परक्यांस सांपडावयाच्या नव्हत, परंतु इकडील घरभेदे मोगलास मिळाले असल्यामुळें त्यांच्या साहाय्यानें त्यानें सुगावा लावलावून ठिकाठिकाणचे लोक लुटिले. लोहगडच्या पायथ्यास शत्रूचा छापा आला तेव्हां तेथील सर्व लोक नागवले गेले. इतरांबरोबर नानांची देखील मालमत्ता लुटली जाऊन त्यांस एक वस्त्रानिशीं लोहगडावर पळून जावें लागलें. इतकी दुर्दशा झाली तरी मोगलानें पुण्याचा नाश न करावा

सन १७६२.

सन १७६३

म्हणून सामोपचाराच्या खटपटी करण्यास नाना चुकले नाहींत ! त्या खटपटींत त्यांस यश आलें नाहीं हें निराळें. पुढें मोगलांशीं तह होऊन दादासाहेबांनीं माधवराव पेशव्यांच्या हातीं पुनः राज्यकारभार दिला. फडनविशीचें काम रायरीकर यांजकडून काढून पुनः पूर्वीप्रमाणें नाना व बाबूराव यांजकडे देण्याविषयीं पेशव्यांच्या आग्रहावरून वाटाघाट सुरू झाली, तेव्हां दादासाहेबांनीं आग्रह धरिला कीं, फडनवीस यांनीं दरसाल फक्त एक लाख रुपये घेऊन फडनविशी करावी. ह्यापेक्षां अधिक उत्पन्न येईल तें सरकारांत द्यावें. पण हें म्हणणें फडनवीस यांनीं साफ नाकारिलें. त्यांच्या मध्यस्थीत गोपाळराव पटवर्धन हे होते. त्यांनीं सक्त रदबदली केल्यामुळें व पेशव्यांनींही नेट धरिल्यामुळें दादासाहेबांचें कांहीं चालेनासें होऊन त्यांनीं भाद्रपद वद्य त्रयोदशी श० १६८५ रोजीं नाना व मोरोबा यांस फडनविशीचीं वस्त्रें दिलीं.

५ आक्टोबर

यानंतर माधवराव पेशव्यांनीं नऊ वर्षें राज्य केलें. त्या अवधींत त्यानीं मोठमोठाल्या अनेक मोहिमांत यश मिळवून आपल्या मर्दुमीचा व मुत्सद्दीपणाचा लौकिक चोंहींकडे गाजविला, शत्रु जेरीस आणिले, आणि पानपतच्या स्वारीमुळें हीनबल झालेल्या मराठी राष्ट्रांत पुनः जोम उत्पन्न केला. नाना फडनविसांवर त्यांचा पूर्ण विश्वास असे. ते दूर परदेशीं मुलुखगिरीस जात तेव्हां किल्लेकोट, मुलूख, अठरा कारखाने, परराज्याचीं नाजूक कारस्थानें हें सर्व नानांच्या हवालीं करून जात. पाऊण पाऊण लाख फौज बरोबर घेऊन पेशवे कर्नाटकांत जात; आणि तिकडे अवाढव्य प्रमाणावर सैन्याच्या हालचाली, लढाया, वेढे, छापे वगैरे मसलती स्वतःच्या मेहनतीच्या, मर्दुमीच्या व शहाणपणाच्या बळावर ते तडीस नेत हें जरी खरें आहे, तरी त्यांस मिळालेल्या यशाचा कांहीं वांटा नाना फडनवीस यांस देणें वाजवी आहे. कारण कीं, एवढ्या मोहिमांस लागणारें कोट्यवधि द्रव्य राज्यांतून दक्षपणानें वसूल करून श्रीमंतांकडे फौजेच्या खर्चाकरितां वेळचेवेळीं नाना फडनवीस पाठवीत होते, दारूगोळा वगैरे सामानाचा सुद्धां देशाहून तरतुदीनें पुरवठा करीत होते आणि मुख्यत्वें स्वदेशीं बंदोबस्त उत्तम रीतीनें राखीत होते, म्हणूनच माधवराव पेशव्यांस सर्व मोहिमा निर्वेधपणें पार पाडितां आल्या.

खर्चाची रक्कम कितीही क्षुल्लक असो, तो खर्च गैरवाजवी होत असेल तर तत्काळ बंद करावा, त्या कामीं कोणाचीही भीड मुरवत धरूं नये, हा नानांचा बाणा होता. श्रीमंतांच्या घरच्या माणसांसही नानांची ही कैद राखावी लागे. याविषयीं एक आख्यायिका आहे. श्रीमंत माधवरावसाहेब हैदरअल्लीवर पहिली मोहिम करण्यास गेले तेव्हां त्यांचें वय सुमारें एकोणीस वर्षांचें होतें व त्यांचें कुटुंब रमाबाईसाहेब यांचें वय पंधरा वर्षांचें असावें. त्यांस पुण्यांत ठेवून श्रीमंत स्वारीस निघून गेल्यावर पहिल्याच आठवड्यांत बाईसाहेबांकडील कारकून खर्चाची याद घेऊन रीतीप्रमाणें मखलाशी करून घेण्याकरितां नानांकडे आला, तेव्हां त्यांनीं ती पाहून तींतून विड्याच्या पानांचें कलम काढून टाकिलें. कारकुनास आश्चर्य वाटून त्यानें तक्रार केली तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, घरीं श्रीमंत परत येतपर्यंत बाईसाहेबांस विड्याच्या पानांचें प्रयोजन नाहीं, हा खर्च गैरवाजवी, सबब बंद केला आहे! बाईंचें वय त्यावेळीं लहान होतें. त्यांस फार राग आला. त्यांनीं ती गोष्ट श्रीमंत परत आल्यावर त्यांच्या कानावर घातली. परंतु श्रीमंतांनीं सांगितलें कीं, नानांचें म्हणणें वाजवी आहे. या कामीं तुमच्या भिडेमुळें सुद्धां मला त्यांस दोष देतां येत नाहीं. याप्रमाणें श्रीमंतांचा नानांवर भरंवसा होता.

सन १७६४.

श. १६९० त दादासाहेबांनीं बंड केलें, तेव्हां पेशव्यांनीं त्यांचा पराजय करून त्यांस धरून आणून पुण्यांत शनवारच्या वाड्यांत कैदेंत ठेविलें. त्यानंतर श्रीमंत परमुलखीं स्वारीस गेले म्हणजे दादासाहेबांचा बंदोबस्त राखण्याचें हें एक नवीनच काम नानांच्या शिरावर लादण्यांत आलें. हें काम मोठें नाजूक व फारच जोखमीचें होतें, पण तें त्यांनीं मोठ्या दक्षतेनें बजाविलें. त्या कामीं त्यांजवर दादासाहेब व तत्पक्षीय लोक यांचा सहजींच रोष झाला; तथापि त्यांनीं त्यास कधीं जुमानिलें नाहीं.

सन १७६८.

माधवराव पेशवे शके १६९४ सालीं क्षयरोगानें थेऊर मुक्कामीं वारले. ते बरेच दिवस थेडरास आजारी होते. त्या वेळीं त्यांच्या प्रेमांतली व विश्वासू मंडळी रात्रंदिवस जवळ असे. त्यांत नाना फडनवीस व हरीपंत फडके हे असत. जिवास किंचित्

सन १७७२

स्वस्थ वाटे तेव्हां नाना व हरीपंत यांजजवळ श्रीमंत राज्यकारभारासंबंधें पुढील तरतुदीच्या केव्हां केव्हां गोष्टी बोलत. पण त्या सर्व तरतुदी सफळ होणें हें नारायणराव यांच्या वर्तनावर अवलंबून होतें. आणि नारायणरावांविषयीं तर श्रीमंतांचा ग्रह चांगला नव्हता. नारायणरावांच्या कपाळीं राज्य नाहीं हें पांच वर्षांपूर्वींच श्रीमंतांनीं सहजासहजीं बोलतांना एकदां भाकित केलें होतें. तो प्रकार हरिवंशाच्या बखरींत वर्णिलेला आहे. इ. स. १७६७ त हैदरअल्लीवर दुसरी मोहीम झाली, तेव्हां श्रीमंतांची स्वारी पंढरपुरास आली. बरोबर नारायणरावसाहेबही होते. श्रीमंतांनीं मंगळवेढ्याहून पुरुषोत्तमराव दाजी पटवर्धन यांस भेटावयास बोलाविलें होतें. त्यावरून दाजी भेटीस गेले होते. बरोबर त्यांचा मुलगा हरीहरराव होता व दोघा भावांचे दोन मुलगे होते. ही मंडळी भेटीस गेली तों श्रीमंत स्नान करून पाटावर बसून भस्म लावीत होते, तों हे जाऊन नमस्कार करून बसले. "तों श्रीमंत नारायणराव-साहेब स्नान करून त्या राहुटींत येऊन धोतरें नेसावयास लागले. धोतरें नेसून लागलीच सोंवळें आणविलें आणि सोंवळें नेसले! तें श्रीमंत रावसाहेब यांनीं पाहून रागें भरले जे 'तुला इतक्यांत विटाळ कोठून झाला? आतां धोतरें नेसलास, इतक्यांत विटाळ कशाचा झाला?' तों पुरुषोत्तमराव दाजी यानीं श्रीमंत नारायणराव-साहेब यांस विचारलें कीं, 'रावसाहेब, आपणास विटाळ झाला कीं काय?' तों थोरले श्रीमंत बोलले कीं, 'याचा स्वभावच तसला आहे! फार छांदस आहे. येथें विटाळ व्हावयास राहुटीच्या कनाती लहान आहेत कीं काय?' याप्रमाणें बोलतांच पुरुषोत्तमराव दाजी बोलले कीं, 'महाराज, श्रीमंत नानासाहेब यांच्या पाठीमागें आपणच वडील. आपण संभाळून घ्यावें.' तेव्हां श्रीमंत बोलले कीं, 'पुरुषोत्तमराव, याचे कपाळीं राज्य नाहीं'!!! नारायणराव पुढें थोर अधिकार संभाळण्याजोगे होणार नाहींत असें जरी श्रीमंतांस वाटत होतें, तरी त्यांजकडून विद्याभ्यास करविण्यांत व त्यांस कारभाराची माहिती करून देण्यांत त्यांनीं कसूर केली नाहीं. दर मोहिमेंत ते त्यांस बरोबर नेत असत व सर्व कारभार त्यांच्या नजरेसमोर घडत होते. पेशव्यांनीं मरण्यापूर्वींच चार सहा महिने सखारामबापूस दिवाणगिरी दिली होती व सर्व कारभार त्यांनीं नारायणराव यांस

समजावून करीत जावा असें ठरविलें होतें. दादासाहेब यांस कैदेंतून मुक्त करून त्यांच्या व सखारामबापूच्या हातीं नारायणराव यांचा हात देऊन माधवराव पेशवे मृत्यु पावले. त्यांचें कुटुंब रमाबाईसाहेब सती गेल्या तेव्हां त्यांनींही नारायणरावांचा सांभाळ करण्याविषयीं त्या उभयतांस निरवानिरव करून सांगितलें.

---

# प्रकरण दुसरें.

## नारायणरावसाहेब ह्यांची कारकीर्द.

श्रीमंत माधवरावसाहेब ह्यांचें उत्तरकार्य झाल्यावर तेरावे दिवशीं दादासाहेब व नारायणराव या चुलते-पुतण्यांनीं संकल्प केला कीं, उभयतांची निद्रा मात्र पृथक् स्थळीं व्हावी, परंतु जेवणखाण, बसणें-उठणें एकत्र व्हावें. परस्परांनीं तिलप्राय विकल्प मनांत न आणितां प्रेमानें परस्परांचें मनोधारण रक्षून रहावें. परंतु यानंतर महिना दोन महिने लोटले नाहींत तोंच उभयतांत द्वैतभाव उत्पन्न झाला !

हा द्वैतभाव वाढतां वाढतां दादासाहेबांस व आनंदीबाईस पुनः कैदेंत ठेवण्याविषयीं कोणी अविचारी लोकांनीं सल्ला दिल्यावरून नारायणरावसाहेबांनीं त्याप्रमाणें अमलांत आणिलें. हें कृत्य करूं नये म्हणून नाना फडनवीस व सखारामबापू यानीं श्रीमंतांस सांगितलें परंतु त्यांनीं ऐकिलें नाहीं. कैदेंतून सुटून जाण्याविषयीं दादासाहेबांनीं हैदरअल्लीकडे व नागपूरच्या भोंसल्यांकडे कांहीं कारस्थान केलें. तें कारस्थान उघडकीस आल्यामुळें नारायणरावसाहेबांनीं दादासाहेब व आनंदीबाई यांजवर कैदेची सक्ती अधिक अधिक करून त्यांचा छल केला. नारायणरावसाहेब आपल्या थोरल्या भावाची तरतरी व तापटपणा यांचें प्रत्येक कामांत अनुकरण करीत, पण थोरल्या भावाचे उदार व प्रौढ विचार त्यांच्या अंगीं लेशमात्र नव्हते. पुढचें मागचें धोरण व माणसांची किंमत हींही त्यांस कळत नव्हतीं. सारांश, त्यांच्या स्वभावांतील पोरपणा अद्यापि गेला नव्हता. सखारामबापूचा भरदरबारांत शिवीगाळ करून त्यांनीं उपमर्द केला !

माजी पेशव्यांनीं पसंत केलेला, त्यांतून छत्रपतींनीं नेमून दिलेला मुख्य कारभारी याची जेव्हां ही दशा, तेव्हां इतर मुत्सद्यांच्या सल्ल्यास हे पेशवे कितपत मान देत असतील हें सहज लक्षांत येण्याजोगें आहे. नानासारखे श्रीमंतांचे खरे हितचिंतक शहाणे मुत्सद्दी होते ते अब्रूच्या भयानें उदासीन राहूं लागले व हलक्या लोकांचें श्रीमंतांजवळ प्राबल्य होऊन त्यांच्याच मतानें कारभार चालूं लागला. श्रीमंत माधवरावसाहेब यांनीं केलेलें भाकित खरें होण्याची वेळ आली. कारण कीं, दरबारची अहवाल काय चालली आहे इकडे दादासाहेब व तत्पक्षीय लोक यांचें लक्ष वेधून राहिलें होतेंच. त्यांनीं नारायणरावसाहेब यांस कैदेंत घालण्याचा बेत केला. सखारामबापूनींही तिकडे कानाडोळा केला. नानांस ही कुणकुण कांहीं कळली होती, परंतु श्रीमंतांजवळ उघडपणें बोलण्याची चोरी ! कारण कीं, श्रीमंतांजवळ अष्टौप्रहर राहणाऱ्या लोकांपैकींही कांहीं या फितुरांत मिळाले होते. खुनापर्यंत मजल येईल ही अटकळ नानांच्याच काय, पण कोणाच्याही स्वप्नीं येण्याजोगी नव्हती. ती मसलत आनंदीबाई, गारदी व कांहीं परभू यांनीं अगदीं आयत्या वेळीं केली. नारायणरावसाहेबांस कैद करून दादासाहेबांस गादीवर बसवावें, असे बेत चालले असल्याचें मात्र नानांस कळलें होतें व त्याविषयीं त्यांनीं श्रीमंतांस आगाऊ इशारत दिली होती. "श्रीमंत नारायणरावसाहेब हूड होते. कारभारी यांचा बहुमान रक्षीत नसत. एके दिवशीं पर्वतीस स्वारी गेली. तेथें सारे बोथाटया खेळत होते. याप्रमाणें खेळत असतां श्रीमंतांनीं नाना फडनवीस यांचें पागोटें बोथाटीनें पाडिलें, आणि हसूं लागले जे, नाना, तुमचें पागोटें खालीं पडलें ! तेव्हां नानांनीं उत्तर केलें कीं, मी कारकूनच आहें. माझें पागोटें पडलें यांत कांहीं आश्चर्य नाहीं. स्वामींनीं आपलें पागोटें संभाळावें ! असें उत्तर केलें. पण त्यांत नानांनीं ( सावधपणा धरण्याविषयीं ) सूचना केली हें कांहीं ( श्रीमतांस) कळलें नाहीं ! श्रीमंत माधवरावसाहेब यांनीं मरणापूर्वीं एकांतीं श्रीमंत नारायणरावसाहेब यांस सांगितलें होतें कीं, जें काय करणें तें हरीपंत यांच्या विचारें करीत जा, तर कांहीं दिवस वांचशील. नाहीं तर तुझ्या जिवास कठिण आहे. असा बहुत बोध केला होता. (फडक्यांस श्रीमंत ) कांहीं विचारीत कांहीं न विचारीत. कोणती गोष्ट पोटांतही फारशी राहत नव्हती. यामुळें

हरीपंत फारशी लगट करीत नव्हते. " या वागणुकीचा परिणाम
३० आगष्ट सन १७७३. दादासाहेब व तत्पक्षीय मंडळी यांचा फितूर व त्या फितुराचें पर्यवसान नारायणरावसाहेबांचा खून हें होय !

---

# प्रकरण तिसरें.

## दादासाहेब व गंगाबाई यांच्या कारकीर्दी.

नारायणराव पेशव्यांस कैद करून दादासाहेब गादीवर बसते तर कोणाकडूनही त्यांस फारसा अडथळा झाला नसता, पण राज्यलोभास वश होऊन त्यांनीं पुतण्याचा खून केला अशी मुत्सद्दी लोकांची समजूत होतांच त्यांविषयीं त्यांच्या मनांत द्वेष उत्पन्न झाला. हा द्वेष वाढण्यास आणखी नवीं नवीं कारणें उत्पन्न होत गेलीं. नवरा मेला तेव्हां गंगाबाईची पाळी चुकून नुकते पंधरा दिवस गेले होते. पण स्वकार्य साधण्याविषयीं जागरूक असलेल्या आनंदीबाईस ती गोष्ट माहीत होती. गंगाबाईचा गर्भ दिवसेंदिवस वाढूं लागला, तेव्हां आनंदीबाई तिचा गर्भपात करण्याचे प्रयत्न करूं लागली. गर्भ न पडेल तर तिला मारून टाकण्याचाही तिचा बेत होता. पुण्यांत ही बातमी सर्वांस महशूर झाली होती. कारण कीं, माजी पेशव्यांचा खून झाल्यानंतर दीड महिन्यानें परशुरामभाऊ पुण्यास आले होते तेव्हां त्यांस ही बातमी कळली होती. ते आपले चुलत बंधु वामनराव यांस लिहितात कीं, " श्रीमंत मातोश्री गंगाबाई यांस गर्भ आहे यांत संशय नाहीं. त्यास सौभाग्यवती आनंदीबाई गर्भपात व्हाव-याचीं साधनें फारच करितात तीं पत्रीं लिहितां पुरवत नाहींत. गर्भ-पात न जाहल्यास त्यांस मारावी, तें न झाल्यास पुत्र कदाचित् झाल्यास त्यास अपाय करावा, या साधनांत आहेत. जी गोष्ट झाली त्यास इलाज नाहीं; परंतु आतां ही गोष्ट देखत देखत होणार याचा बचाव कोणाच्यानें होईनासा झाला ! बचावाचा प्रकार बोलेल तो अवकृपेंत येईल, असा प्रकार ईश्वरें घडविला आहे ! आह्मी असून व्यर्थ असें झालें आहे ! उपाय नाहीं. " दुसऱ्या एका पत्रांत ते लिहितात कीं, " श्रीमंत गंगाबाईच्या गर्भाच्या बचावांत आहों. परंतु जशा बनेल

तशा युक्तीनें करावयाच्या योजनेंत आहों. सर्व दोहींकडील मंडळ गर्भाचे बचावास एक होईल.गर्भाचे संरक्षणास कांहीं पांच सात ब्राह्मण अनुष्ठानास जरूर घालवावे". शिवाय याच पत्रांत दादासाहेबांनीं आपल्या इच्छे-विरुद्ध कित्येक कामें केल्यामुळें रागावलेला सखारामबापू कारस्थानें करून दादासाहेबांस पदच्युत करावें या खटपटींत आहे असेंही लिहिलें आहे. यावरून पुढें होणाऱ्या कारस्थानाची वाटाघाट दोन्ही पक्षांच्या मुत्सद्दी व सरदार लोकांत या वेळीं सुरू झाली होती हें स्पष्ट दिसतें. हे दोन पक्ष ह्मणजे सखारामबापू व नाना फडनवीस यांचे पक्ष होत. सखारामबापूस जुने देशस्थ सरदार अनुकल होते व कोल्हापूरचे महा-राज व नागपूरकर भोसले, निजामअल्ली व हैदरअल्ली यांजकडे त्यांचीं सूत्रें होतीं. नानांकडे पटवर्धन, पेठे, रास्ते वगैरे सरदार होते. शिंदे, होळकर बापूपेक्षां नानांसच अधिक अनुकूळ असण्याचा संभव होता. हे दोन्ही पक्ष पुढें एक होऊन दादासाहेब कर्नाटकचे स्वारीस गेल्या-वर बारभाईंचें कारस्थान उभारलें गेलें. प्रथम गंगाबाईस साताऱ्यास नेऊन छत्रपतींचें नांव पुढें करून त्यांच्या अंगत्वानें कारस्थान करावें असा सखारामबापूचा बेत होतासें दिसतें. तसें झालें असतें तर आपले हस्तक हरीपंत फडके यांस तुमच्या या मसलतीच्या कामावर नेमून देऊन आपण स्वस्थ मेणवलीस राहूं असें नाना म्हणत होते. पुढें तो बेत फिरून बाईस पुरंदरास नेऊन तिच्या नांवें सखारामबापू व नाना फडनवीस यांनीं अनुक्रमें मुख्य व दुयम्म कारभारी या नात्यानें पेशवाईचा कारभार चालवावा असा बेत ठरला. आणखी कांहीं दिवस हा बेत तडीस नेण्याचें लांबणीवर पडलें असतें, परंतु पुण्यांत चालू असलेल्या मसलतीचा सुगावा आनंदीबाईस लागला. ती त्या वेळीं जरी नवऱ्याबरोबर कर्ना-टकचे स्वारींत होती, तरी तिनें तेथून गंगाबाईस ठार मारण्याकरितां मारेकरी पाठविले ! ते शनवार वाड्याच्या विशेष बंदोबस्ताकरितां म्हणून राजरोसपणेंच लष्करांतून आले होते, परंतु सहजगत्या त्यांचा दुष्ट बेत उघडकीस आल्यामुळें त्यांस मारझोड करितांच त्यांनीं आनंदीबाईचें नांव घेतलें ! तत्काळ जलदी करून कारभारी यांनीं गंगाबाईस पुरंदरास नेऊन ठेविलें व तिच्या नांवानें कारभार हांकण्याची सुरुवात केली.

३० जानेवारी सन १७७४.

यासंबंधें त्रिंबकराव मामा पेठे यांच्या बायकोनें एका पत्रांत हकीकत लिहिली आहे कीं, " राजश्री सखारामबापू व नाना फडनवीस व राजश्री हरीपंत फडके पुरंदरास आहेत. पुण्यांत राजश्री नारो आपाजी ( तुळसबागवाले ) पुरंदराहून आज्ञा येत्ये त्याप्रमाणें कारभार करितात. सरकारच्या वाड्यांतून देखील वस्तभाव कोठींतील जिन्नस समेत पुरंदरास नेला. जवाहीरखाना सिंहगडास नेला. इतकें व्हावयास कारण काय म्हणाल तरी मुख्यत्वें-करून सौभाग्यवती पार्वतीबाई व गंगाबाई यांस मारून टाकावें असे मारेकरी सांपडले. त्यांनीं नांवेंही सौभाग्यवती आनंदीबाई व × × यांचीं घे-तलीं. हा प्रकार कळण्यापूर्वी वाड्याच्या बंदोबस्ताकरितां (आलों) ह्मणून सांगत होते. मागें जाहल्या कार्याचा सूड घ्यावा हें कारभारी यांच्या अंत-र्यामीं होतेंच. इतक्यांत हेंही निमित्त या गोष्टीस अनुकूल झालें. राजश्री सखारामपंतबापू व नाना फडनवीस व हरीपंत फडके इत-क्यांनीं उभारणी करोन दोन अडीच हजार रावतांनिशीं किल्ल्यास राहून मुलकी बंदोबस्त करितात. गंगाबाईच्या नांवाच्या सनदापत्रें व नारायणराव यांच्या नांवाचे शिक्के करितात. चहूंकडे. फौजांसही बोलावणीं गेलीं आहेत. पुण्यांतील अवघ्या सावकारांस बोलावून नेलें होतें. त्यांस [ कारभारी यांनीं ] धीर भरंवसा दिला. त्यांनीं सखाराम-बापूंचे नांवचीं खतें घ्यावीं व लागेल तितका पैका द्यावा, हें कबूल केलें. कारभाऱ्यांनीं सर्वस्व आपल्या भरीस घालावें, पण दादा-साहेबांचें पुरतें पारिपत्य करावें हें चित्तावर धरिलें आहे. " या पत्रा-संबंधें ही गोष्ट लक्षांत धरण्याजोगी आहे कीं, पत्र लिहिणारणीनें हें पत्र जरी आपल्या आईस लिहिलेलें आहे, तरी यांत 'बारभाईंच्या कारस्थानां'त आपला नवरा प्रमुख आहे व लष्करी कामाचा सर्व बोजा त्यानें आपल्या शिरावर घेतला आहे या गोष्टीची ओळख सुद्धां तिनें आपल्या आईस दिलेली नाहीं ! भलत्याच्या हातीं पत्र गेल्यास घात होईल यासाठीं हा इतका सावधपणा !

पुण्यास कारभाऱ्यांनीं हें कारस्थान केल्याची बातमी दादासाहेबांस कळतांच ते मोहीम तहकूब करून परत फिरले. कारभाऱ्यांच्या तर्फे फौज जमा करून त्र्यंबकराव मामा त्यांजवर चालून गेला. परंतु दादा-साहेबांनीं पंढरपुराजवळ कासेगांव येथें मामाचा पराजय करून

त्यांच्या फौजेची दाणादाण केली. त्या लढाईंत मामा जखमी होऊन शत्रू-
२६ मार्च
कडे पाडाव सांपडले व दुसरे दिवशीं मरण पावले.
ही बातमी पुरंदरास बापू व नाना यांस कळली तव्हांचा प्रसंग हरिवंशाच्या बखरींत वर्णिला आहे तो असा—"लष्करांतून सांडणीस्वार आला तों उभयतां कारभारी पुरंदरचे दरवाजावर लहानसा बंगला आहे तेथें बसले होते. तों सखारामबापू यानीं दुर्बीण लावून पाहिलें आणि सांगितलें जे, लष्करांतून सांडणीस्वार येतो आहे, पण मसलत बिघडलीशी दिसते! असें सांगतात तों सांडणीस्वार येऊन दाखल झाला. पत्रे लाखोटे फोडून पाहिलीं त्यांत त्रिंबकराव मामा मारिले गेले व फौज उधळली हें वाचिलें. अगोदर सखारामबापू यानीं सांडणीस्वार यास विचारिलें जे, हरीपंत जिवंत आहे कीं मेला ? असें ह्मणतांच सूतर स्वार यानें सांगितलें कीं हरीपंत शाबूत आहेत. असें म्हणतांच कांहीं चिंता नाहीं असें बोलून नंतर लाखोटे फोडिले. वर्तमान ऐकून नाना फडनवीस यांची कंबर बसली आणि बोलिले जे, प्रथमग्रासीं मक्षिका–पात झाला ! असें बोलून स्तब्ध झाले. तों दोन प्रहर दिवस आला. नाना भोजनास उठेनात. तेव्हां सखारामबापू यानीं धैर्य दिलें. " नाना, हें राजकारण आहे. असे तरंग किती उठतील ! आपण इतक्यांतच दम टाकिल्यास पुढें कसें कराल ? तुम्हांस एक सांगतों. ज्यापक्षीं हरीपंत जिवंत आहे त्यापेक्षां मसलत बिघडत नाहीं. तो पुनः राजकारण उभें करील." याप्रमाणें बोलून नानांस भोजनास उठविलें." इकडे मामांची फौज हरीपंत फडक्यानीं धीर भरंवसा देऊन पुनः एकत्र केली. आणि साबाजी भोंसले व निजामअल्ली यांशीं राजकारण करून त्यांस आपणाकडे मिळवून घेऊन दादासाहेबांस पुनः गांठिलें.
तेव्हां फडक्यांशीं लढून त्यांचा पराजय करावा,
एप्रिल
आणि पुण्यास येऊन कारभाऱ्यांचें पारिपत्य करावें, ही मसलत करण्याची छाती दादासाहेबांस होईना. सबब ते उत्तरेकडे बऱ्हाणपुरचा रोंख धरून पळत सुटले. हरीपंतही भोंसले व मोगल यांसह त्यांचा पाठलाग करीत चालले.

आजपर्यंत माधवराव पेशव्यांनीं अनेक स्वाऱ्या केल्या त्यांत हरीपंताचें नांव सरदार या नात्यानें कोठें प्रसिद्ध नाहीं. अक्कल व हिंमत अनुभवास आल्यालेरीज एवढ्या मोठ्या फौजेच्या सरदारीसारखी जबाब

दारीची जागा बापू व नाना यांसारखे शहाणे मुत्सद्दी कोणास देणारे नव्हत. असें असतां हा हरीपंत मध्येच कोठून निर्माण झाला, कारभाऱ्यांनीं तरी त्याचा इतका भरंवसा धरण्याचें कारण काय, असें वाचकांस साहजिकच वाटतें. पण यांत खरें पाहूं गेलें तर कांहीं आश्चर्य नाहीं. कारण कीं हरीपंत हा मूळचा फडनविसांचा प्रमुख व विश्वासू कारकून व नानांचा बाळपणचा खेळगडी. दर स्वारींत पेशव्यांबरोबर फडनवीस असावे लागत, पण नानांस पुण्यांतच ठेवणें माधवराव पेशव्यांस अवश्य असल्यामुळें त्यांच्या तर्फे फडनविशीचें काम चालविण्यास ते हरीपंतास घेऊन जात असत. पेशव्यांनीं गोपाळराव पटवर्धन यांस स्वारींत गुप्त व महत्वाच्या चिठ्या लिहिल्या आहेत त्या बहुतेक हरीपंतांच्या हातच्या आहेत. हरीपंतांची हुशारी, हिंमत व एकनिष्ठा पाहून श्रीमंतांचा त्यांजवर विश्वास बसला. श्रीमंतांपासूनच त्यांस लष्करी शिक्षण मिळालें व त्यांच्या नित्य सहवासामुळें हरीपंतांचें सरदार व शिलेदार लोकांवर वजन बसलें. यापुढें सवाई माधवराव यांच्या कारकीर्दींत मराठी सेनांचें आधिपत्य त्यांजकडे होतें हें सर्वप्रसिद्धच आहे.

शके १६९६ अधिक वैशाख शुद्ध सप्तमी रोजीं गंगाबाई प्रसूत होऊन पुत्र झाला. जन्मोत्सवाचा समारंभ कारभाऱ्यांनीं थाटामाटानें केला. त्याविषयीं कोन्हेरराव पटवर्धन त्या वेळीं पुरंदरास होता त्याचे पत्रांत खालीलप्रमाणें मजकूर आहे. "श्रीमंत मातोश्री गंगाबाई प्रसूत झाली, पुत्र झाल्याचें वृत्त आपणास कळलेंच असेल. अकरा दिवशीं नामकरण झालें; समारंभ मोठाच झाला. राजश्री बाबूजी नाईक कुटुंबसुद्धां आले होते. पुण्यांतीलही मातबर मातबर आले होते. नांव 'श्रीमंत राजश्री माधवरावसाहेब' ठेविलें. समारंभ चांगलाच जाहला. हेलकरणी बायका मराठ्यांच्या अकरा दिवस पाणी घालीत असतात त्यास बारामती, सुपें, फलटण, वाई, सासवड तालुक्याच्या व पुण्याच्या गांवखेड्यांच्या म्हणतां सात आठ हजार जाहल्या. त्यांस लुगडीं व चोळखण याप्रमाणें दिलें. पुण्यांतील वाड्यांतील व पुण्यांतील बायका दहा हजार जाहल्या. त्यांस चोळखण दिलें. आबालवृद्धांस मोठा संतोष झाला."

१८ एप्रिल.

पानपतचें युद्ध होण्यापूर्वी गोपिकाबाईच्या भरभराटीचा कळस होऊन गेला होता. पण त्या युद्धांत तिचा पुत्र विश्वासराव पडला. मागून लौकरच नानासाहेब वारले. त्यानंतर माधवराव अंमळ कोठें हातपाय हालवूं लागतो तों क्षयरोगानें गांठल्यामुळें तोही मरण पावला. नंतर तिसरा पुत्र नारायणराव गादीवर बसून थोडे महिने होतात न होतात तों मारेकऱ्यांच्या हातें तोही मरण पावला. विश्वासराव, माधवराव व नारायणराव या तीन पुत्रांची तीन प्रकारांनीं वाट लागलेली पाहतांच दुःखानें बैतागून ती गंगापुरास वाड्यांत रहात होती तेथून निघून श्रीमंतीचे सर्व उपचार व वैभव टाकून देऊन एका मठांत जाऊन राहिली व चार घरची भिक्षा आणून उदरनिर्वाह करूं लागली ! याप्रमाणें तिच्या विपन्नावस्थेची परम सीमा जाहली असतां सवाईमाधवराव जन्मास आल्याचें वर्तमान तिच्या कानीं पडलें तेणेंकरून तिच्या मनास कांहींसें समाधान वाटलें. तिणें भिक्षा मागणें व मठांत राहणें सोडिलें, पण याउपर संसाराकडे तिचें मन पुनः वळलें नाहीं. एकांतवासांत राहून ईश्वरभजनांत तिनें सर्व आयुष्य घालविलें. असें सांगतात कीं, वाड्याबाहेर जाण्याचें कधीं कारण पडल्यास ती पळसाच्या पानांनीं गुंफलेल्या पालखींत बसून जात असे !

---

# प्रकरण चवथें.

## सवाई माधवरावसाहेबांच्या कारकीर्दीची सुरुवात.

### दादासाहेबांचा पाठलाग.

### इंग्रजांशीं लढाई व पुरंदरचा तह.

कारभारी व सरदार यांचा मोरोबादादांवर विश्वास नसल्यामुळें त्यांनीं त्यांस प्रथमपासून राज्यकारभारांतून वगळिलें होतें. माधवराव पेशव्यांनीं पूर्वी कांहीं वर्षें मोरोबाच्या हातें दिवाणगिरीचें काम घेतलें होतें, तेवढ्यावरून त्यांस आपल्या अकलेची बरीच घमेंड वाटत होती. हल्लीं कारभाऱ्यांनीं त्यांजकडे कांहींच काम ठेविलें नसल्यामुळें त्यांस फार राग येऊन ते पुणें सोडून जुन्नरास जाऊन राहिले. तेथपर्यंत

नानांनीं स्वतः जाऊन त्यांची नानाप्रकारें समजूत घालण्याची खटपट केली, परंतु त्यांच्या मनाचें समाधान झालें नाहीं. ते जुन्नराहून पुण्यास परत आले खरे, पण त्यांचे मन द्वेषानें जळफळत होतेंच. ती बातमी दादासाहेबांस कळतांच त्यांनीं मोरोबाकडे सूत्र लावून त्यांस अनुकूल करून घेतलें. नंतर मोरोबानीं बेत केला कीं, गंगाबाई व तिचा पुत्र व उभयतां कारभारी यांस धरावें. तो बेत तडीस नेण्याची संधि त्यांस सहजासहजीं प्राप्त झाली. पुरंदरची हवा पावसाळ्यांत अतिशय गार असल्यामुळें हीं चौघेंही खालीं सासवडास रहावयास आलीं होतीं; तेथें त्या सर्वांस धरून कैद करण्याचा मोरोबानीं बेत केला; पण हा बेत आयत्या वेळीं कारभारी यांस कळल्यावरून ते गंगाबाई व नूतन पेशवे यांस बरोबर घेऊन रातोरात पडत्या पावसांत पुरंदरावर

जून.

पळून गेले ! याप्रमाणें ही मसलत फसली तरी मोरोबानीं पुनः यत्न केला. किल्ल्याच्या माचीस सिद्दी लोकांचे पहारे होते त्या लोकांस वश करून

नोव्हेंबर.

त्यांच्या द्वारें मोरोबानीं पुरंदरच्या गडकऱ्यांशीं बोलणें लाविलें कीं, तूर्त तुम्हांस पंधरा हजार रुपये देतों. तुम्हीं उभयतां कारभारी व गंगाबाई व पेशवे यांस कैद करावें. याप्रमाणें केलेंत म्हणजे आणखी दोन लक्ष रुपये देईन ! गडकऱ्यांनीं तें बोलणें कारभाऱ्यांचे कानावर घालितांच त्यांनीं त्या सिद्दी लोकांचीं डोचकीं मारविलीं, पण दस्तऐवजी पुरावा न मिळाल्यामुळें त्यांस मोरोबाचें पारिपत्य करतां आलें नाहीं.

यानंतर पेशव्यांच्या जिवाच्या संरक्षणाकरितां नानांनीं पटवर्धन घराण्यापैकीं पुरुषोत्तमराव कृष्ण उर्फ दाजी यांस पुरंदरास आणून ठेविलें व त्यांजकडे स्वतंत्र चारशें पायदळ नेमून त्या लोकांनिशीं त्यांनीं पेशव्यांजवळ रात्रंदिवस पहारा करीत रहावें असें ठरविलें. पुरुषोत्तमराव महापराक्रमी व विश्वासू होते. दादासाहेब दक्षिणेंत येऊं लागले तेव्हां त्यांच्या मुकाबल्यासाठीं बापू व नाना फौज घेऊन निघाले, त्या प्रसंगीं त्यांनीं पुरंदरचा सर्व बंदोबस्त दाजीवर सोंपविला होता. दाजींचा दरारा व बंदोबस्त अति उत्तम होता म्हणूनच सवाई रावसाहेबांचा जीव बचावला. नाहीं तर आनंदीबाईचा फितूर केव्हां व कोठें उमटेल व दगा होईल याचा बिलकुल नेम

नव्हता! चर्येवरून माणसाचा रागरंग ओळखण्यांत दाजींची हद्द होती! गंगाबाई बाळंत होती तेव्हां एके दिवशीं दोन प्रहरीं दाजी बाळंतिणीचे खोलीचे दारांत निजले होते. "तों कुणबीण नित्य आंत जाणार तीच जात होती. तों यांची चाल नित्य आंत जाणारीं माणसें झाडा घेऊन आंत जाऊं द्यावीं. याप्रमाणें नित्यकृत्याची शिस्त होती. तों कुणबीण आंत चालली ती दाजींनीं पाहिली आणि बोलिले, 'रांड फितुरी आहे. धरा!' असें म्हणतांच धरून झाडा घेतला तों कांहीं निघालें नाहीं. दुसऱ्या कुणबिणी आणून अगदीं लुगड्यासुद्धां झाडा घेतला. नंतर वेणी सोडविली तों बुचडयांत सुरी निघाली! आणि चौकशी केली तों फितुरी आहे असें खास झालें. नंतर तिला भोतांत घालून कडेलोट करून दिला." या पुरुषोत्तमरावाचा मुलगा बारा तेरा वर्षांचा हरिहरराव म्हणून होता तो बापाबरोबर तीन वर्षें पुरंदरास होता.पुढें या हरिहररावाच्या मुलांपैकींच एकानें हरिवंशाची बखर लिहिली आहे तींतून वरील आख्यायिका घेतला आहे. ही व पुरंदरावरील हकीकतीच्या त्या बखरींतील आख्यायिका अत्यंत विश्वसनीय होत. कारण कीं हरिहररावाच्या समक्ष ज्या गोष्टी घडल्या व ज्या त्यानें तेथें असतां ऐकिल्या त्याच आपल्या मुलास सांगितल्यावरून मुलानें बखरींत लिहून ठेविल्या आहेत.

या ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं शिंदे होळकरांनीं लपंडाव करून पुणें दरबारास कसें फसविलें हेंही येथें सांगितलें पाहिजे. शिंदे होळकरांनीं फसविलें ह्मणण्यापेक्षां महादजी शिंद्यानीं फसविलें असेंच म्हणणें योग्य होय. कारण कीं, या मसलतींत तुकोजी होळकर सर्वथा महादजी शिंदे यांच्याच सांगण्याप्रमाणें वागत होते, व त्या दोघांचें कूट एकच होतें. दादासाहेबांस पदच्युत करून गंगाबाईची स्थापना करण्याची मसलत कारभाऱ्यांनीं केली तेव्हां देशीं येऊन आपणास सामील होण्याकरितां त्यांनीं शिंद्यास लिहिलें. त्या वेळीं शिंद्यानीं उत्तर लिहिलें कीं, माधवराव पेशव्यांनीं मजवर उपकार केले आहेत ते जन्मोजन्मीं फिटणार नाहींत. मी तुमच्या मसलतीस मनापासून अनुकूळ आहें. तुमच्या म्हणण्याप्रमाणें फौजेसह देशीं यावें हेंच मनांत होतें. परंतु गेलीं चार वर्षें दिल्ली व रोहिलखंड वगैरे प्रांतीं स्वाऱ्या कराव्या लागल्या तेव्हां फार फौज बाळगावी लागली. त्या फौजेचें देणें तुंबलें आहे त्याचा

निकाल झाल्याशिवाय फौज बाहेर निघत नाहीं, याविषयीं माझा निरुपाय आहे. याप्रमाणें जरी त्यांनीं टाळाटाळीचें उत्तर दिलें तरी ते व होळकर आपणांस पूर्णपणें अनुकूल आहेत असेंच कारभारी समजत होते. हल्लीं दादासाहेब बऱ्हाणपुराकडे चालले तेव्हां त्यांचे पाठीवर हरीपंत फडके होते. त्यानीं शिंदे होळकरांस सूचना पाठविली

एप्रिल.

कीं, श्रीमंत माळव्यांत येऊं पहात आहेत, याकरितां तिकडे येण्याचे मार्ग बंद करून त्यांस अडवावें; तों आम्ही येऊन गांठ घालितों. पण इतके सरळपणानें शिंदे कसचे वागतात! राज्यांत हें दादासाहेबांचें खूळ उठलें आहे त्यासंबंधें आपला कांहीं तरी चांगला फायदा करून घेतल्याशिवाय हें खूळ मोडूं देऊं नये हा त्यांचा कावा! त्यांनीं लिहून पाठविलें कीं, श्रीमंतांस इकडे येण्यास हंड्याचा घांट अथवा बडव्यांचा घांट असे दोन मार्ग आहेत. पैकीं हंड्याच्या घांटाचा बंदोबस्त

मे.

आमच्यानें होणार नाहीं. तो तुह्मी जलद करावा. बडव्यांच्या घांटाचा बंदोबस्त आह्मीं यथास्थित केला आहे, व त्या मार्गानें श्रीमंतांस इकडे येऊं देत नाहीं. त्याप्रमाणें हरीपंतानीं केलें तों दादासाहेब नेमके बडव्यांच्याच घाटानें कांहीं हरकत न होतां थेट इंदूरपर्यंत गेले! शिंद्यानीं हरीपंतांस हा पहिला हिसका दिला! असे ते आणखी किती तरी हिसके देणार होते व हरीपंतांच्या सहनशीलतेची परीक्षा पहाणार होते!

दादासाहेबांच्या पाठोपाठ माळव्यांत जाण्याच्या उद्देशानें हरीपंत फौजेसह नर्मदेवर येऊन पोंचतात तों शिंद्याचीं इंदुराहून पत्रावर पत्रें येऊं लागलीं कीं, श्रीमंत येथें आले आहेत व त्यांची समजूत घालण्यास आम्हीं प्रारंभ केला आहे. त्यांचें निम्में मन मिळविलें आहे. लवकरच त्यांस देशीं घेऊन येतों. तुम्हीं नर्मदेवर छावणी करून रहावें. अलीकडे येऊं नये. याल तर आमच्या मुलखाची फुकटचे-फुकट पायमल्ली होऊन नासाडी होईल, व दादासाहेब धास्त खाऊन भलतीकडे भडकून जातील! हरीपंतांस दम खाण्यास फुरसत नव्हती. ते दिवस वैशाखाचे. पावसाळा समीप आल्यामुळें

जून.

फौजेस निरोप देण्याचे दिवस जवळ आले होते. एवढी पन्नास हजार फौज घरोघर निघून गेली म्हणजे पुनः पुढचे वर्षी

इतकी जमा होण्यास फार प्रयास पडतील, सरकारावर अनिवार खर्च बसेल, बरोबर मोगल व भोंसले सोबतीस आहेत हे एकदां गेले म्हणजे पुनः पुढचे वर्षी आणण्यास यांच्या पायधरण्या कराव्या लागतील, याकरितां यंदांच दादासाहेबांच्या मसलतीचा फडशा करावा, हा हरीपंताचा हेतु होता. पण शिंद्यांच्या मध्यस्थीमुळें त्यांस नर्मदेअलीकडे रहावें लागलें. नंतर इकडून तिकडे व तिकडून इकडे पत्रें व निरोप अनेकदां आले व गेले. उभयपक्षींच्या वकिलांचे हेलपाटेही झाले, परंतु दादासाहेबांची समजूत एक महिना होऊन गेला तरी शिंदे होळकरांच्यानें होईना ! तेव्हां कांहीं जरब दाखवून काम होतेंसें पहावें म्हणून हरीपंत नदी उतरून एक मजल पुढें गेले. तों तिकडून शिंद्यांचे निकडीनें निरोप आले कीं, आतां उतावळी कराल तर मसलत नासेल व माझी मेहनत फुकट जाईल ! " आपणास फौजेचें देणें पांच सात लाख रुपये झालें आहे तें हरीपंतानीं दिलें म्हणजे आपण तुम्हांबरोबर देशीं येतों तुमच्या मध्यस्तीनें कारभाऱ्यांशीं बोलून निर्वाहाची सोय ते करून देतील ती मान्य करून स्वस्थ राहूं." याप्रमाणें दादासाहेबानीं आम्हां जवळ कबूल केलें आहे. याकरितां त्यांच्या फौजेचें देणें फेडावें म्हणजे काम होईल. त्याप्रमाणें हरीपंतानीं दादासाहेबांकडे रुपये पटविले. पण ते हातीं पडतांच ती स्वारी सुजाउद्दौल्याकडे जाण्याच्या इराद्यानें इंदूर सोडून एक मजल पुढें निघून गेली ! तों पाठोपाठ महादजी शिंद्यानीं येऊन श्रीमंतांच्या फौजेस गराडा दिला व सांगून पाठविलें कीं, कबूल केल्याप्रमाणें देशी चलावें, नाहीं तर येथें आतां कटकट होईल. मजा राहणार नाहीं ! शिंद्यांचा हा निग्रह पाहून श्रीमंत हळूहळू दक्षिणेंत येऊं लागले. परंतु त्यानीं शिंद्यांस बजावून सांगितलें कीं, हरीपंत वाटेंत आहे तो दूर सरल्याशिवाय आम्हांस विश्वास पुरत नाहीं. त्यावरून हरीपंत तळ हालवून वऱ्हाडच्या सरहद्दीस देऊळघाटाखालीं जाऊन राहिले. त्यांनीं मोगल व भोंसले यांस निरोप देऊन बाकीची फौज आपणाजवळ छावणीस ठेविली.

जुलई.

शिंदे होळकरांस बरोबर घेऊन श्रीमंत दादासाहेब आषाढाच्या महिन्यांत खानदेशांत आले. त्यांच्या एकंदर हालचालींवरून त्यांचें " सारें कर्म दगाबाजीचें आहे " असा हरीपंतांनीं जो अभिप्राय दिला होता, त्याच्या खरे-

पणाची प्रतीति दिवसेंदिवस कारभाऱ्यांस येऊं लागली ! येतां येतां अशीरगड दग्यानें घ्यावा म्हणून श्रीमंतांनीं यत्न केला पण तो फसला. वाटेंत चार दोन दिवसांनीं पैक्यासाठीं अडून बसावें, शिंद्यानीं कारभाऱ्यांकडून पैका देववावा, मग यांनीं कूच करावें, रयतेस चोप देऊन पैसा लुबाडावा, मामलेदार धरून नेऊन दंड घ्यावे, हे त्यांचे खेळ चाललेच होते ! इकडे शिंद्यांचे वकील पुरंदरास बापू व नाना यांकडे येऊन बोलूं लागले कीं, “ दादासाहेबांस दहा लक्षांची जहागीर व मध्यमप्रतीचे तीन किल्ले स्वदेशीं द्यावे. त्यांची मध्यस्ती आम्हांकडे आहे तशीच असावी. तुम्हांवर श्रीमंतांचा विश्वास नाहीं, याकरितां त्यांच्या

आगस्ट.

बंदोबस्तासंबंधें हरएक काम पडेल तें तुम्हीं न करतां आम्हांस सांगावें. आम्ही करीत जाऊं. ” हें बोलणें बापू व नाना यांनीं मान्य केलें. शिंद्यानीं या प्रसंगीं लाख पन्नास हजार रुपये स्वतःचे खर्चास मागितले व शिंदखेड वगैरे कांहीं गांव मागितले, त्याप्रमाणें रुपये व गांव कारभाऱ्यांनीं त्यांस दिले. त्यांनीं इतकें केलें तरी शिंद्यांची हांव तृप्त झाली नाहीं ! त्यांकडे सरंजामाचा मुलुख होता त्याच्या वसुलांतून त्यानीं सुमारें वीस हजार फौज दरसाल चाकरीस बाळगावी असा करार असतां गतवर्षीं व यंदा त्यांनीं अगदीं जुजबी फौज बाळगून बाकीचा पैका गट्ट केला होता. हा पैका कारभारी आपणास ओंकावयास लावितील हें त्यांस भय होतें; व त्यासाठींच मध्यस्थीच्या उपकाराचें ओझें कारभाऱ्यांवर लादण्यासाठीं इतके दिवस त्यानीं ओढाताण चालविली होती ! आपल्या सरंजामाचे हिशेब कारभारी केवळ डोळे मिटून ‘ पास ’ करणार नाहींत असा जेव्हां त्यांस सुमार दिसूं लागला, तेव्हां भाद्रपदाच्या महिन्यांत त्यांनीं कारभाऱ्यांस सांगून पाठविलें कीं, तुम्हीं समीप आल्याशिवाय कामाचा निकाल होत नाहीं ! पेशव्यांस पुरंदरावर टाकून दूर जाणें कारभाऱ्यांस परम संकट वा-

सप्टेंबर.

टलें. परंतु न जावें तर एवढें राजकारण नासल्याबद्दल शिंद्यांचा शब्द येईल व तेवढेंच त्यास निमित्त पुरेल, असें जाणून ते पुरंदरचा कसाबसा बंदोबस्त करून निघाले. त्यांचा शिंदे होळकरांवरचा भरंवसा अलीकडे उडत चालला होता व दादासाहेबांवर प्रथमपासून नव्हताच.

आपण कमकुवत आहों असें दादासाहेब व शिंदे होळकर यांच्या नजरेस आलें तर ते भलभलत्या मागण्या करून आपणास अडचणींत पाडितील व पाहिजे तें कबूल करावयास लावितील, दादासाहेब कदाचित् दगाफटकाही करावयास चुकावयाचे नाहींत, असा विचार करून कारभारी निघाले ते जबरदस्तच होऊन निघाले. कारण कीं निघतांना त्यांनीं पंधरा हजार फौज समागमें घेतली होती. शिवाय त्यांनीं सूचना केल्यावरून त्याच वेळीं औरंगाबादेहून मोगल जय्यत सरंजामानिशीं निघाला व नागपुराहून साबाजी भोसलेही कूच करून येऊं लागला. हरीपंतानींही आपल्या फौजेचा तळ हालविला. याप्रमाणें चोहोंकडून खानदेश-च्या रोंखानें फौजा येऊं लागल्या, तेव्हां महादजी शिंद्यांस मोठी पंचाइत येऊन पडली. कारभारी इतक्या तयारीनिशीं येतात तेव्हां त्यांजकडून याउपर आपणांस कांहीं मिळण्याजोगें नाहीं हें त्यांस कळून चुकलें. दादासाहेबांच्या मनांत जहागीर व किल्ले घेऊन स्वस्थ बसावयाचें नाहीं हें त्यांस पक्कें माहीत होतें. त्यांस धरून कारभाऱ्यांच्या हातीं द्यावें तर बदलौकिक. जाऊं द्यावें तर कारभाऱ्यांचा रोष ! अशा स्थितींत दादासाहेब नित्य नवीं नवीं बोलणीं बोलूं लागले व तीं कबूल करण्याविषयीं शिंद्यांचा कारभाऱ्यांस आग्रह पडला ! त्या समयीं कारभाऱ्यांनीं शिंद्यांस रागानें सांगून पाठविलें कीं, " तुम्हीं मध्यस्तींत पडून आजपर्यंत आम्हांकडून दादासाहेबांस पंधरा लक्ष रुपये देवविलेत. श्रीमंतांकरितां किल्ले व जहागीर तुम्हीं जी मागितली ती अगदीं तुमच्या म्हणण्याप्रमाणें आम्हीं करार करून दिली. शिवाय तुम्हीं स्वतःकरितां जें जें मागत आलांत तें तें आजपर्यंत आम्ही देत आलों आहों. इतकें असून कराराप्रमाणें श्रीमंतांस वागावयास लावण्याचें तुमच्यानें निभत नसल्यास त्यांस खुशाल वाटेल तें करूं द्यावें. ते व आम्ही बघून घेऊं ! " शिंद्यांनीं मागें पुढें न पाहतां अगदीं अक्षरशः या निरोपाप्रमाणेंच आचरण केलें ! चोहोंकडून आपणावर फौजा चालून येतात असें पाहून दादासाहेबानीं एके दिवशीं अकस्मात् पुनः उत्तरेकडे पलायन केलें ! तें पाहून शिंदे होळकर तत्काळ त्यांच्या पाठीस लागले. पण त्यानीं हरीपंतांस निकडीनें निरोप पाठविला कीं, आमची

नोव्हेंबर.

दिसेंबर.

विनंती अमान्य करून श्रीमंत पळून गेले, आह्मी त्यांच्या पाठीवर आहों, पण तुम्हीं आल्याशिवाय आम्हांस त्यांशीं गांठ घालवत नाहीं; याकरितां आह्मांस लवकरच येऊन मिळावें. त्याप्रमाणें हरीपंत त्या सरदारांस मिळाले व पाठलागाचें काम झपाट्यानें सुरू झालें. याप्रमाणें थंड पडत आलेली दादासाहेबांची ही मसलत पुनः फैलावली तरी तिच्या बंदोबस्तास हरीपंतांची नेमणूक पुरे आहे, आपण स्वतः त्या कामावर जाण्यांत कांहीं विशेष आहे असें नाहीं, असें जाणून कारभाऱ्यांनीं आपणाबरोबरची बहुतेक फौज हरीपंतांकडे पाठविली, व मोगल व भोंसले यांस आपआपल्या स्थळीं जाण्यास निरोप देऊन ते परत पुण्यास आले.

इकडे दादासाहेब पळत सुटले ते प्रथम धारेस गेले. नंतर आनंदीबाई गरोदर होती सबब तिला तेथें ठेवून ते उज्जनीस गेले. ते एकीकडे पळत होते व एकीकडे शिंदे होळकरांच्या मध्यस्थीनें समेटाचें बोलणेंही बोलतच होते! ते उज्जनीस पोंचतात तों पाठलाग करणाऱ्या फौजा जवळ आल्यासें पाहून त्यांनीं गुजरायेकडे पळ काढिला तें थेट बडोदें गांठिलें! तेथेंही हरीपंत व शिंदे होळकर येऊन पोंचतात तों दादासाहेब अहमदाबादेकडे कूच करून चालले. त्यांचा मुक्काम महीनदीच्या पलीकडे असतां अलीकडच्या तीरावर हरीपंत वगैरे सरदार आले. इकडचे थोडेसे लोक पलीकडे गेले त्यांस श्रीमंतांच्या फौजेनें परत हुसकून लाविलें, तों सायंकाळ झाला. पुनः दुसरे दिवशीं हरीपंतानीं श्रीमंतांवर चालून जाण्याची तयारी केली, तों शिंदे होळकर आडवे आले. त्यांनीं सांगितलें कीं, सल्ल्याचें बोलणें करण्याकरितां दादासाहेबांकडून आम्हांकडे वकील आले आहेत व आम्ही मध्यस्थ झालों आहों. श्रीमंतांचा व तुमचा सल्ला करून देतों. लढाई तहकूब करावी. त्यावरून लढाई तहकूब होऊन सल्ल्याचें बोलणें सुरू झालें. महीनदीच्या अलीकडे व पलीकडे उभयपक्षांचीं लष्करें सत्रा दिवस तळ देऊन राहिलीं होतीं. वकिलांची व मध्यस्थांचीं नित्य नवीं बोलणीं होत असल्यामुळें शेवटीं या वाटाघाटीपासून कांहींच निष्पन्न झालें नाहीं!

जानेवारी स० १७७५.

जानेवारी.

राज्यारूढ होण्याची दादासाहेबांची आशा अद्याप खुंटली नव्हती व सल्ला करावयाचें त्यांच्या मनांत अर्थातच नव्हतें. यापूर्वी चार सहा महिन्यांपासून ते आपणास कुमक करण्याविषयीं मुंबईकर इंग्रजांशीं बोलणें करीत होते. परंतु इंग्रजांची पैक्याची चिकाटी मोठी, व यांच्याही मनांत त्यांची कुमक होतां होईल तों घेऊं नये असेंच असल्यामुळें तें राजकारण तसेंच राहत गेलें. हल्लीं इंग्रजांचा आश्रय केल्याखेरीज तरणोपाय नाहीं अशी त्यांची खात्री झाली, आणि इंग्रज मागतील तें त्यांस देऊन त्यांची कुमक घेण्यास ते सिद्ध झाले! त्यासंबंधें त्यांचे व इंग्रजांचे करारमदार सुरतेच्या गव्हर्नरामार्फत हल्लीं ठरत होते. ते करारमदार पक्के ठरतपर्यंत हरीपंतांशीं शिंद्यांच्या मध्यस्थीनें सलोखा करितों असें दाखविण्याची ही फक्त हुलकावणी होती! हरीपंतांस म्हणजे हें कळत नव्हतेंसें नाहीं. त्यांस सर्व बातम्या होत्या. हीं सलोख्याचीं मायावी बोलणीं त्यानीं प्रथमच झिटकारिलीं असतीं, परंतु शिंदे होळकरासारखीं डोईजड प्रस्थें मध्यस्थीस पडल्यामुळें त्यांना निरुपाय झाला. इंग्रजांशीं पक्कें राजकारण ठरण्याचा रंग दिसूं लागल्याबरोबर हरीपंतांजवळ दादासाहेबांच्या अद्वातद्वा मागण्या सुरू झाल्या. आम्हांस वीस लक्षांची व मानाजी फांकड्यास दहा लक्षांची जहागीर द्यावी, सदाशिव रामचंद्र व सखाराम हरी यांस वीस वीस हजार स्वारांची सरदारी द्यावी, गोविंदराव गायकवाडास गुजराथ सबंध द्यावी, अशीं श्रीमंतांचीं बोलणीं एक ना दोन! त्यांत निदानचा पक्ष म्हणून शिंद्यानीं सांगितलें कीं, फौजेचें देणें फेडण्यासाठीं सरकारांतून श्रीमंतांस बत्तीस लक्ष रुपये द्यावे व देशीं गेल्यावर दहा लक्षांची जहागीर पूर्वी ठरल्याप्रमाणें द्यावी, याप्रमाणें कबूल असेल तर समेट करून देतों. त्यावेळीं हरीपंतांस क्रोध येऊन त्यानीं सांगितलें कीं, गुदस्तांपासून तुम्ही श्रीमंतांशीं समेट करून देतों म्हणून मध्यस्थी पतकरून त्यांस सरकारांतून मनस्वी पैका देवविलात, व अद्यापिही आणखी द्यावा असें म्हणतच आहां! मी फडनविसांचा कारकून. सरकारचे बत्तीस लाख रुपये दादासाहेबांस देण्याची माझी योग्यता नाहीं. तुम्हीं थोर सरदार आहां. तुम्हांस ती योग्यता आहे. श्रीमंतांस रुपये द्या, घ्या, काय पाहिजे तें करून त्यांची समजूत काढा. त्यांचा जिम्मा तुम्हांकडे लागला. आम्हांस येथें

राहण्याचें प्रयोजन नाहीं. असें बोलून ते कूच करून बडोद्यास आले. तों मागून शिंदे होळकरही तेथें येऊन त्यांस ह्मणूं लागले कीं, आम्हांविषयीं तुमच्या मनांत संशय आला आहे, तर आतां आह्मींच दादासाहेबांशीं लढाई करितों. तुम्ही उगीच आमचे मागें रहावें म्हणजे झालें. तें म्हणणें मान्य करून बाजारबुणगे बडोद्यास ठेवून सडे स्वारीनें शिंदेहोळकरांबरोबर हरीपंत परत आले. परंतु नंतर महीनदीच्या पैलतीरीं दादासाहेबांशीं गांठ पडून जें मोठें युद्ध झालें, त्यांत शिंदे होळकरानीं पुढारीपणा घेऊन कांहीं मेहनत केल्याचें दिसून येत नाहीं. लढाईचा सर्व बोजा हरीपंत व फत्तेसिंगराव गायकवाड यांवरच पडला. त्या लढाईंत दादासाहेबांचा पूर्ण पराजय होऊन त्यांच्या फौजेची दाणादाण झाली व ते मोठ्या कष्टानें जीव बचावून सुरतेस पळून गेले.

१७ फेब्रुवारी

दादासाहेबांची कुमक करण्याकरितां सुरतेस इंग्रजांची फौज तयार झालेलीच होती. ती घेऊन श्रीमंत खंबाइतेस आले. चोहोंकडे पांगलेली त्यांची फौज पुनः त्यांस तेथें येऊन मिळाली. नंतर इंग्रजांचीं पलटणें व तोफा व आपली फौज अशा जय्यत सरंजामानिशीं दादासाहेब पुण्यास येण्याच्या इराद्यानें बाहेर निघाले. इंग्रजांशीं लढाई म्हटली म्हणजे लभ्यांश कांहींच नाहीं व तडाक्यांचा मात्र सुकाळ! ती गोष्ट शिंद्यांस कसची पतकरते! ते या पूर्वींच कांहीं तरी निमित्त काढून हरीपंतांचा निरोप घेऊन फौजेसह उज्जनीस येऊन बसले. कांहीं दिवस गेल्यावर होळकरानींही तोच कित्ता गिरवून इंदूरचा रस्ता सुधारला. इंग्रज व दादासाहेब यांशीं लढण्याचा सर्व बोजा आयत्या वेळीं हरीपंतांवर टाकून हे दोघेही सरदार पुढें काय काय होतें याचा तमाशा पहात आपआपल्या ठिकाणीं स्वस्थ बसून राहिले!

१७ मार्च

१९ एप्रिल

साऱ्या पेशवाईंत नानास महादजी शिंद्याएवढे योग्यतेचे प्रतिस्पर्धी कोणी नव्हते. प्रस्तुतचे पुस्तकांत नाना फडनवीस यानीं आपल्या राष्ट्राचें संरक्षण करण्यासाठीं काय काय प्रयत्न केले हें दाखवावयाचें असल्यामुळें त्यांचे प्रतिस्पर्धी शिंदे यांजकडून त्यांस काय काय अडथळे आले याचाही विचार करणें जरूर झालें ती

हकीकत संक्षेपानें लिहितां लिहितां तिचा इतका विस्तार झाला! एतद्देशीय व इंग्रज इतिहासकार यांनीं महादजी शिंद्यांचीं सविस्तर स्तुतिस्तोत्रें गाइलीं आहेत तीं म्हणजे अनाठायीं आहेत असें मुळींच नाहीं. ते मोठे हिय्येबाज व कुशल सरदार होते, कर्ते व धोरणी मुत्सद्दी होते, या गोष्टी अगदीं निर्विवाद आहेत; पण त्यांच्या सरदारीच्या कौशल्यांत, कर्तृत्वांत व मुत्सद्दीपणांत जो एक अनिष्ट प्रकार होता तो आजपर्यंत कोणी चांगल्या रीतीनें दाखविल्याचें दिसून येत नाहीं, म्हणून तो आम्हीं येथें दाखविला आहे. यासंबंधाचे सविस्तर कागदपत्र आम्हीं ऐतिहासिक-लेखसंग्रहाच्या पांचव्या भागांत छापीत आहोंत, त्यांत या प्रकरणीं विशेष माहिती सांपडेल. या कुटिल वर्तनाच्या विद्येंत महादजी शिंदे हे मल्हारजी होळकरांचे पक्के शिष्य बनलेले होते. ते इतके कीं, गुरूची करामत जास्त कीं शिष्याची जास्त हें सांगतां येणें कठिण आहे! त्या काळच्या सरदार व मुत्सद्दी लोकांसंबंधें लिहितांना येथें हें सामान्यत: कळविणें न्यायाचें आहे कीं, पुण्याचे दरबारी—निदान सखारामबापू तरी—केवळ सद्गुणाचे पुतळे नव्हते! स्वस्थतेच्या दिवसांत ते सरदारांमागें नानाप्रकारें हिशोबाचें दुट्टे लावून त्यांस नडवीत, आपल्या घराचे उंबरठे झिजवावयास लावीत व चांगल्या प्रकारें 'समजूत' झाल्याशिवाय गप्प बसत नसत! इतकेंच कीं, ते सरदार लोकांच्या खजाल्या काढीत त्या व्यक्तिविषयक असल्यामुळें त्यांचा इतिहासांत बोभाटा नाहीं, आणि सरदार एखाद्या वेळीं लबाडी किंवा कुचरपणा करीत, तेव्हां राष्ट्राची हानि होई; यामुळें त्यांचा इतिहासांत बोभाटा झाला आहे! पुणें दरबारास शिंदे प्रतिकूळ झाले तेव्हां कसे वागले हें वर सांगितलेंच आहे. ते अनुकूळ झाले तेव्हां राष्ट्राच्या केवढाल्या महत्त्वाच्या कामगिऱ्या त्यांनीं बजाविल्या हें पुढें आम्हीच दाखविणार आहों.

शिंदे होळकर निघून गेल्यावर एकट्या हरीपंतांच्या फौजेस दादासाहेब व इंग्रज यांशीं लढणें प्राप्त झालें. हरीपंतांजवळ फौज कमी नव्हती; परंतु कारभाऱ्यांजवळ पैसा नाहींसा झाला व त्यांची सावकारांजवळ पतही तूर्त चालेना, त्यामुळें हरीपंतांच्या फौजेचे रोजमुरे तटले व तिला उपास पडूं लागले. अर्थातच ती फौज लढाईच्या कामास नालायक होत चालली. त्यांतून ती फौज फितविण्याचा

उद्योग दादासाहेब नेहमीं करीत होते, व इंग्रजांची मर्दुमीही विशेष, यामुळें हरीपंतांस यश येणें दुरापास्तच होतें. तथापि त्यानीं असल्याही बेदिल फौजेचा आब राखून दोन महिने कशी बशी लढाई केली. इंग्रजांशीं या अवधींत पांच चार झटापटी झाल्या, त्यांत इंग्रजांचें जें नुकसान होत गेलें त्या मानानें त्यांस फायदा कांहींच झाला नाहीं. त्यांपैकीं एका झटापटीस मराठे लोक 'नावलिनपाड्याची' अगर 'नापारची' लढाई असें म्हणतात. तिचें
१८ मे.
वर्णन वामनराव पटवर्धन यानीं लिहिलें आहे तें असें:— "श्रीमंत दादासाहेब खंबायतेंतून बाहेर आल्यावर दोन लढाया झाल्याचें वर्तमान लिहून पत्रे पुरंदरास पाठविलीं आहेत तो मजकूर तुम्हांस समजलाच असेल. वैशाख वद्य चतुर्थीस श्रीमंतांशीं लढाई मातबर झाली. हुजरात व साऱ्या फौजांनीं घोडीं घातलीं. तीन चारशें इंग्रज व गारदी मिळोन जिवेंच मारिले. तीन चारशें जखमी झाले. इंग्रजांची हिंमत बरीच मोडली. हुजरात वगैरे मिळोन शें दीडशें घोडे सरकारचे जायां जाहले. मालोजी घोरपडे याणीं शिपाईगिरीची शर्थ केली. त्यांकडील खाशांच्या घोड्यांसहित दहा पांच घोडे ठार झाले. त्यांचे बंधु राणोजी घोरपडे ठार झाले. खाशांस गोळीची व तलवारीची जखम लागली परंतु खैर आहेत. घोड्यास व खाशांस मिळोन बेवीस जखमा लागल्या ! घोडा ठार झाला. मालोजी बाबांनीं आपल्या लौकिकाप्रमाणें शिपाईगिरी केली ! राजश्री जयवंतराव पानशे यांस गोळी लागली. इजा फार आहे. खैर होईलसें वाटतें. राजश्री आनंदराव गोपाळ यांस गोळ्याचा धबका लागला आहे परंतु खैर आहेत. त्यांच्या चिरंजीवांसही दोन गोळ्या लागून सलामत आहेत. आणखी हुजरातींत शेंपन्नास लोक जायां जखमी आहेत. आम्हांकडील तिन्ही पथकांचे मिळून दहा पंधरा घोडे ठार झाले व कांहीं जखमी आहेत. चिरंजीव राजश्री जनोबा सुभेदार यांस गुडघ्याचे खालीं संगीन लागोन जखम झाली. चिरंजीवानीं तलवार चांगली केली. हरीपंत भिडे श्रीमंतांकडील यांस इंग्रजानीं जिवें मारिलें. याचें कारण इंग्रजांची कैद अशी कीं, श्रीमंतांकडील स्वारांनीं तमाम झाडपाल्याचे तुरे लावावे म्हणजे आपले ओळखीचे अशी खूण करावी म्हणून सांगितलें होतें. लढाईचे दिवशीं इं-

ग्रजांजवळ हरीपंत भिडे लढाई पहावयासाठीं आले. तों आम्हाकडील स्वार झाडपाल्यांचे तुरे लावून इंग्रजांचे फौजेंत शिरले, तों इंग्रजानीं हे स्वार कोणाचे ह्मणून विचारिलें. तों हे स्वार आपलेच असतील असें [ हरीपंत भिडे ] बोलिले. तों आमचे स्वारांनीं जाऊन इंग्रजांस मारिलें. तेव्हां हरीपंतानींच दगाबाजी केली म्हणून दादासाहेबांस सांगून त्यांचे रुबरू इंग्रजानीं श्रीमंतांचें म्हणणें मान्य न करितां हरीपंत भिडे यांस जिवें मारिलें ! श्रीमंतानीं व गोविंदराव गायकवाड यानीं इंग्रजांची कुमक कांहींच केली नाहीं, यामुळें फारच इंग्रज त्यांजवर रुष्ट आहेत. इंग्रजांकडील पांच चार मातबर सरदार ठार झाले.त्यांचीं घोडीं दोन एक चिरंजीव भाऊकडे व एक सरकारचे सुतर स्वारानीं पाडाव आणिलीं. सय्यद गोलंदाज सरकारचा चांगला होता तो ठार झाला. त्याचें इंग्रजानें डोचकें कापिलें ! लढाईचे दिवशीं बाडगीचें रान अडचणीचें होतें. मैदानांत गांठ इंग्रजांची पडती तर फडशाच होता ! या उपर गांठ पडल्यांवरी चिकाटी सुटणार नाहीं, असें समजून इंग्रजांनीं भडोचेचा आसरा करावा ह्मणून मही उतरून दोन मजली जलद अलीकडे आले. आतां आम्ही श्रीमंत दादासाहेबांचे पिछावर आहों. महीचा आसरा धरितील, घांट बंद करितील, असें वाटलें होतें. महीस मुक्काम न करितां निघाले, तेव्हां इंग्रजांचा मनसबा भडोचचा आसरा करण्याचा आहे असें वाटतें. येथून भडोच तीस चाळीस कोस आहे. सर्वांनीं मिळोन आज उद्यां फिरून इंग्रजांशीं गांठ घालावी असें आहे. यांत श्रीसत्ता प्रमाण ! इंग्रजांकडील दोन तोफा सोडविल्या होत्या, परंतु तोफांचे बैल सोडून त्यांनीं नेले, यामुळें तोफा काढावयास फावलें नाहीं. दारूगोळ्याच्या दोन पेट्या सांपडल्या त्या सरकारांत आणिल्या. तोफांचे कान्यांत खिळे मारून जायां करून टाकिल्या. तोफांचे गाडे जाळून टाकिले. माणसानीं तोफा काढाव्या, त्यांस इंग्रजांची निकड झाली म्हणून टाकिल्या. फिरंगी यांचीं पलटणें दोन तांबड्या कुडत्यांचीं, दोन काळ्या कुडत्यांचीं व दोन छिटाचे कुडत्यांचीं. एकूण सहा पलटणें. दर पलटणास एक हजार माणूस याप्रमाणें सहा हजार माणूस व दहा बारा तोफा व गोरा पांच सहाशें असेल. बाकीचें माणूस गाडदी व पंचमेळ कवाइतीचें तयार केलेलें आहे. एक पलटण शेलकें होतें तेंच अघाडीस आलें होतें. तेंच मारिलें गेलें. इंग्रजाची धमक बरीच

होती, परंतु त्यास (आमच्या) फौजेची कवाइत समजली ! " पावसाळा जवळ आला तेव्हां इंग्रज भडोच येथें छावणी करून राहिले, व हरीपंत थोडीशी फौज गुजराथच्या बंदोबस्तास ठेवून बाकी फौजेसह खानदेशांत येऊन छावणीस राहिले.

जून. जुलई.

पावसाळा संपल्यावर पुनः इंग्रजावर मोहीम सुरू व्हावयाची, तिची बरतूद आतां कशी करावी याबद्दल शिंदे होळकरानीं नांव सुद्धां काढिलें नाहीं. हरीपंत दूर गेलेसें पाहून इंग्रज भडोचेस होते, त्यानीं भर पावसाळ्यांत बाहेर पडून बहुतेक गुजराथ व्यापिली; पण त्याचीही शिंदे होळकरास कांहीं फिकीर वाटली नाहीं ! पुणें दरबारानें या प्रकरणीं चर्चा सुरू केली; तेव्हां धडपणें कांहींच उत्तर न देतां ते उलट कारभाऱ्यांवरच रुसवा करून आपापल्या घरीं स्वस्थ होते.

गेल्या मोहिमेंत यश आलें नाहीं तरी अजून हरीपंतांची लढण्याची हिंमत कायमच होती, यामुळें दसरा होतांच ते फौजेसह कूच करून गुजराथेकडे चालले. त्यांची फौज फितविण्याचा उद्योग दादासाहेबानीं अद्यापि सोडिला नव्हता. एकदां तर त्यानीं अर्धीमुर्धी फौज फितवून खुद्द हरीपंतांसच कैद करावें असा योग आणिला होता, व त्यांजजवळचे खिजमतगार सुद्धां वश करून घेतले होते. पण हरीपंततात्या नेहमींच फार सावधपणानें वागत असल्यामुळें ते याही संकटांतून पार पडले. त्यांची सगळीच फौज अशी घटके घटकेस बिथरणारी होती असें नाहीं. सखारामबापू व नाना फडनवीस यांचीं पथकें, पटवर्धन, रास्ते, पानसे, व हुजरातचे पाटणकर, निंबाळकर, घोरपडे, दरेकर वगैरे नामांकित पथकें अशी सोळा सतरा हजार फौज विश्वासाची व बऱ्यापैकीं होती. मुख्यत्वें याच फौजेच्या बळावर गेल्या खेपेप्रमाणें याही खेपेस इंग्रजांस गनिमी कावा दाखवून बेजारगतीस आणण्याचा हरीपंतांचा विचार होता. परंतु या दुसऱ्या मोहिमेस सुरुवात होणार तोंच कलकत्त्याहून वारन् हेस्टिंग्स् यानीं सखारामबापू व नाना फडनवीस यांजकडे तहाचा संदर्भ लाविला कीं, ' मुंबईकर इंग्रज हे आमच्या हाताखालचे असून आम्हांस न विचारितां त्यानीं दादासाहेबांचा पक्ष स्वीकारून तुम्हांशीं लढाई आरंभिली आहे; सबब ती आम्हीं आतां मना केली आहे. तुम्हींही

लढाई मना करावी. तहाचे करार मदार ठरविण्यासाठीं आम्ही तुम्हाकडे वकील पाठवितों.' कारभाऱ्यांनीं कालदेशवर्तमानावर नजर देऊन हें बोलणें मान्य केलें; आणि हरीपंतांस हुकूम पाठविला कीं, तुम्हीं आहां तेथेंच लढाईच्या तयारीनें रहावें; परंतु याउपर लढाईची आगळीक आपणाकडून होऊं देऊं नये. याप्रमाणें ही लढाई तूर्त बंद झाली.

आगस्ट.

वर सांगितल्याप्रमाणें तह ठरविण्याकरितां इंग्रजांचा वकील कर्नल अपटन् हा कलकत्त्याहून पुरंदरास आला तेव्हां पेशव्यांनीं दरबारांत समारंभानें त्याची भेट घेतली. पेशव्यांचें वय त्या वेळीं फक्त दीड वर्षांचें होतें! नानांनीं या पूर्वींच प्रघात घालून दिला होता कीं, विशेष प्रसंगीं श्रीमंतांस मांडीवर घेऊन पुरुषोत्तमराव दाजीनीं दरबारांत बसावें. श्रीमंतांनीं लोक मुजऱ्यास येतील त्यांचे मुजरे घ्यावे, ब्राह्मण असतील त्यांनीं नमस्कार केल्यावर त्यांस नमस्कार करावा, दाजी सुचवितील तेव्हां कोणा कोणाशीं योग्यतानुसार एखादा दुसरा शब्द बोलावा, व विडे द्यावे. हा प्रघात पाडिल्यामुळें श्रीमंत दरबारांत बसत तेव्हां त्यांची वृत्ति धीट व गंभीर दिसे. परंतु इंग्रज लोकांचे विचित्र पोषाख व गोरें तोंड पाहून हें मूल दरबारांत घाबरून रडूं लागल्यास फार विरुद्ध दिसेल व दरबारची इजत जाईल ही नानांस पंचाईत पडली! तसा प्रकार न घडावा म्हणून त्यांनीं आधीं आठ चार दिवस श्रीमंतांजवळ नेहमीं राहणारे हुजरे, कारकून, मानकरी वगैरे लोकांस इंग्रजांसारखीं कुडतीं व टोप्या वापरावयास लावून श्रीमंतांच्या नजरेस संवय करून ठेविली होती! त्यामुळें इंग्रज लोक भेटीस आले तेव्हां दरबारचा थाट यथास्थितपणें पार पडला. पुढें तहाविषयीं इंग्रजांशीं खलबतें सुरू झालीं त्यांत सखारामबापू, नाना फडनवीस, बारामतीकर कृष्णराव बल्लाळ काळे, कर्नल अपटन् व त्याचे सोबती दुसरे दोन इंग्रज व एक दुभाष्या याप्रमाणें सायंकाळीं बसत तीं मध्यान मध्यान रात्रपर्यंत खलबतें चालत! इंग्रजांस फार वेळपर्यंत जमिनीवर बसण्यांत श्रम होऊं लागले म्हणून कारभाऱ्यांनीं त्यांसाठीं खुर्च्या आणविल्या. मग त्यांनीं खुर्च्यांवर बसावें व आपण खालीं बसावें हें नीट न वाटून हेही खुर्च्यांवर बसूं लागले.

२८ दिसेंबर.

सन १७७६.

पण यांस तरी ती संवय कोठची ! पुरुषोत्तमराव दाजी लिहितात कीं, " कारभारी खुर्चीवर बसून फार भागले म्हणजे भुईवरही बसत असतात ! " आणखी त्याच पत्रांत ते लिहितात कीं, "इंग्रज बोलतात यांत सल्ला करावा संवरावा अशीं निर्मळपणाचीं बोलणीं बोलतात, परंतु ( तो कोणत्या शर्तीवर याचा ) गवस गवसूं देत नाहींत व कारभारीही त्यांस गवस गवसूं देत नाहींत ! " प्रथम दर्शनीं हे वकील किती साळसूद दिसले असले तरी मुंबईकर इंग्रजांपेक्षां हे नवीन आलेले कलकत्त्याचे इंग्रज लबाडी व लपंडाव करण्यांत कमी नाहींत हें नाना फडनवीस यांस लवकरच कळून आलें. तुह्मी आह्माशीं कां बिघाड केलात या प्रश्नावर इंग्रज वकिलांनीं जबाब दिला कीं, राज्याचे मालक दादासाहेब असतां तुम्ही कारभारी बंड करून त्यांच्या पाठीस लागलां असें आम्हांस कळल्यावरून आम्हीं त्यांची कुमक करून तुम्हाशीं लढाई केली. परंतु पुढें सवाई रावसाहेब जन्मास आले व तेच राज्याचे खरे वारस असें आम्हांस कळलें, तेव्हां लढाई मना करून आम्ही तह ठरविण्यास आलों ! सवाई रावसाहेब यांचा जन्म सन १७७४ च्या एप्रिलांत झाला. तारीख ६ मार्च सन १७७५ रोजीं मुंबईच्या इंग्रजांनीं दादासाहेबाशीं तह पक्का केला, व हरीपंतांशीं गुजराथेंत लढाई सुरू केली. मध्यंतरीं दहा महिने गेले. त्या अवधींत सवाई रावसाहेबांच्या जन्माचें वर्तमान मुंबईकरानीं कलकत्त्यास लिहिलें नसेल ही गोष्ट आधीं संभवत नाहीं. त्यांतून आपला कावा साधण्यासाठीं त्यांनीं ती बातमी चोरून ठेविली असेल असें जरी घटकाभर मानिलें, तरी नागपुरकर साबाजी भोंसले व बंगाल सरकार हे शेजारी असल्यामुळें त्यांचा त्यांचा निकट संबंध होता. बातम्यां लिहिणारे परस्परांचे वकील परस्परांच्या दरबारीं होते. साबाजी भोंसले हा बारभाईंच्या कारस्थानांत अग्रेसर होता व गंगाबाईस पुत्र होणें ही गोष्ट त्यास अत्यंत प्रिय व महत्वाची होती. तेव्हां असली गोष्ट घडून आल्यावर ती त्याच्या द्वारें उलाढाली व चौकस स्वभावाच्या कलकत्तेकर इंग्रजांस कळली नसेल हें बिलकुल संभवत नाहीं ! मुंबईच्या इंग्रजांनीं तुह्माशीं लढाई केली ती अन्यायानें केली हें आम्ही कबूल करितों, पण त्या लढाईपासून झालेले व होणारे फायदे मात्र आह्मी सोडणार

नाहीं, हें इंग्रजांचे वकिलाचें ह्मणणें ! पटवर्धनांचा वकील शिवाजीपंत म्हैसकर पुरंदरास होता तो इंग्रजांच्या ह्मणण्यांतील आशय ता० ७ जानेवारी सन १७७६ च्या पत्रांत कळवितो कीं, " कसेंही असो. आह्मी त्यांचा ( दादासाहेबांचा ) पक्ष धरिला तो बाजवी असो, अथवा गैरवाजवी असो, परंतु आह्मी सावकार; आह्मी नफा तोटा पहातों; त्यास दादासाहेबांबरोबर फिरल्यास ( तुह्मांशीं लढाई करीत फिरलों तेव्हां ) त्यांजकडून ( खर्चास ) पावलें तें वजा करून बाकी ऐवज व साष्टीमुळें लागला तो ऐवज द्यावा. साष्टी घ्यावी. ऐवज ठरेल तो द्यावयास अनुकूल नसल्यास सुरत अठ्ठाविशी परगणे श्रीमंतानीं पंधरा लक्षांचे महाल दिले आहेत ते ऐवज फिटेतों पावेतों ( आम्हा-कडे ) ठेवावे. ऐवज फिटल्यावर महाल हवालीं करूं. नाहीं तरी ऐवजाचा निकाल झाल्यास उत्तमच आहे. श्रीमंतानीं ( माधवरावसा-हेब यानीं ) किल्ले व जहागीर श्रीमंत राजश्री दादासाहेबांस दिली होती त्याप्रमाणें तुमच्या विचारास आल्यास द्यावी. आह्मी जामीन राहून त्यांस साळसूदपणानें वर्तवूं. ती गोष्ट तुमच्या विचारांत करा-वयाची नसल्यास आमचा आग्रह नाहीं. त्यांस आसरा ( आमच्या ) कोणत्याही बंदरास देऊं नये येणेंप्रमाणें बंदोबस्त करूं, अशा मोठमोठ्या गोष्टी बोलतात ! " पुढें फेब्रुवारी महिन्यां-तील एका पत्रांत तो लिहितो कीं, " इंग्रजाकडील तहाचा ठराव झालाच आहे. ( झाल्यासारखाच आहे. ) साष्टीचा प्रसंग मुंबईवाल्याच्या चित्तांत कसेंही करून ( साष्टी ) आपणाकडे राहीशी झाल्यास उत्तम आहे—ह्मणोन [ मुंबईवाले ] हिसके घेतात व यांच्या [ कारभाऱ्यांच्या ] मनसब्यास हिसके देतात. कारभारी यानीं साफच सांगितलें कीं, चार रुपये [तुम्हास] खर्च लागले आहेत त्याचा भलता विचार होईल. पण ( तुम्हांस ) साष्टी देऊन तह करावा ही गोष्ट परिच्छिन्न घडत नाहीं. त्याजवरून ( इंग्रजाचे वकील ) विचा-रांत पडले आहेत. साष्टी ( परत ) देऊन तह करितील. चार दिवस अधिक लागतील इतकाच प्रकार ! " नंतर मार्च महिन्यांत तह ठरला तेव्हांचा प्रकार त्यानें लिहिला कीं, " परवां सिद्धांत ठरोन यादी ज-हाल्या. पहिल्यापासून वकील आल्यावर ( त्यानीं ) अडमुद्दे फारच घातले होते. ' साष्टी घेतलीच आहे, वसई द्यावी. श्रीमंतांसमागमें

( पायदळ तोफा वगैरे ) सामान आपलें आहे, त्यास चाळीस पन्नास लक्ष रुपये लागले आहेत ते द्यावे, ( श्रीमंतानीं दिलेले ) सुरत अठ्ठाविशीचे वगैरे महाल ( व ) राजश्री फत्तेसिंग गायकवाड यांजपासून महाल त्यांच्या बचावासाठीं त्यानीं दिलेले आहेत त्यांचा गुंताच नाहीं. ( ते आमचे झालेच आहेत ! ) अशा प्रकारें त्यांचा फारच फैलावा होता. चार वेळां मध्यें रुसवेही झाले. ( परत जावयास ) निरोपही मागत होते. कारभारी यानीं निरोप दिला ! जितकें त्यानीं ओढावयाचें तितकें त्यानीं ओढिलें. यांणीं थांग लागूं दिला नाहीं ! आणखी ओढून त्यांस कांहीं न देतां तह करावा, असें मानस कारभारी यांचें होतें, परंतु ( तहाचें बोलणें सुरू होऊन ) दिवस फार जाहले, फौजेस पोटास नाहीं, फौज फार हैराण, दिवस अखेरीचे येत चालले, याजकरितां कांहीं इंग्रजाचें ऐकावें, इतका विचार चित्तांत आणून तह करून घेतला. " इंग्रज वकिलाची खरोखरी वर्तणूक या प्रकारची असून ग्रांट डफसाहेब त्याच्या नेमस्तपणाबद्दल, खरेपणाबद्दल, स्वभावाच्या सरळपणाबद्दल साक्ष भरतात, व म्हणतात कीं, दक्षिणी ब्राह्मण बडे कावेबाज ! त्यांच्याशीं बोलण्यास तो कसचा टिकतो ! *

---

* शिवाजीपंताच्या पत्रांतून उतारे वर दिले आहेत त्यांशीं डफच्या इतिहासांतील मजकूर ताडून पाहिल्यास गंमत वाटण्याजोगी आहे, सबब तो येथें उतरून घेतों—
—" As Brahmins in politics, misconstrue moderation and attribute concession solely to fear, they assumed a high tone of demand and menace, which Colonel Upton, judging by himself, believed to be firm and sincere.......Colonel Upton's correspondence bears ample testimony of sincerity and moderation ; but he was ill-qualified to conduct a negotiation with Maratha Brahmins.......They seconded their arguments with threats, and mistook the mild remonstrances of the envoy for timidity. Colonel Upton conceiving the negotiation at an end, expressed this opinion to the Governor-General and Council in a letter, dated 7th February, when they immediately determined to support the cause of Raghoba with the utmost vigour. They prepared troops for embarkation, etc. etc. etc.,...... but the ministers almost immediately after they had carried their menaces to the highest pitch, acceded at once to the greater part of Colonel Upton's original demands."

# प्रकरण पांचवें.

## शिंदे होळकरांचा रुसवा.

### आपसांत तंटे व द्वेष.

गुजराथेंत इंग्रजावर मोहीम सुरू करण्यापूर्वींच हरीपंतांच्या फौजें-तून निघून शिंदे होळकर घरीं येऊन बसले हें मागें आलेंच आहे. ती मोहीम संपवून हरीपंत खानदेशांत छावणीस आल्यावर महादजी शिंद्यांचीं पुणें दरबाराशीं लपंडावाचीं बोलणीं सुरूच होतीं. त्या बोलण्यांत मिरजेचे पांडुरंगराव पटवर्धन यांस मध्यस्थीस गुंतवावें असा शिंद्यांनीं यत्न केला; पण शिंदे लबाड आहेत, त्यांशीं त्यांच्याच तऱ्हेनें वागणें प्राप्त झालें आहे. तुम्ही मध्यस्थींत पडल्यावर तुमच्यानें निभावणी होणार नाहीं, असें नाना फडनविसानीं पटवर्धनांस साफच सांगितलें. यासंबंधें शिवाजीपंतानें निरनिराळ्या पत्रांतून नानांचे उद्गार लिहिले आहेत त्यावरून ते या सुमारास शिंद्यावर किती रागावले होते हें दिसून येतें.—

"राजश्री महादजी शिंद्यांच्या मध्यस्थीचा प्रकार— 'ते बहुचाल आहेत. त्यांच्या वर्तणुकीप्रमाणें त्यांशीं (वागणें) करावें लागेल. तुह्मांशीं बोलल्यानंतर त्याप्रमाणें निभावलेंच पाहिजे असा प्रकार आहे. याजकरितां या मध्यस्थींत पडों नये' म्हणोन श्रीमंत राजश्री नानानीं आम्हांस सांगितलें. त्यांजकडील कारकून तेथें आला असेल त्यास हें तिळमात्र कळों नये म्हणोन खलबतांत सांगितलें, याकरितां परिस्फुट न व्हावें. मनांतच असावें. 'दोन सालचा सरंजामाचा पैका (शिंद्यानीं) फौज न ठेवितां * * खालीं घातला आहे. तत्राप आम्ही आज जसें (ते) म्हणतील तसें कबूल करूं, परंतु पुढें जसा प्रसंग येईल तसें बोलूं व करूं याजकरितां मध्यस्थीस पडूं नये.' असें यांचें म्हणणें आहे. पत्र वाचून फाडून टाकावें."

"आपण पत्रीं राजश्री महादजी शिंदे यांचा मजकूर लिहिला त्या अन्वयें श्रीमंत राजश्री नानांच्या कानावर घातला. उत्तर प्रतिउत्तर जाहलें जे,'गुदस्तां श्रीमंत राजश्री दादासाहेब नर्मदा उतरोन गेल्यापासून बंदोबस्त करून देतीलसा भरंवसा शिंद्याचा आह्मास होता, त्या अन्वयें द्यावयाचें

बोलणें चालणें झालें होतें. श्रीमंतांस द्यावयाचें ह्मटल्याप्रमाणें निभावणी केली असतां निखालसता त्यांजकडून न जाहली. पुढें श्रीमंत मागती तिकडे गेले, राजश्री हरीपंततात्यांच्या व सरदारांच्या भेटी जाहल्या, नंतर साऱ्यानीं एकरूप होऊन पुरतेपणें ( श्रीमंतांचा ) बंदोबस्त होईसा करावा ती गोष्ट ( शिंद्यानीं ) न केली. होळकर तिकडे राहिले, हे उज्जनीस आले ! तत्राप आह्मी शिंदखेड वगैरे थोडेंबहुत दिलेंच. मातबर दरम्यान पडले असतां कोणती गोष्ट शेवटास न गेली. आतां आपणाकडे जें बोलतात तें पक्कें असल्यास त्याणीं सर्व प्रकारें मसलतीचा भार ध्यावा, इकडे बोलाविल्यानें इकडे यावें, गेली गोष्ट सुधारावी, म्हणजे त्यांची रदबदल न चाले असा विचार काय आहे ? अंगेजणी करून दाखविल्यावरी रदबदलीस जागा होत्ये. दार मदाराचा प्रकार करून द्यावा तरी मसलतीच्या उपयोगीं न पडतां भांडावयासीं जागा करून ठेवावी हे प्रकार त्यांचे ! यास्तव त्यांची पत एकनिष्ठतेची राहिली नाहीं. ती पत मेळवून पुढें कायम करून घ्यावी हें त्याणींच मनापासून केल्यास होईल. असें जाहल्यास सर्व प्रकार सोईनें घडतील ' याप्रमाणें बोलणें जाहलें आहे. "

" शिंदे यांचा प्रकार, आपण लिहिला त्या अन्वयें श्रीमंत राजश्री नानांस विनंती केली त्यास त्याणीं उत्तर केलें कीं, गुदस्तापासून आह्मी त्यांजकडील लक्ष कोणे तऱ्हेनें राखिलें, देऊं घेऊं केलें, कां कीं सर्व प्रकारें आमच्या लगामीं लागतील. मातबर सरदार, मर्द माणूस, इतक्या गोष्टी समजोनच करीत होतों. तीन चार मध्यस्थही जाहले. त्यांच्या ( शिंद्यांच्या ) हातच्या स्वदस्तुरच्या चिठ्या आह्मांस आल्या त्या भरंवशावर श्रीमंतांस पंधरा लक्ष रुपये त्यांच्या वचनावर दिले. त्यांच्या ( शिंद्यांच्या ) खर्चाची ओढ ह्मणोन लाख पन्नास हजार त्यांसही दिले. असें असतां आपल्या गुणास चुकले नाहींत ! असो. पुढें राजश्री हरीपंततात्याची भेटी जाहल्यानंतर वचन प्रमाण देऊन सर्वच त्यांस टाकून उज्जनीस आले ! त्यांची प्रामाणिकता कळोन तुह्मी रदबदली काय ह्मणोन करितां ? तुह्माकडे नाद असावा या करितां त्यानीं कांहीं रदबदलीही लाविली आहे ! तेथील क्षणभंगुर विचार. राजश्री बाळाराव त्यांजकडून येथें आले असतां त्यांजवर देखील त्यांचा विश्वास नाहीं. असो. त्यांचा प्रकार—तुह्मी आपणाप्रमाणें प्रामाणिकता पहातां—पण

ही गोष्ट त्या गांवींही नाहीं! आह्मी करार करूं त्या अन्वयें (त्यांस) मान्य असेल, व उज्जनीहून कूच करून येतील अशी तुमची खातरजमा पुरत असल्यास तुम्ही आमची निशापुरती कराल तर पूर्ववत् प्रमाणें [इकडून] निशा द्यावयासीं चिंता नाहीं. ते बेइमानी करीत असतां त्यांस थोडेंबहुत दिलेंच आहे. आपणास त्यांच्या वचनाचा भरंवसा कशावरून ती खातरजमा करून घ्यावी आणि आमची तुम्ही करावी. उपरांत समर्पक सांगणें तें सांगों.' याप्रमाणें ह्मणतात."

जेथपर्यंत इंग्रजांशीं बिघाड कायम आहे तेथपर्यंत कारभारी आपलें कांहीं एक नुकसान करूं शकत नाहींत हें महादजी शिंद्यास पक्कें माहीत होतें, आणि ह्मणूनच ते त्यांशीं वर लिहिल्याप्रमाणें चाळवाचाळवी करीत होते! इंग्रजांशीं तहाचें बोलणें लागलें आहे हें कोणच्या पल्लयावर जातें. इकडे त्यांचें लक्ष वेधून राहिलें होतें.तह ठरणार असें पक्कें वर्तमान कळल्यावर त्यानीं व होळकरानीं विचार केला कीं, मराठी साम्राज्याचा बंदोबस्त कितीही विस्कळीत झाला असला तरी अजून देखील निग्रहानुग्रह करण्यास कारभारी बरेच समर्थ आहेत. केवळ त्यांशीं फटकून वागल्यानें परिणाम लागणार नाहीं. असा विचार करून व फौजेसह देशीं निघून येण्याविषयीं कारभाऱ्यांचीं वारंवार पत्रें येत होतीं त्यांस मान दिल्यासारखें करून उभयतां सरदार देशीं येण्यास निघाले. पण त्यांतले त्यांत देखील आज येतों, उद्यां येतों, दोन मजली आलों, चार मजली आलों, याप्रमाणें थापा देत त्यानीं दोन तीन महिने माळवाप्रांतींच घालविले! प्रथम तुकोजी होळकर सहा हजार फौजेसह जून महिन्यांत आले ते वाफगांवास येऊन राहिले. तेथून त्यानीं आपल्या काय काय मागण्या होत्या त्यांची एक लांबच लांब याद दरबाराकडे पाठविली. त्या सर्व मागण्यांबद्दल सखारामबापूनीं एकच उत्तर दिलें. तें हें कीं, "राज्याचा विचार ह्या प्रकारचा झाला आहे. साऱ्यांनीं श्रीमंतांकडे पाहून निखालसपणें यांच्या पायांशीं वर्तावें. श्रीमंतांनीं कोणासही उणें केलें नाहीं. श्रीमंतांनीं आपल्या बरोबरीस आणलेले सरदार आहां. तुम्हींच बंदोबस्त करावा. आहे नाहीं पाहून जें करणें तें करावें. आपणास इच्छा कारभाराची नाहीं. समजोन म्हणेल त्याशीं समजोन उत्तर करूं. न समजोन ह्मणेल त्याशीं उत्तर तसेंच केल्याखेरीज परिणाम नाहीं!"

या उत्तराचा होळकराच्या मनावर कांहीं बऱ्या प्रकारचा परिणाम झालसें दिसतें. कारण कीं, ते पेशव्यांच्या भेटीकरितां वाफगांवाहून पुरंदरास आले. जुलईच्या सत्ताविसाव्या तारखेस श्रीमंतांच्या भेटी झाल्या. होळकरानीं श्रीमंतांस जवाहीर वगैरे नजर केलें. शिवाजीपंत लिहितो—" तदोत्तर दिवस चांगला पाहून किल्ल्यावर बोलावून उभयतां कारभारी व हरीपंत तात्या येणेप्रमाणें होळकरांशीं खलबत करून खातरजमा करून इमान प्रमाण घेतलें. बोलण्याचालण्यांत कांहीं कसर राहिली नाहीं ........त्यांजकडे सरकारचा वाजवी ऐवज येणें तो व अलीकडील कर्जपट्टी व दहक वगैरे यावा येविशींची यादी नारो गणेश व विष्णुपंतास समजाविली आहे. शिंदे नर्मदा उतरोन अहल्याबाईची भेटी घेतली, तों वाफगांवाहून होळकर भेटीकरितां आले ही बातमी जातांच लांब मजली करून तापी उतरोन गंगेवर आले. श्रावण वद्यांत भेटी होतील. त्यांजबरोबर दोन हजार फौज आहे, पण निवडक माणूस आणिलें आहे. ते येण्यापूर्वीं होळकरांचें नीट झालें. आतां गुंता नाहीं. समागमेंच आले असते तरी निखालसतेविशीं चार दिवस हिसके देते !" त्याप्रमाणें महादजी शिंदे देशीं आले त्यांच्या व श्रीमंतांच्या भेटी ता० १७ आगस्ट रोजीं झाल्या. त्यांजशींही कारभाऱ्यांनीं खलबत करून त्यांचें इमान प्रमाण घेतलें.

आनंदीबाई गरोदर असल्यामुळें धारेस राहिल्याचें मागें सांगितलेंच आहे. ती बाई तेथें सुरक्षितपणें प्रसूत होऊन राज्य बुडविणारे बाजीरावसाहेब पौष शुद्ध नवमीचे दिवशीं जन्मास आले. बाईनें नाना फडनविसांकडे साखर पाठविली होती. ती साखर नानांस परिणामीं किती कडू लागली ! आनंदीबाई बाळंतपणांतून उठल्याबरोबर हजारों भिल्ल व गारदी चाकरीस ठेवून जबरदस्तीनें त्या प्रांतींच्या रयतेपासून वसूल घेऊं लागली. अहल्याबाई व महादजी शिंदे खर्चाकरितां तिला पैका पुरवितात असें पुण्यास वारंवार बोभाटे येऊं लागले. उलटपक्षीं महादजी शिंद्यांनीं पुकारा केला कीं, बाईनें माझेंच घर फोडून माझी सरदारी भगीरथराव शिंद्यास देऊं करून मजशीं भांडावयास तयार केलें आहे ! आनंदीबाईस धरून आणण्याकरितां त्रिंबकराव शिवदेव यांचें दोन हजार स्वारांचें पथक पाठविलें, पण ती अशी एकाएकीं बधणारी बायको

१० जानेवारी सन १७७५.

नव्हती ! तिनें धारेचा किल्ला पुष्कळ महिनेपर्यंत नेटानें झुजविला. शेवटीं सन १७७६ च्या अखेरीस अगदीं निरुपाय झाला तेव्हां ती वेढा घालणाऱ्या फौजेच्या स्वाधीन झाली. मला अहल्याबाई-कडे पोंचती करा अगर पुण्यास घेऊन चला असें तिचें ह्मणणें होतें. परंतु तिला पुण्याच्या आसपास कोठें ठेवावें तर ती पेशव्यांच्या निवास अपाय करील आणि अहल्याबाईकडे ठेवावें तर तेंही नीट नव्हे, असें जाणून कारभाऱ्यानीं तिला नर्मदातीरीं मंडळेश्वर येथें बंदोबस्तानें ठेविलें.

बारभाईंच्या कारस्थानांत प्रथमपासून सखारामबापू अग्रेसर होते व हल्लीं पेशवाईचे मुख्य कारभारी तेच होते. परंतु त्यांचा जन्मापासून दुटप्पी स्वभाव सरदार व मुत्सद्दी लोकांस माहीत असल्यामुळें त्यांचा बापूपेक्षां नानावर भरंवसा जास्त होता. शिवाजीपंत तर सखारामबापू-वर मुद्दाम अनास्था केल्याचा स्पष्टपणें आरोप करितो. " येथें सारा विचार कब्जीप्रमाणें ( संभाजीचा प्रधान कलुषा याजप्रमाणें ) झाला आहे. सारेंच बुडवावें असा प्रकार वृद्धाचे वर्तणुकीवरून दिसतो. ' ते काय करितात, हे काय करितात, आठ दिवसांत पहा, पंधरा दिवसांत पहा काय करितो तें, ' असें म्हणतो, उपेक्षा करून सारें बुडवितो ! " सखारामबापू नुसती अनास्थाच करून स्वस्थ असते तरी बरें होतें, पण राज्यांत पुष्कळ मुत्सद्दी व सरदार लोकांविषयीं त्यांच्या मनांत द्वेष व मत्सर वसत असल्यामुळें त्या त्या लोकांवर संकटें आलीं असतां त्यांचें निवारण करण्यासाठीं नानानीं जी जी मसलत योजावी तिला बाह्यात्कारें अनुमति देऊन त्यानें आंतून हिसके द्यावे असें वारंवार होऊं लागलें ! ती गोष्ट उमगली तरी बापूंचें मन न दुखवूं देतां नानांस तो तो कारभार समेटून न्यावा लागे. परकी राजांशीं एकसारख्या लढाया सुरू होत्या त्यांत मराठी फौजेस पोटास न मिळाल्यामुळें ती अगदीं बिथरलेली व कुचकामाची होत चालली होती. मुलखांत चोहोंकडे बंडें उठल्यामुळें कोठूनच धड वसूल येईना, आणि इकडे तर फौजेच्या देण्याचे एकसारखे तगादे ! कर्नाटकांत हैदरअल्लीच्या बंदोबस्ताकरितां हरीपंत फडके व परशुराम-पंतभाऊ यांस पाठविण्याचा पुढें नानास प्रसंग आला, तेव्हां फौजेच्या खर्चाचा पैका न पोंचल्यामुळें तिकडे त्या दोघां सरदारांचे जे हाल

झाले ते काय वर्णावे ! कुजलेल्या फाटक्या राहुट्यांत भर पावसाळ्यांत परशुरामभाऊंचा स्वयंपाक व जेवण ! कां तर नवी राहुटी घेण्यास जवळ पैसा नाहीं ! हरीपंतांस विड्याचीं पानें मिळेनात व रात्रीं दिवट्यांत तेल मिळेना ! सारी फौज उपाशी, जनावरांस नित्य एकादशी, असें होऊं लागलें ह्मणजे शिलेदारांनीं वैतागून या दोघां सरदारांच्या दारांत धरणें द्यावें, त्यांस दोन दोन दिवस उपास पाडावे, त्यांचा हुकूम बिलकुल ऐकूं नये, आतां जीव देतों किंवा घेतों, नाहीं तर पोटास घाल, असें म्हणून तलवारी उपसाव्या, असेंही होत होतें ! सैन्याची शिस्त व त्यावर कदर राखण्याविषयीं ज्यांचा बाणा ते हरीपंत निराशेनें उद्विग्न होऊन लिहितात कीं, 'कोणाचे **डोळ्यांत** मर्यादा राहिली नाहीं' ! इकडे पुण्यांत हरीपंताकडे पाठविण्याकरितां पैका उत्पन्न करण्याची नानांनीं जी जी मसलत योजावी ती ती बापूनीं गुप्तपणें खटपट करून हाणून पाडावी ! दादासाहेबांचे मुंबईहून फितूर, आनंदीबाईचे धारेहून व मंडळेश्वराहून फितूर, मोरोबांचे पुण्यांतून फितूर, सखारामबापूचा अंतःस्थ कुढेपणा, फौजेची व मुलखाची ही दशा ! शिंदे होळकर देशीं आले त्यांनीं मदत करणें बाजूलाच राहून उलट तेच पदोपदीं असे रुसत होते कीं, त्यांची समजूत काढण्यांत नानांची मति गुंग होऊन जावी ! असें हें चोहोंकडून वादळ उठलेलें पाहून ज्याची छाती फाटली नाहीं, ज्यानें कारभाराचें सुकाणूं शहाणपणानें व एकनिष्ठेनें सतत सुयंत्रपणें अशाही स्थितींत चालविलें, त्या नाना फडनविसांची योग्यता कोण वर्णूं शकेल ?

पुरंदरावर सखारामबापूचा वाडा होता तेथें ते राहत असत. पण किल्ल्यावर घर बांधावयाचें नाहीं हा नानांचा प्रथमपासून कृतसंकल्प असल्यामुळें व तेथें त्यांस प्रारंभीं लहानसें घर दिलें होतें ते पुरेनासें झाल्यामुळें ते पुण्यांत राहूं लागले. आठपंधरा दिवसांनीं अगदीं जरूरीच्या कामाकरितां सखारामबापूंची भेट घ्यावीच लागल्यास ते पुरंदरास जाऊन येत. त्यांची पहिली स्त्री मागेंच वारली होती. दुसरी केली होती तीही याच सुमारास फार आजारी होती. तिजवर त्यांचें प्रेम होतें व तिला औषधोपचार त्यांनीं बहुत केले; परंतु शेवटीं ती त्याच दुखण्यांत वारली, त्यामुळें त्यांचें मन फार उदासीन झालें होतें.

राज्यकारभारांत त्यांस किती सुख होत होतें हें वर दर्शविलेंच आहे.

माघ शुद्ध १५ शके १६९८. त्यानीं याच वर्षीं तिसरें लग्न करून घेतलें. ही तिसरी स्त्री बाईचे गाडगीळ यांची कन्या होय.

त्या काळचे लोक भाविक असत. सवाई माधवराव जन्मास आले तेव्हां कांहीं विशिष्ट कार्याकरितां हा परमेश्वरच भूलोकीं अवतरला असें लोक मानीत! ज्या आनंदीबाईनें खुद्द नारायणरावसाहेब यांस मारविलें, तिच्या तडाक्यांतून तो गंगाबाईचा एक महिन्याचा गर्भ वांचावा असें नव्हतें. परंतु दैवाची अघटित घटना, यामुळें त्या गर्भावर जालीम औषधें वारंवार पोंचलीं असूनही निरुपद्रवी झालीं! मारेकऱ्यांच्या तलवारी बोथट झाल्या! तो गर्भ वांचला इतकेंच नाहीं, तर निर्बाधपणें वाढून सर्व लोकांच्या इच्छेप्रमाणें गंगाबाईस पुत्र झाला! पेशव्यांच्या जन्माचें भोळ्या भाविक लोकांस श्रीकृष्णावताराशीं साम्य दिसलें व ते उपजल्यावर त्यांवर आलेलीं संकटें निरसन झालीं तेव्हां ती भावना अधिकच दृढ झाली! पटवर्धनांची निष्ठा तर याप्रमाणेंच होती असें त्यांच्या शेंकडों पत्रांतील उल्लेखांवरून स्पष्ट होत आहे. श्रीमंत दोन वर्षांचे असतां हरीपंत फडके वगैरे सरदार गुजराथची मोहीम करून परत आले ते भेटीस आले. तो समारंभ पटवर्धनांचा वकील शिवाजीपंत म्हैसकर यानें वर्णिला आहे तो असा:—"डेऱ्यांत सरकारच्या भेटी जाहल्या. श्रीमंतांनीं आपल्या हातें सवांस विडे दिले. मुजरा सर्वत्रांचा घेतला. ब्राह्मण मंडळींस नमस्कार करा म्हटलें म्हणजे नमस्कार करावा. एक प्रहर पावेतों मोठी दाटी झाली. सर्वत्रांस पहावें अशी आस्था, याकरितां पंढरपुराप्रमाणें दाटी असतां मधीं उठावें व मातोश्रीकडे जावें हें नाहीं. एक आसनीं प्रहरपावेतों बसले होते. अवतारी होत! अंतर्ज्ञान!"

दादासाहेबांची चाकरी सोडून देऊन मानाजी फांकडे हरीपंतांबरोबर परत पुण्यास आले, तेव्हां त्यांची व श्रीमंतांची भेट झाली; तिचें वर्णन हरीवंशाच्या बखरींत दिलें आहे तें बरेंच मनोरंजक असल्यामुळें येथें देतों:—"मानाजी फांकडे भेटीस येण्याचें ठरलें तेव्हां नाना फडनवीस यानीं पुरुषोत्तमराव दाजीस सांगितलें जे, मानाजी फांकडे याजबरोबर बोलण्याचा आमचा कांहीं लाग नाहीं. त्याजबरोबर आपणच बोलावें. दाजी बोलले कीं, तुमचा पंचहत्यारी कसला जर करणार;

तरी मी त्याजपाशीं बोलतों. सारे माझे ओळखीचे आहेत! असें बोलले. नंतर कचेरीच्या वेळेस पुरुषोत्तमराव दाजी श्रीमंत रावसाहेब यांस आणावयास गेले तेव्हां बाईसाहेब बोलल्या कीं, दाजी, बाळास सांभाळावें. यानीं उत्तर केलें कीं, बाईसाहेब, आपण कांहीं काळजी करूं नये. पुरुषोत्तमराव जिवंत आहे तोंपर्यंत कोणाचें भय नाहीं! मानाजी फांकडे भेटीस येणार म्हणून सर्वत्रांस भय वाटलें. दाजी यानीं श्रीमंतांस कडेवर घेऊन कचेरींत आणन मसनदीवर बसविलें. शेजारीं तलवार घेऊन पुरुषोत्तमराव दाजी बसले. नाना फडनवीस व सखारामबापू झाडून मानकरी बसले. नंतर मानाजी फांकडे आले. त्यांस दोन समले, समागमें पंचवीस तीस खासे, याप्रमाणें आले. नीट कचेरींत येऊन मसनदीजवळ आले तों पुरुषोत्तमराव दाजी बोलले कीं, रावसाहेब, मानाजीरावास ताजीम द्यावी. असें म्हणतांच श्रीमंतांचे मसनदीवर खरनिसा करून समोर मध्येंच मसनदीजवळ ( मानाजी ) बसले. आणि कचेरींत चोहींकडे पाहून 'दाजी, रामराम!' असें म्हणतांच हे बोलले कीं, 'मानाजी बाबा, रामराम!' मग त्यानें कोणासही रामराम केला नाहीं. आणि बोलण्यास प्रारंभ केला. 'पुरुषोत्तमराव, मी कसा आहें तो मी आपल्या तोंडानें वर्णन करावेंसें नाहीं, परंतु मला हीं बामणें 'फितुरी' म्हणतात! त्यास आम्हास कोठेंही चाकरी करावयाची. दादासाहेब काय आणि हे पाय काय, त्यास आतां चाकरी पुरे! आम्ही कांहीं आईचे पोटांतून दाली बांधून आलों नाहीं. यानीं आम्हांस दाली बांधिली.' असें म्हणून गळ्यांतून पडदळसुद्धां तलवार काढून श्रीमंताचे पायांवर ठेविली. तों नाना फडनवीस यानीं खुणेनें पुरुषोत्तमरावांस सांगितलें जे, 'यास लवकर जाण्याचें करा!' असें म्हणतांच दाजी बोलले कीं, 'मानाजीबावा, हें काय करितां? तुम्हांस दाली बांधिली ती माघारी घ्यावयास बांधिली कीं काय, आणि तुम्हास फितुरी तरी कोण म्हणतो? तुम्हीं आपला सरंजाम खाऊन श्रीमंतांचे पायांशीं लक्ष ठेवून स्वस्थ असावें.' असें म्हणतांच मानाजी फांकडे बोलले कीं, पुरुषोत्तमराव, आम्हीं सरकारचे चाकर, आजपर्यंत सरकारची चाकरी कशी केली ती आपणांस माहीतच आहे. बरकड बामणांवाणी तुम्ही बामण नव्हत! तुमची खातरजमा मला आहे आणि माझी खातरजमा तुम्हांला आहे.

असें बोलतांच दाजी बोलले कीं, रावसाहेब, मानाजीबावांस तलवार उचलून द्यावी. असें म्हणून श्रीमंतांचा हात लावून तरवार उचलून आपण दिली. आणि बोलिले जे, मानाजी बावा, श्रीमंतांची भोजनाची वेळ झाली. निरोप घ्यावा. असें ह्मणून लागलीच विडे आणविले आणि श्रीमंतांचा हात लावून विडे दिले. आणि बोलिले जे, अहो, मानाजी बावांचे लोकांस विडे देणें, असें म्हणून त्याचे लोकांस विडे दिले. नंतर श्रीमंतांस सांगितलें जे, आतां निरोप द्यावा. असें म्हणून श्रीमंतांस उठावयाची खूण करितांच श्रीमंत उठले. तों मानाजी फांकडे मुजरा करून निघाले. दाजी बोलले जे, तुम्ही सरकारचे पायांशीं लक्ष ठेवून स्वस्थ असावें. कोणे गोष्टीची फिकीर न करणें. असें म्हणून त्यांस निरोप दिला. ते गेल्यावर नाना फडनवीस बोलले कीं, दाजी, आज आपण होतां ह्मणून मानाजी फांकडे असें बोलला. आमचा कांहीं त्याजबराबर बोलावयाचा लाग नव्हता; अहो, कचेरींत ह्मणतो हीं बामणें मला फितुरी ह्मणतात ह्मणून! त्यासीं काय बोलावें!"[1] ही भेट होऊन वर्ष सहा महिने लोटले नाहींत तों याच मानाजी फांकड्यानें हैदरअल्लीस अनुकूल होऊन हरीपंत फडक्यांची फौज फितविली व त्यांस कैद करून शत्रूच्या हवालीं करण्याचा घाट घातला! तो सर्व प्रकार पुढें दर्शविण्यांत येईल.

---

# प्रकरण सहावें.

## तोतयाचें बंड.

पानपतच्या युद्धांत सदाशिवराव भाऊसाहेब मरण पावले ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे. त्या युद्धानंतर कांहीं वर्षांनीं एक कनोजा ब्राह्मण मीच भाऊसाहेब असें ह्मणूं लागला. लवकरच त्याभोंवती भोळसर व लबाड लोकांचे थवे जमून पुकारा करूं लागले कीं, पानपतांतून जीव बचावून भाऊसाहेब पळून आले ते आजपर्यंत गुप्त होते. आतां ते आपलें स्वरूप प्रकट करून पूर्वींप्रमाणें राज्याचा कारभार करणार; याकरितां सर्वांनीं त्यांची आज्ञा शिरसावंद्य मानावी! हें मोठेंच बंड

माजणार होतें, पण माधवराव पेशव्यानीं तोतयास पकडून पुण्यास आणून चौकशी केली, आणि तींत तो अर्थातच
स. १७६६
खोटा ठरल्यामुळें त्यास दौलताबादेच्या किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. हल्लीं कारभाऱ्यांनीं निजामअल्लीस तो किल्ला दिला तेव्हां तोतयास तेथून काढून मिरजेस पाठविलें. तो तेथें जाऊन थोडे दिवस होतात तोंच पटवर्धनानीं कारभाऱ्यांस तगादा लाविला कीं, तोतया येथें असल्यानें कांहीं फितूर होऊन किल्ल्यास एखादा दगा होण्याचें भय आहे. या धामधुमीच्या दिवसांत
आगस्ट स. १७७५
आमचीं सर्व मुलें माणसें व चीजवस्त येथें असणार, याकरितां तोतया येथें नको. त्याची दुसऱ्या स्थळीं रवानगी करावी. त्यावरून कारभाऱ्यांनीं त्यास रत्नागिरीस रवाना करून देण्याचा हुकूम केला.

तोतयासारखे ढोंग करणारे लोक पुढें आले म्हणजे त्यांच्या बोलण्यावर डोळे मिटून विश्वास ठेवणारे हजारों अडाणी लोक त्यांस भेटतात. मोठमोठ्या शहाणे म्हणविणाऱ्यांच्या अकला या कामीं वेळोवेळीं गुंग झालेल्या आहेत ! मीच भाऊसाहेब आहें असें म्हणणारा आणखी एक तोतया कर्नाटकांत निर्माण झाला होता. त्यास हैदरअल्लीनें मोठ्या थाटामाटानें कांहीं दिवस आपल्या दरबारीं बाळगिलें होतें ! पानपतच्या गर्दींत नाहींसा झालेला हरीपंत फडक्यांचा भाऊ मीच आहें असें एक लुच्चा मनुष्य पुणें प्रांतीं सांगत फिरत होता ! त्या युद्धांत शत्रूच्या हातीं लागून मरण पावलेला प्रख्यात सरदार जनकोजी शिंदे मी आहें असें म्हणणाऱ्या आणखी एका लुच्चानें महाराष्ट्रांत चळवळ उत्पन्न केली होती व शिंद्याच्या घरच्या माणसांस कांहीं महिने दुग्ध्यांत पाडिलें होतें ! बाजीरावींत एका डोंगरी किल्ल्यावर कैदेंत मरण पावलेला चतुरसिंग राजे भोंसले मीच आहें असें म्हणणारा एक ढोंगी प्रकट झाला होता ! अशीं आणखी तोतयांचीं पुष्कळ उदाहरणें सांगतां येतील. या सर्व लोकांस त्या त्या वेळीं हजारों अनुयायी मिळाले, पण शेवटीं हे लोक खोटे ठरल्यामुळें त्यांचीं पारिपत्येंही झालीं. अव्वल इंग्रजींत पुण्यास एक बाई आली होती. ती सांगे कीं, मी सवाई माधवराव यांची बायको यशोदाबाई ! पुरंदरावर पेशवे सरकारचें द्रव्य कोठें पुरलेलें आहे तें मला माहीत

आहे. याप्रमाणें थापा देऊन तिनें पुण्यांतील कित्येक खानदानीच्या कुटुं-बांस कांहीं दिवस भुरळ घातली होती, पण त्या वेळच्या अधिकाऱ्यांनीं तिची चौकशी करून तिला शिक्षा केली तेव्हां लोकांचा भ्रम दूर झाला !

सदाशिवराव भाऊसाहेबांचें नांव घेणारा प्रस्तुतचा तोतया माजी पेशव्यांच्या कारकीर्दीत दोन दोनदां चार चारदां पक्की शहानिशा होऊन खोटा ठरला असूनही अद्यापि हा बैरागी खरोखरीच भाऊ-साहेब आहे असें म्हणणारीं हजारों माणसें होतींच ! आणि त्यांतलीं कित्येक थोर वजनदार घराण्यांतलीं होतीं ! विशेष खेदाची गोष्ट ही कीं, भाऊसाहेबांची स्त्री पार्वतीबाई हिला हा बैरागी आपला नवरा कशावरून नसेल, असा अद्यापि संशय केव्हां केव्हां वाटत असे ! भाऊसाहेब पानपतांत मेलेला नाहीं, तो कोठें तरी वेषांतर करून भटकत आहे, तो कधीं तरी प्रकट होऊन आपणास भेटेल, हा तिचा ग्रह कायमचा होता. तिनें सौभाग्यचिन्हें धारण करण्याचें व आपल्या नांवामागें 'सौभाग्यवती' हें उपपद लावण्याचें अजून टाकिलें नव्हतें. अलीकडे वर्ष सहा महिने पुरंदरची हवा, काळजी व यातायात यांनीं तिची प्रकृति बिघडून तिला क्षयाचें दुखणें जडलें होतें, व त्यांतून ती आतां वांचत नाहीं हें ठरलेंच होतें. पटवर्धनांच्या तगाद्यावरून कारभारी तोतयास मिरजेंतून काढणार हें ऐकिल्याबरोबर पुरुषोत्तमराव पटवर्धन पुरंदरास होते त्यांजकडे पुण्याहून पार्वतीबाईचे निरोप निक-डीनें वारंवार येऊं लागले. 'हे अशीं बैरागीपणाचीं सोंगें घेऊन हिंड-तात ! काय करावें !' अशी बाईच्या जिवाची तळमळ ! 'ईश्वरें आम्हास अशा संकटांत घातलें ! **यांचा** बंदोबस्त बऱ्याच खर्चावें-चाचा झाला आहे.' म्हणून तिचा जीव ओशाळलेला व उदास ! 'एका ब्राह्मणाची रवानगी तट्टू व दोन माणसें बरोबर देऊन मिर-जेस करित्ये. त्याचीं ( व तोतयाची ) भेटी आठ दिवस दोघांचीच खोलींत होय असें करावें. तिसरा कोणी आपला कारकून अथवा माणू-स जवळ न बसवावा.' असा तिचा वशिला ! मी कांहीं आतां या दुखण्यांतून वांचत नाहीं. याकरितां माझा काय तो सोक्षमोक्ष होईपर्यंत तोतयास 'चार दिवस मजबर दृष्ट देऊन तेथेंच ठेवणें.

सप्टेंबर.

आपली परलोकास जावयाची वाट झाली पाहिजे.' अशी तिची शेवटची प्रार्थना ! ! संसारांत अनेकांवर अनेक चमत्कारिक

प्रसंग येतात, पण यापेक्षां करुणास्पद प्रसंग सांपडणें अशक्य आहे ! परंतु अबलेच्या दुःखाची पर्वा निष्ठुर राजनीतीनें धरिली नाहीं ! कोणाचें कांहीं न ऐकतां पटवर्धनानीं तोतयाची रवानगी रत्नागिरीस केली.

रामचंद्र नाईक परांजपे म्हणून पेशवाईंत एक मोठा सावकार होता. त्याचा पेशव्यांच्या घराण्याशीं व इतर बडे घराण्यांशीं कांहीं आप्तपणाचा निकट संबंधही होता. त्या रामचंद्र नाइकाकडे हल्लीं रत्नागिरीची मामलत होती. तोतया रत्नागिरीस आल्याबरोबर रामचंद्र नाईक त्यास अनुकूळ झाला. एखादी मसलत करावयाची मनांत आणल्यास ती तडीस नेण्यास जवळ पैका असावा लागतो तो नाइकाजवळ पुष्कळ होता. पार्वतीबाईच्या मनाचा कल त्यास माहीत होता. तूर्त अस्वस्थतेचा व धामधुमीचा काळ असल्यामुळें योजिलेला बेत तडीस जाऊन पुढें आपणास अपरंपार फायदा होईल, अशी त्या लोभी सराफास खात्री वाटली. कांहीं वजनदार लोकांकडून त्यास प्रोत्साहनही मिळालें, त्यामुळें त्यानें तोतयास कैदेंतून मुक्त करून त्याच्या नांवाची द्वाही फिरविली. आणि त्याजकडून ऐश्वर्याचीं व अधिकाराचीं चिन्हें धारण करवून स्वारीचा लवाजमा त्यास तयार करून दिला व रत्नागिरीचा किल्ला व सुभा त्याच्या हवालीं केला. मग तोतयाची चोहोंकडे फत्तेच होत गेली. कोंकणचे व घांटावरचे हजारों लुच्चे लोक त्याभोंवतीं मिळाले. इचलकरंजीचे व्यंकटराव घोरपडे त्यास मिळाले. पटवर्धनांची सत्तावीस लाखांचीजहागीर तुझ्या नांवें करून देतों म्हणून थापा देऊन त्यानें परशुरामपंत भाऊंचा चुलत भाऊ हरबा अण्णा यास आपणाकडे फितावून नेलें. भाऊंचा मेहुणा रघुनाथराव कोलटकरही या फंदांत होता. पेशव्यांची मातोश्री गंगाबाई हिचा सख्खा मामा नारो शंकर म्हणून होता तो या तोतयाच्या बंडांत मिळाला होता ! पेशवे सरकारचें आरमार तोतयास वश झालें आणि विजयदुर्ग, देवगड, गोवळकोट, अंजनवेल, सुवर्णदुर्ग इत्यादि किल्ले त्याच्या हातीं लागले. त्यानें दक्षिण कोंकण काबीज करून उत्तर कोंकणावर स्वारी केली. त्याजवळ वीस हजार फौज जमा झाली व त्याच्या चौक्या बोरघांटावर राजमाचीपर्यंत बसत आल्या. तो आतां पुण्यावर चालून येण्याच्या गोष्टी बोलूं लागला व याच वेळीं सिंहगडच्या

स. १७७६ एप्रिल.

जून.

सप्टेंबर.

गडकऱ्यांत कांहीं डळमळ उत्पन्न झाली ! कारभाऱ्यांच्या फौजा गुजराथेंत, करवीर प्रांतीं व कर्नाटकांत गुंतल्या होत्या. शिंदे होळकर नुकतेच देशीं आले होते. तोतयाच्या बंडाचा मोड कसा करावा याची पंचाईत कारभारी अंमळ दिरंगाईनें करीत होते. तों तोतया शेणामेणाचा होता तो हं हं म्हणतां लोखंडाचा होऊन बसला !

दादासाहेबांचा बंदोबस्त करण्याच्या कामीं महादजी शिंद्यानीं लबाडी केल्यामुळें तो मनसबा जो एकदां नासला, तो कारभाऱ्यांनीं किती अक्कल लढविली तरी पुनः सुधारलाच नाहीं ! शिंद्यांच्या दुष्ट वर्तनामुळें दादासाहेबांस इंग्रजांकडे निसटून जाण्यास फावलें एवढेंच नाहीं, तर दुसरीं अनेक संकटें राज्यावर एका मागून एक प्राप्त झालीं ! शिंदेहोळकरानीं आयत्या वेळीं हरीपंतास सोडल्यामुळें त्यांस गुजराथेंत इंग्रज व दादासाहेब यांशीं लढाया झाल्या त्यांत यश आलें नाहीं, त्यामुळें पुनः दुसरे वर्षीं युद्धाचा उपक्रम करावा लागून पेशवे सरकार मनस्वी खर्चाखालीं आलें. पुणें दरबारास शिंदे होळकर अनुकूल नाहींत व राज्यांत एकी नाहीं, असा चोहोंकडे बोभाटा झाल्यामुळें कारभाऱ्यांस इंग्रजांशीं नुकसान सोसून तह करावा लागला, व निजामअल्लीच्या दरडावणीस भिऊन त्यास नवीन अठरा लक्षांचा मुलूख जहागीर द्यावा लागला ! हैदरअल्लीनें कर्नाटक बळकाविलें, कोल्हापुरकरानीं पेशव्यांचा मुलूख लुटण्याची सुरुवात केली. कित्तूरच्या देसायाचें बंड, सुरापुरकरांचा दंगा, प्रतिनिधींचा दंगा, घांटबंधारीस कोळ्यांचा दंगा, अशीं किती ह्मणून अरिष्टें वर्णन करावीं ! आणि सर्वांहून अधिक भयप्रद असें पूर्वीं वर्णिलेलें तोतयाचें बंड ! या सर्व अनर्थांस प्रत्यक्ष अथवा परंपरेनें महादजी शिंदेच कारणीभूत झाले होते ! सखारामबापूचा कुटिल वर्तनाचा क्रम पूर्वीप्रमाणें अद्यापि सुरू होता. अशा वेळीं शिंदे होळकर पुण्यास आले ते अद्यापि रुसव्यांतच होते. राज्यांत चोहोंकडे माजलेले बखेडे मोडण्याऐवजीं हे सरदार नवीन बखेडे उत्पन्न करूं लागले ! अशा या बिकट प्रसंगीं नाना फडनवीस यानीं जी मसलत योजिली तिजवरून त्यांच्या राजकीय धोरणाचें गूढ रहस्य उमगूं लागतें. शिंदे हे कर्ते व शूर सरदार खरे, पण ते जे इतके डोईजड होऊन राज्याचा नाश करण्यास आजपर्यंत कारण झाले आहेत ते होळकरांच्या मदतीमुळें होत. याकरितां

ही डोईजड झालेली शिंदे होळकरांची जोडी फोडून या दोघा सरदारांत किंचित् तेढ उत्पन्न करावी व दोघांपैकीं कोणा तरी एकास नेहमीं आपले लगामीं लावून ठेवावें; याप्रमाणें मसलत योजून तिच्या अनुरोधानें नाना फडनवीस आमरणांत वागत गेले. हळ्ळीं प्रथम त्यानीं महादजी शिंद्यास पूर्ण अनुकूल करून घेतलें. नानांपेक्षां सखारामबापूविषयीं शिंद्यांच्या मनांत अधिक वांकडें होतें यामुळें शिंदे व नाना यांची मैत्री जुळण्यास उशीर लागला नाहीं. सन १७७६ पासून १७८१ पर्यंत सरासरी पांच वर्षें ही नाना व शिंदे यांची गट्टी होती. त्या मुदतींत शिंद्यानीं मोठमोठे पराक्रम करून राज्यांतील बखेडे मोडिले व सरकारचीं मोठमोठीं कामें केलीं. परंतु त्यानंतर ते पुनः बिथरून पूर्वीप्रमाणें चाळे करूं लागले. त्या समयीं नानानीं शिंद्यावरच केवळ अवलंबून न राहतां त्यांस टाकून होळकरांशीं गट्टी केली, व ती गट्टी मात्र शेवटपर्यंत चालली. या तिघांमध्यें केवळ वैरबुद्धि परस्परांशीं उत्पन्न झाली होती.असें यावरून कोणी समजूं नये. 'सारीं एकाच आईचीं लेंकरें' ही समजूत तिघांचीही असून बाह्यात्कारें ते पूर्ण सलोख्यानेंच वागत. अंतःस्थ वर्तनांत थोडा डावा उजवा प्रकार होता एवढेंच ! शिंदे होळकरांत दुही उत्पन्न केल्याबद्दल पुष्कळ लोक नानांस दोष देत असतात; परंतु त्यांस त्या वेळीं घडलेल्या पूर्वापर गोष्टींचा संदर्भ ठाऊक नसतो. शिंद्यांची वागणूक कसकशी होत गेली याविषयीं या पुस्तकांत सविस्तर नवीन माहिती देऊन आह्मीं हा संदर्भ दाखवून दिला आहे. यावरून पाहिलें तर राज्याच्या बचावासाठीं त्या दोघां सरदारांत दुही उत्पन्न करणें नानास त्या वेळीं भाग पडलें व तोच त्या प्रसंगास योग्य उपाय होता, असें विचारी मनुष्याच्या सहज लक्षांत येईल. शिंद्यांस आपणाकडे वळवून घेण्याकरितां नानानीं त्यांस सांगितलें कीं, तुम्ही जें जें मागतां तें तें सोयी सोयीनें द्यावयास येईल. आजच अडवाल तर सखाराम बापू ऐकणार नाहींत. पुढें त्यांचेंही मन वळवून आह्मी तुमचीं कामें करून देऊं. शिंद्यांचा नानावर विश्वास होता. नाना ह्मटल्याप्रमाणें करितील असें मानून ते प्रत्येक मसलतींत त्यांस मदत करण्यास तयार झाले. शिंद्यांच्या सरंजामाचे मागचे हिशेब तपासून विल्हेस लावावयाचे होते त्या

कामीं नानानीं त्यांस कांहीं सवलत याच वेळीं दिली असावी असें वाटतें.

तोतया पुण्यावर चालून येतो असें वर्तमान कळल्यावर आतां त्याची उपेक्षा करणें अशक्य झालें. तें बंड मोडण्यासाठीं सरकारांतून भिवराव पानशे यांची रवानगी झाली. पानशानीं बोरघांटांत तोतयाशीं दोन तीन लढाया करून त्यास मागें सारिलें. तों इतक्यांत पानशांच्या मदतीस स्वतः महादजी शिंदेच फौज घेऊन आले. मग एक मोठी लढाई होऊन तोतयाचा पराजय झाला व त्याच्या फौजेची दाणादाण झाली. खुद्द तोतया मुंबईस इंग्रजांकडे पळून जात होता, पण वाटेंत त्यास रघोजी आंग्र्यानीं पकडून पुण्यास आणिलें. आपली चौकशी झाल्याखेरीज शिक्षा होऊं नये असें तोतयानें रघोजी आंग्र्यांपासून वचन घेतलें होतें त्यामुळें त्याची पुनः चौकशी करावी लागली. ती करण्यासाठीं कारभाऱ्यांनीं पंचाईत नेमिली होती तींत रामशास्त्री न्यायाधीश, गोपीनाथ दीक्षित, धोंडोबा पुरंदरे, हरीपंत फडके, बाबूजी नाईक बारामतीकर, त्रिंबकपंत वर्तक इत्यादि सत्तावीस पंच होते. ज्यांस तोतयाबद्दल संशय होता ते व सदाशिवराव भाऊसाहेबांच्या लहानपणापासून परिचयाचे लोक प्रमुख प्रमुख निवडून वरील मंडळीखेरीज मुद्दाम या पंचाइतींत पंच नेमिले होते. सर्वांनुमतें तोतया खोटा ठरल्यावर " तोतयास गाड्यावर घालून बाजारांतून फिरविला. ज्यांस ज्यांस संशय राहिले होते त्यांस त्यांस दाखविलें. शेवटीं उंटावर बसवून फिरविला. आणि चार घटका दिवसास मेखसूनें डोकें फोडून मारिला. "

आक्टोबर सन १७७६.

१८ डिसेंबर.

नंतर तोतयाच्या बंडांत सामील झालेल्या गुन्हेगार लोकांचीं पारिपत्यें झालीं त्यांत नानानीं बराच कडकपणा धरिला होता असें दिसून येतें. कारण कीं बंडखोर लोक ब्राह्मण असले तरी दया न धरितां त्यांस मारून टाकावें, त्यांची मालमत्ता सरकारांत घेऊन बायका पोरें कैदेंत टाकावीं, अशी तें परशुरामभाऊंस ताकीद करितात व 'आमच्या सरदारांचीं सल्लेंच जात चालली' असा भाऊस टोमणा मारितात ! परशुरामभाऊंचा चुलत भाऊ या बंडांत होता

सन १७७७.

जानेवारी

त्याचा भाऊनीं मोठ्या मिनतवारीनें गुन्हा माफ करून घेतला. तथापि जबर द्रव्यदंड हा द्यावा लागलाच. जीव मात्र बचावला इतकेंच. तीच गोष्ट भाऊंचे यजमान व्यंकटराव घोरपडे यांची. त्यांचा सरंजाम तोतयाच्या गुन्ह्यांत सामील झाल्याबद्दल सरकारांत जप्त झाला होता, तो सोडतांना नानानीं एकसाली नजर साठ हजार रुपये व गुन्हेगारी सव्वालक्ष रुपये घेतली ! भाऊंचा मेहुणा कोलटकर हा पार्वतीबाईचा भाऊ असल्यामुळें तिच्या रदबदलीवरून त्याचा जीव बचावला. गंगाबाईचा मामा लढाईंत मारिला गेला. बंडाचा उत्पादक रामचंद्र नाईक परांजपे याचे हाल तर पुसूंच नयेत ! त्याचें सर्व द्रव्य व मालमत्ता सरकारांत जाऊन कुटुंबांतल्या माणसांसुद्धां सर्वांच्या पायांत बिड्या पडून डोंगरी किल्ल्यांवर कैदेंत पडावें लागलें. जागजागींचे बंडखोर धरून शिक्षा करण्याचा हा क्रम कित्येक महिने चालला होता.

या बंडासंबंधें हजारों ब्राह्मणांस तोतयाचा संसर्ग झाल्यामुळें त्यांस प्रायश्चित्तें देऊन शुद्धि करण्याचा विषय धर्मशास्त्राचा होता. सबब तें काम रामशास्त्री यांच्या सल्ल्यानें उरकण्यांत आलें. हीं प्रायश्चित्तें 'सरकारी ' असल्यामुळें सर्व राज्यांत एकाच दिवशीं सरकारी अम्मलदारांसमक्ष जागजागीं सक्तीनें घेवविण्यांत आलीं. "तोतयाचे पंक्तीस ज्यानीं प्रत्यक्ष अन्नव्यवहार केले व तोतयाची श्रावणी ज्या ब्राह्मणानीं केली व श्राद्धपक्षाचा क्षण ज्या ब्राह्मणानीं घेतला असेल, त्या ब्राह्मणांस तूर्त प्रायश्चित्त द्यावयाचें नाहीं " अशी ताकीद होऊन त्यांस मात्र पुष्कळ दिवस बहिष्कारांत गंटगळ्या खात टाकण्यांत आलें ! या अव्वल नंबरच्या आरोपींस जेव्हां प्रायश्चित्तें दिलीं तेव्हां तीं जबरच दिलीं असतीलसें वाटतें. कारण कीं व्यंकटराव घोरपडे यांस हा अव्वल नंबरचा संसर्ग घडल्याची जरी सरकारास खात्री नव्हती, तरी सुद्धां त्यांस 'तीन चांद्रायणें सुवर्ण—प्रत्याम्नायें बाराशें रुपयांचें प्रायश्चित्त ' नेमून तें कृष्णातीरीं क्षेत्र खिद्रापूर येथें घेण्याबद्दल रामशास्त्री यानीं आज्ञा केली होती. बाकी वरील संसर्गी यांची "बहुत वेळ पंगत ज्यांस झाली त्यांस मुंडनपूर्वक प्राजापत्य, एक वेळ पंगत झाली त्यांस अर्ध प्राजापत्य, संसर्गी यांचे संसर्गी यांची अनेक वेळ पंगत झालेल्यांस पाद-प्राजापत्य व एक वेळ झाली त्यांस उपोषणपूर्वक पंचगव्य." याप्रमाणें प्राय

श्चित्तें नेमलेल्या तिथीस एकदांच सर्व राज्यांत झालीं ! या ताकीद-
मार्ग० व० १४ पत्रांतून एक कलम चमत्कारिक व ध्यानांत
श० १६९८ ठेवण्याजोगें आहे. तें असें कीं " ज्याकडे दोष बहुत असोन थोडका असें मिथ्या बोलोन पंचगव्य घेतलें ह्मणेल त्याजपासोन गुन्हेगारी घेऊन त्यांची नांवनिशी हुजूर लिहून पाठविणें ! " कोणत्याही काळीं मनुष्यस्वभाव म्हटला म्हणजे इथून तिथून एकच ! तोतया जातीनें कनोजा ब्राह्मण असून त्याचें नांव सुखनिधान असें होतें. वर सांगितलेलीं प्रायश्चित्तें कनोजाच्या संसर्गाबद्दल झालेलीं नव्हत, तर ' सुखनिधान तोतया पतित ' याच्या संसर्गाबद्दल होत. पण तोतया कोणत्या पातकामुळें ' पतित ' ठरला ? राजद्रोहामुळें ?

सन १७७७ च्या जुलैंत गंगाबाईस नवज्वराचें दुखणें होऊन ती मरण पावली. त्यासंबंधें शिवाजीपंताच्या पत्रांत उल्लेख आहे तो— " श्रीमंत मातोश्री गंगाबाई यांसीं नवज्वराचा उपद्रव जाहला. ज्वर आल्यापासून आठव्या दिवशीं आषाढ शुद्ध सप्तमी मंदवारीं प्रातःकाळच्या दीड प्रहर दिवसास देवाज्ञा झाली. ईश्वरें मोठा घात केला. श्रीमंत लहान. मातोश्री ह्मणजे पांघरूण होय. मोठी अनुचित गोष्ट झाली. " यानंतर दहा दिवसांनीं लिहिलेल्या एका पत्रांत शिवाजीपंत म्हणतो कीं, " श्रीमंत मातोश्री बाईंचें वर्तमान कळलेंच असेल. अलीकडील वर्तमान तर रावसाहेब बाईसाहेबांविषयीं पुसतात, ' मातोश्री कोठें आहेत ?' तेव्हां सांगणार सांगतात कीं, ' देवास गेल्या आहेत. ' त्यांस ' आणविणें ' म्हटल्यावर ' आणवितों ' ह्मणतात !" यावर परशुरामभाऊ उत्तर लिहितात कीं, " श्रीमंत राजश्री रावसाहेब मातोश्रींची आठवण करितात म्हणून लिहिलें, त्यास ईश्वरी इच्छेस इलाज काय आहे ? ते प्रतापी पुरुष अवतारी आहेत ! त्यांस दुसऱ्यानें समजावावें असें नाहीं ! " गंगाबाईनें मरतेवेळीं रामचंद्र नाईक याचा गुन्हा माफ करून त्यास कैदेंतून सोडण्याविषयीं कारभाऱ्यांस सांगितल्यावरून त्यांनीं त्यास मुक्त केलें.

त्या काळच्या राजकीय पत्रव्यवहारांत पुणें शहरच्या व्यापारासंबंधें व सांपत्तिक स्थितीसंबंधें केव्हांकेव्हां उल्लेख येतात त्यांवरून तशा बंडाळीच्या दिवसांतही ती स्थिति अगदींच वाईट होती असें ह्मणवत नाहीं. गतवर्षीं इंग्रजांशीं लढाई सुरू झाली तेव्हां मुंबईचा मराठी राज्याशीं चालणारा

व्यापार नानांनीं सक्तीनें बंद करविला. मुंबईची वस्ती निवळ व्यापारी लोकांची असल्यामुळें तिच्या नाड्या तत्काळ आंखडल्या ! सावकारा व सराफा ठार बुडाला. व्यापाऱ्यांचीं दिवाळीं निघालीं. विलायतेहून व चिनाहून मालानें भरून आलेलीं तारवें मुंबईच्या बंदरांत तटून राहिलीं. या कारणांमुळें मुंबई सरकारची तिजोरी अर्थातच रिकामी होऊन लढाईवर नमूद असलेल्या आपल्या फौजेचा खर्च चालविण्याचें त्या सरकारावर मोठें संकट येऊन पडलें. त्या वेळीं पुण्याचे व्यापारी लाख पाऊण लाख रुपये सरकारांत नजराणा भरतों, मुंबईशीं व्यापार करण्याची परवानगी द्या, असे नानास वारंवार अर्ज करीत होते. व्यापार बंद करण्यांत सरकारचें जकातीचें नुकसान जबर होत होतें तरी नानांनीं व्यापाऱ्यांचा अर्ज मान्य केला नाहीं ! यावरून ध्यावयाची गोष्ट. येवढीच कीं, लाख रुपये फक्त नजराणा देण्याइतक्या किंमतीचा एकट्या पुण्याचा मुंबईशीं व्यापार त्या काळीं होता ! जेव्हां आगगाड्या, सडका हे कांहीं नव्हते, राज्यांत धामधूम पराकाष्ठेची माजली होती, अशा काळांत हा व्यापार थोडका नव्हे ! एकोत्रा व्याज कबूल करून व जबरी करून सुद्धां सरकारास कर्ज मिळविण्याची मारामार पडे, यावरून या राज्यक्रांतीच्या दिवसांत सरकारची पत उतरत चालली होती हें साहजिकच आहे. हरीपंतांच्या फौजेचें कर्ज फेडण्याकरितां व त्यांची कर्नाटकांत रवानगी करावयाची तिच्या तयारीसाठीं कारभाऱ्यांनीं पैका उत्पन्न करण्याचे जे उपाय योजिले, त्यांत पुण्यांतील सावकारांपासून जबरीनें कर्ज मिळविणें हा एक होता. पटवर्धनांचा एक कारकून लिहितो—“ पुण्यांत प्रस्तुत कर्जपट्टीचा कडाखा झाला आहे. चौसष्ट लक्षांची पट्टी सराफवदंता, परंतु तीस चाळीसपावेतों असेल. वल्लभ सुंदर यांची तीन लक्षांची निशा जाहली. बाळोबा नाईक लक्ष देतो, परंतु ऐकत नाहींत. चौकी बसली आहे. याचप्रमाणें जोग, गद्रे, ताटके, थत्ते, भावे, रामाजी नाईक दातार, त्रिंबक विनायक चाबूक स्वार, तापीदास काशीदास, वाघोजी बगाडे, भुतकर, कहानदास, यांच्या घरीं चौक्या बसल्या आहेत.” भोकरे, वानवळे व हरिभक्ति या बड्या सावकारांचीं नांवें या यादींत नाहींत. कारण कीं, ते यापूर्वींच कर्ज देऊन गुंतले होते. शिवाजीपंताच्या लिहिण्यांत या कर्जपट्टीचा ऐवज शेवटीं सारा पंधरा लाखपेतों जमा झाला ! आतां तह झाला सवरला, आतां पुण्याचा

व्यापार कां सुरू होत नाहीं ? असा मुंबईसरकारनें आपल्या पुण्याच्या वकिलास प्रश्न विचारिला, तेव्हां त्यानें जबाब दिला कीं, आतां व्यापारास दरबारची आडकाठी नाहीं, पण दरबार कर्ज मागेल या भयानें यंदां आतां व्यापारी पैका बाहेर काढीत नाहींत ! ! !

---

# प्रकरण सातवें.

## कर्नाटक प्रांतीं मोहीम.

### कोल्हापुरावर स्वारी.

या सुमारास पुणें दरबारास दोन गोष्टींचा विचार करणें प्राप्त झालें होतें. पैकीं पहिली हैदरअल्लीस मागें हटवून त्यास अंकित करून त्यापासून खंडणी वसूल करण्याची. ती मसलत पूर्वीप्रमाणें एकटयानेंच करण्याचें आतां पुणें दरबारास सामर्थ्य राहिलें नव्हतें, याकरितां निजामअल्लीस मिळवून घेऊन तो व आपण मिळून ती मोहीम करावी असा विचार घाटत होता. दुसरी गोष्ट कोल्हापुरकरांचा दंगा मोडण्याची. ती मसलत महादजी शिंद्यांच्या गळ्यांत अडकवून देण्याचा नानानीं निश्चय केला. तोतयाचें बंड मोडल्यावर संगमनेरच्या देशमुखाची कन्या नवरी पाहून ठेविली होती तिजशीं लग्न करण्याकरितां महादजी शिंदे जांबगांवास गेले होते. मार्गशीर्ष व० नवमीस लग्न झालें. नंतर बरेच दिवस ते तेथेंच स्वस्थपणें राहिले होते. करवीरकरांचें पारिपत्य करण्यासाठीं मोहीम करण्याचें नानाच्या आग्रहावरून त्यानीं पतकरलें व आपली फौज रहिमतपुरापावेतों नेली, पण तेथें ते चार महिने छावणी करून राहिले. त्यानीं नानास सांगून पाठविलें कीं, पूर्वी कबूल केल्याप्रमाणें आमचें काम करून द्या ह्मणजे आपण स्वारीस निघालोंच समजा. तेथपर्यंत मात्र आपण एक पाऊलसुद्धां पुढें टाकणार नाहीं ! शिंद्याचें मागणें असें होतें कीं, मला दक्षिणेंत दहा लक्षांची जहागीर द्यावी. निदान दक्षिणेंत पांच लक्षांची देऊन बाकीचे भरतीस माळवा प्रांतीं भेलसें वगैरे पांच लक्षांचे महाल द्यावे. शिवाय अशीरगडचा किल्ला द्यावा. त्या वेळीं एवढी मोठी जहागीर शिंद्यांस देणें संकटाचेंच होतें. त्यांतून ते दक्षिणेंत जहागीर मागत

होते ती गोष्ट बोलावयासच नको होती ! शिवाय राज्यांत पहिल्या प्रतीचे बळकट किल्ले होते त्यांत अशीरगडची गणना होती व तो किल्ला मोठी नाक्याची जागा होती. दुसरा एखादा सामान्य प्रतीचा किल्ला कारभारी देते, पण तसला शिंद्यांस नको होता ! ते अशीरगडचा आग्रह सोडीनात ! त्यांचें ह्मणणें न ऐकावें तर तिकडे कोल्हापुरकर राज्य ग्रासीत चालले होते व हैदरअल्लीकडून त्यांस पैक्याचा पुरवठा होत होता. शेवटीं नानानीं तोड काढिली कीं, भेलसें वगैरे माळव्यांतील दहा लक्षांचे महाल तुम्हांस जहागीर देऊं. आतां कांहीं तकरार न सांगतां तुम्ही स्वारीस निघून कोल्हापुरकरांचें पारिपत्य करावें व पुढेंही राज्यांत चोहोंकडे बखेडे झाले आहेत ते मोडून राज्याचा बंदोबस्त करून द्यावा. इकडचीं कामें आटपून आमचा निरोप घेऊन तुह्मी उज्जनीस जाऊं लागाल तेव्हां अशीरगडचें बोलणें बोलूं. शिंद्यानीं हें म्हणणें मान्य केलें. परंतु शिंद्यांविषयीं बापूच्या मनांत पूर्वीपासून वांकडें असल्यामुळें त्यांस जहागीर देण्याचें नुसतें वचनसुद्धां देण्याचें बापूच्या जिवावर आलें! त्या कामीं नानाचा फारच आग्रह पडला, तेव्हां निरुपाय होऊन त्यानीं रुकार दिला. पण नानाविषयीं सखारामबापूच्या मनांत मत्सर उत्पन्न झाला होता तो त्यानीं शिंद्यांविषयीं रदबदली केल्यापासून दुणावत चालला. हा मत्सर उत्पन्न होण्याचीं कारणें होत गेलीं तीं अशीं:—

पेशवाईंत नक्त पैसा, कापड किंवा जमीन वगैरे सरकारांतून कोणास द्यावयाचें झालें म्हणजे एक कागद तयार होत असे त्याला ‘ देणें यादी ’ म्हणत. या यादीवर ‘ द्यावें ’ असा शेरा मालकानें करावा व त्याच्या कारभाऱ्यानें ‘ देवावें ’ असा शेरा करावा असा प्रघात असे. अगदीं जरूरीच्या प्रसंगीं नुसता ‘ देवावें ’ असा शेरा करून मालकाच्या ‘ द्यावें ’ या शेऱ्याशिवाय आपल्याच जबाबदारीवर एखाद्या कामाचा निकाल पुणें दरबारांतील कारभारी करीत असत. कारण कारभारी तरी मुख्य मालक पेशवे यांचे बंधुच असत. बाजीराव बल्लाळ यांचे चिमाजी आप्पा, बाळाजी बाजीराव यांचे सदाशिवराव भाऊसाहेब व माधवराव बल्लाळ यांचे नारायणराव बल्लाळ हे कारभारी होते. गंगाबाईची स्थापना झाल्यापासून सखारामबापू मुख्य कार-

भारी तर झालेच. शिवाय ' वडीलकी ' चा* अधिकारही त्यांजकडे आल्यामुळें ' द्यावें ' हा शेरा करण्याचें काम त्यांजकडे आ े. त्या एकाच शेऱ्यावर सर्व कामें चालत होतीं व त्यामुळें सर्व लोकांचीं नाकें बापूस आपल्या मुठींत ठेवितां येत होतीं. त्यांची नजर राज्यरक्षणा-पेक्षां स्वार्थसाधनाकडे विशेष असल्यामुळें नानांचे मसलतीस बापू-कडून हरकामीं अडथळा होऊं लागला. तेव्हां नानानीं त्याचें निवा-रण करण्याच्या बुद्धीनें ' देवावें ' हा शेरा यादीवर करण्याचा नवीनच प्रघात घातला व क्वचित् प्रसंगीं बापूकडे न जातां आपल्याच जबाब-दारीवर ते कामाचे निकाल करूं लागले. अद्यापि प्रत्येक महत्वाचें काम बापूकडे नेणें, त्यांचा बोज व सन्मान राखणें, सर्व कारभार त्यांचे हुकमानें चालतो असें लोकांत दाखविणें, यांत ते तिलप्राय कसूर करीत नव्हते; किरकोळ कामें मात्र एखादे वेळीं ते ' देवावें ' असा शेरा करून निकालास लावीत. तो रोंख त्या पाताळयंत्री सखाराम-बापूंनीं तात्काळ ओळखिला ! ते जळफळूं लागले कीं ' देवावें ' या शेऱ्यावर जर लोकांचीं कामें चालूं लागलीं तर ' द्यावें ' करून घेण्यासाठीं आम्हांकडे कोण येणार ! आणि असें जाहल्यावर मग आमची ' वडीलकी ' ती कसली ! आधींच पुणें दरबारांत नाना फड-नवीस हे बलिष्ठ मुत्सद्दी होऊन बसले होते; सातारा, रायगड, प्रता-पगड, लोहगड व पुरंदर हे बळकट किल्ले त्यांच्या ताब्यांत होते; जवळ पैका होता; राज्यांत वजन होतें; बहुतेक फौज अलीकडे त्यांच्या लगामीं हरीपंत व परशुरामभाऊ यांच्याद्वारें लागत चालली होती; या सर्व गोष्टींमुळें सखारामबापू व मोरोबादादा यांस नानाविषयीं मत्सर वाटूं लागला होता. त्यांत ' देवावें ' करण्याचा पेशव्यांचे बंधूंचा अधिकार त्यांनीं बळकाविलेला पहातांच त्या दोघांचें पित्त भडकलें ! अशा स्थितींत नानानीं शिंद्यांशीं मैत्री करून त्यांस आपणांकडे ओढून घेतलेलें पहा-तांच सखारामबापूस संशय आला कीं, पुढें मागें प्रसंग पडल्यास आप-लें उच्चाटन करतां यावें म्हणून ही नानाची शक्कल दिसते ! असें

---

* ' वडीलकी ' व ' अखत्यारी ' यांस इंग्रजींत शब्द अनुक्रमें ' The power of veto ' व ' power of the executive ' असे लावितां येतील. ' वडी-लकी ' चा अधिकार बापूकडे व ' अखत्यारी ' चा नानाकडे होता.

झाल्यामुळें सखारामबापू व मोरोबादादा यांचें एकचित्त होण्याचा संभव दिसूं लागला व पुढील कारस्थानाचें बीज पेरलें गेलें.

नाना फडनवीस यांस धरावें अगर मारून टाकावें असा या सुमारास पुण्यांत कांहीं गारद्यांनीं बेत केला होता, पण नानास वेळेवर सूचना मिळाल्यामुळें ते सावध झाले. आपल्या जीविताचा बचाव होईल इतक्या बेताचा त्यानीं गारद्यांचें पारिपत्य करून बंदोबस्त मात्र केला, पण हें कृत्य गारद्यांकडून कोणी करविलें याचा सुगावा लागला असूनही त्यांस प्रसिद्धपणें चौकशी करतां येईना! याचें कारण शिवाजीपंत असें लिहितो कीं, हें कर्म कोणीं करविलें याचें "ठिकाण लावावें, चौकशी करावी, तेव्हां त्याचा बंदोबस्त ज्यांनीं करविलें त्यांसुद्धां करावा तेव्हां ठीक! ती गोष्ट या प्रसंगीं करितां येत नाहीं. याकरितां बंदोबस्त मात्र करून तसाच मजकूर ठेविला आहे." शिवाय मारेकरी घालणारांचीं नांवें कागदोपत्रीं लिहितां येत नाहींत असें कळवून तो इतका मात्र इशारा करितो कीं, "या खेळांत बहुतेक 'दामोदर' मंडळीच आहेत." पण ही 'दामोदर मंडळी' तरी कोण?

सन. १७७७ मे.

'दामोदर' हें सांकेतिक नांव पैक्यास लावितां येईल व तसें क्वचित् लाविलेलें आमच्या पहाण्यांतही आहे. पैका म्हणजे लक्षणेनें पैकेकरीही घेतां येतील. सराफ, व्यापारी, सावकार हे लोक असल्या फंदांत कधींच पडणारे नव्हत. तेव्हां ते पैकेकऱ्यांतून वजा केले म्हणजे दरबारीच शिल्लक राहतात. पण नानास दगा करण्यास झटणारे हे दरबारी तरी कोण असावे? मोरोबा दादा? कीं बजाबा पुरंदरे? कीं चिंतो विठ्ठल? अथवा दुसरेच कोणी लुंगे सुंगे होते? कोण असतील ते असोत!

आतां हरीपंत व परशुरामभाऊ कर्नाटकांत गेले होते त्यांच्या हालचालींविषयीं थोडें लिहूं. गेल्या तीन वर्षांत हैदरानें तुंगभद्रेपलीकडे मराठ्यांचा जितका मुलुख होता तितका सर्व घेतला व तिकडे बल्लारी, गुत्ती, वगैरे संस्थानें होतीं तीं एकामागून एक बुडविण्याचा सपाटा चालविला. मराठी राज्यांत चोहोंकडे दंगेधोपे सुरू असल्यामुळें कारभाऱ्यांस हैदराचें पारिपत्य करण्याची तजवीज कांहीं एक करतां आली नाहीं. शेवटीं हैदर तुंगभद्रा उतरून अलीकडे आला व त्यानें धारवाड प्रांतीं धुमाकूळ उडविला, तेव्हां

त्याचा कांहीं तरी बंदोबस्त करणें कारभाऱ्यांस भाग पडलें. त्यासंबंधें पूर्वीं सांगितल्याप्रमाणें त्यांनीं निजामअल्लीशीं नवीन तह केला. त्या तहाच्या शर्ती अशा होत्या कीं, मोगल व मराठे या दोघांनीं मिळून हैदरावर स्वारी करावी व तुंगभद्रेपलीकडे जितका मुलूख व खंडणी मिळेल त्याची उभयतांनीं निम्मे निम्मे वांटणी घ्यावी. या तहाप्रमाणें उभयतां सरकारें स्वारीची तयारी करितात, तों पांडुरंगराव पटवर्धन व कोन्हेरराव पटवर्धन व शिवराव घोरपडे सहा हजार फौजेनिशीं धारवाडप्रांतीं होते त्यांशीं सांवशी येथें हैदराचा सरदार महमद अल्ली कुमदान यानें लढाई केली. त्या लढाईंत मराठ्यांचा पूर्ण पराजय होऊन त्यांच्या फौजेची वाताहत झाली. कोन्हेरराव मृत्यु पावला व पांडुरंगराव व शिवराव जखमी होऊन शत्रूकडे पाडाव सांपडले. याप्रमाणें फत्ते झाल्यावर कुमदानाची बाजू शेर होऊन त्यानें धारवाडास वेढा घातला. तो उठविण्यासाठीं परशुरामभाऊ कोल्हापुरकरांच्या टेहळणीवर चिकोडी येथें होते ते त्वरेनें तिकडे गेले. ते जातांच कुमदान धारवाडचा शह उठवून हुबळीच्या आसऱ्यास जाऊन बसला. त्याजवळ फौज भारी जमत चालल्यामुळें त्यास तेथून हुसकून लावण्याचें भाऊंत सामर्थ्य नव्हतें. यास्तव हरीपंतांस फौजेसह जलदीनें पाठवून देण्याविषयीं त्यानीं नाना फडनवीस यांस निकडीचीं पत्रें पाठविलीं.

९ जाने. १७७७.

तहाप्रमाणें दसरा जाहल्याबरोबर मराठे व मोगल यांच्या फौजा कर्नाटकचे स्वारीस निघावयाच्या, परंतु हरीपंतांच्या फौजेस गेल्या दोन वर्षांत रोजमुरा मिळाला नव्हता, व त्या मागील देण्याची कांहीं तोड निघाल्याखेरीज फौजेनें बाहेर निघण्याचें साफ नाकारिलें. ती तोड पडावी ह्मणून नानांचा प्रयत्न अव्याहत सुरू होता. परंतु फडके व पटवर्धन यांशीं सखारामबापूचें वांकडें बहुत दिवसांचें असल्यामुळें ते आंतून हिसकें देऊन नानांची सर्व खटपट व्यर्थ करीत! असें होतां होतां फौजेची थोडीबहुत समजूत निघून हरीपंताची स्वारी एकदांची बाहेर निघाली. पण ती दसऱ्यास निघावयाची ती फाल्गुनांत निघाली! बाहेर निघतांनाच हरीपंतानीं ताडिलें होतें कीं, दरबारची स्थिति ठीक नाहीं, त्या अर्थीं आपण दूर गेल्यावर नानांवर कांहीं तरी संकट येईल. ते मार्च महिन्याच्या अकराव्या तारखेच्या

पत्रांत परशुरामभाऊंस कळवितात कीं, "नानाप्रकारचीं राजकारणें घाटत आहेत. यजमानांस ( नानास ) सावध करितों. तेही सावध आहेत. परंतु फितूर फार! काय करितील?"

हरीपंत तात्या कर्नाटकांत जाऊन पोंचतात तों आणखी एक महिना गेला. तिकडे ते जातांच निजामअल्लीचा सरदार जाबीत जंग धौशा हा फौजेच्या जय्यत सरंजामानिशीं त्यांस येऊन मिळाला. पण इतक्या उशीरां आलेल्या फौजा मुलुखगिरी कसची करणार? त्या इकडे तिकडे हिंडतात तों दीड महिना सहज निघून गेला. शत्रूचें पारिपत्य अद्यापि कांहींच झालें नाहीं, याकरितां पावसाळ्यांत इकडेच छावणीस राहिल्यानें शत्रूवर जरब बसेल व मोहिमेच्या पुढील उद्योगास ठीक पडेल; याकरितां कर्नाटकांत छावणी करावी, देशीं परत जाऊं नये, असें हरीपंतांच्या मनांत होतें. परंतु त्यांच्या फौजेनें त्यांस साफ सांगितलें कीं, पुण्याहून निघाल्यापासून सरकारांतून आम्हांस पोटास मिळालें नाहीं, याउपर परदेशीं छावणीस राहून उपास आमच्यानें काढवत नाहींत. तुम्ही बऱ्या बोलानें आम्हांबरोबर आलांत तर ठीकच आहे. नाहीं तर तुम्हांस जबरदस्तीनें पुढें घालून आम्ही पुरंदरास जाणार, आणि तेथें कारभाऱ्यांजवळून पोटास मागून घेऊन घरोघर जाऊं! याप्रमाणें हरीपंत संकटांत पडले तेव्हां त्यांची धारवाडप्रांतीं छावणी होण्याची परशुरामभाऊनीं सोय केली. आपल्या पतीवर पांच चार लक्ष रुपये कर्ज मिळवून व सावनूर वगैरे संस्थानांपासून खंडण्या उकळून आपल्या व हरीपंतांच्या लोकांची चार महिने कशी तरी गुजराण त्यानीं केली व दादा आण्णा करून फौजेस राहून घेतलें. पावसाळ्यांत भाऊ व हरीपंत स्वस्थ बसले नाहींत. हैदरानें घेतलेलीं सर्व ठाणीं परत घेऊन पाळेगार वगैरे बखेडेखोरांचा बंदोबस्त करून त्यानीं तुंगभद्रेच्या अलीकडच्या मुलखांत पुनः अम्मल बसविला.

तुंगभद्रेपलीकडे पेशव्यांच्या आश्रयाखालचें चित्रदुर्ग एवढेंच एक बलिष्ठ संस्थान आतां राहिलें होतें व तेंही काबीज करण्याच्या उद्देशानें हैदर चित्रदुर्गास वेढा घालून बसला होता. पावसाळा संपतो न संपतो तों हरीपंत व परशुरामभाऊ यांनीं मसलत योजिली कीं, आतां आपणाजवळची पोटगी संपली त्याअर्थी धौशा व आपण नदीपार जाऊन शत्रूचा मुलूख लुटून फौजेचें पोट भरावें, म्हणजे चित्रदुर्गकरांस हिंमत

चढेल व शत्रूवर कांहीं जरब बसेल. असा विचार करून धोंशास निघन येण्याविषयीं निकडीचीं पत्रें पाठवून हे नदीपार होऊन अदवानीच्या रोखें खंडण्या वसूल करीत चालले. ती बातमी कळतांच हैदर चित्रदुर्गाचा वेढा उठवून सर्व सैन्यासह मराठयांवर चाल करून येऊं लागला. आपण जवळ गेल्याशिवाय हैदर वेढा उठवील असें हरीपंतांस वाटलें नव्हतें. आपणास उपद्रव देण्यासाठीं थोडीबहुत फिरकोळ फौज तो आपणावर पाठवील एवढाच त्यांचा अजमास होता. पण आतां तो सबंध फौजेसह आपणावर चालून येतो अशी पक्की बातमी आली आणि धोंशाचा तर अद्याप ठिकाण नाहीं, असें पाहून हरीपंतानीं मनसबा योजिला कीं, आपलें बाजारबुणगें व तोफा वगैरे जड सामान तुंगभद्रेअलीकडे पोंचवून द्यावें, आणि सडे होऊन शत्रूशीं गांठ घालावी व गनिमी कावा दाखवून त्यास जेर करावें. याप्रमाणें ठरवून ते परत निघणार तों राराबी प्रांत अदवानी येथें हैदरअल्ली अकस्मात् पन्नास हजार सैन्यासह मराठयांपुढें अर्ध्या कोसावर अचानक येऊन उभा राहिला! त्यास पहातांच हरीपंत चपापले. चपापण्याचें कारण एवढेंच कीं, आज अठरा वीस वर्षे साल दरसाल हैदराशीं मराठयांचीं युद्धें सुरू होतीं. पण तो इतक्या बेमुरवतीनें व धिटाईनें दिवसा ढवळ्या अंगावर चालून आल्याचें कोणाच्या स्मरणांत नव्हतें. उलट तो कोठें असेल तेथें यानीं चालून जावें व त्यानें तोंड चुकवून दूर दूर असावें असाच प्रकार घडत असे. असें असतां हा एकदम अंगावर चालून आला तो कांहीं तरी लाग असल्याशिवाय आलेला नाहीं, अशी हरीपंतांची खात्री झाली. दादासाहेबांचे सरदार बाजीराव बर्वे, आबाजी महादेव व तुळ्या पवार हे शत्रूच्या लष्करांत असून त्यांच्या द्वारें तो आपली फौज फितविण्याच्या उद्योगांत आहे हें हरीपंतांस ठाऊक होतें, व जेव्हां जेव्हां तसला प्रकार उघडकीस आला, तेव्हां तेव्हां त्यानीं त्याचा बंदोबस्तही केला होता. आजचा प्रसंग असा भयंकर होता कीं, त्यांत हरीपंत वगैरे सरदार फौजेसह मारिले जावे व बाजारबुणगें, तोफा वगैरे सर्व अजबाब शत्रूच्या हातीं लागावा! अशा या आणीबाणीच्या वेळीं हरीपंत व परशुरामभाऊ यांचें कौशल्य व मर्दुमी हीं चांगलींच

२४ नोव्हेंबर.

१ जानेवारी सन १७७८

कसोटीस लागलीं ! शत्रु येण्यापूर्वीच तुंगभद्रेपर्यंत मागें हटत जाण्याचा त्यांनीं बेत करून तशी तयारीही केली होती, हें पूर्वीच सांगितलें आहे. तोच बेत कायम करून त्यांनीं बाजारबुणगें व तोफखाना तुंगभद्रेकडे लावून दिला आणि आपण हैदराच्या तोंडावर फौजेसह उभे राहिले. शत्रूनें तोफांचा मारा मनस्वी केला, तथापि त्यांनीं सायंकाळपर्यंत जागा सोडिली नाहीं. तो प्रसंग फार चमत्कारिक होता. कारण एकीकडे शत्रूशीं लढावयाचें, आणि दुसरीकडे आपल्या फौजेंतील वहिमी सरदारांच्या हालचालींवर सक्त नजर ठेवावयाची ! कारण कीं, फितुरी सरदारांस आपापल्या फौजांसह शत्रूकडे पळून जाण्यास त्या गर्दीत उत्तम संधि होती ! मराठ्यांची फौज निर्धारानें जागा धरून उभी राहिलेली पहातांच हैदरही थबकून उभा राहिला. त्यामुळें बुणगें वगैरे सामान सुरक्षितपणें पार झालें. मराठ्यांवर चालून यावें अगर बुणग्यावर लगट करावी असें शत्रूच्या मनांत होतें, परंतु पहिली गोष्ट करण्यास त्यास धीर झाला नाहीं व दुसरी करण्यास त्यास संधी मिळाली नाहीं. दुसरे दिवशीं लष्कर मागें निघून आल्यावर हरीपंतानीं आपल्या फौजेंत फितूर झाला होता त्याची चौकशी केली. हैदरअल्लीनें मानाजी फांकडे यास लिहिलेली चिठी त्यांच्या हातीं लागली होती, ती त्यानीं आतां बाहेर काढिली. ! ती चिठी ही—" राव अजम मानाजीराव शिंदे दामोहबतहू—मोहिबन पन्हा मोकलिशान दस्तगाह. येथील खैर खुषी जाणोन आपली षादमानी हमेशा कलमी करीत आलें पाहिजे. दरीविला तुम्ही तेथील 'मुख्यस्थास धरून बसवितों, जलद येऊन तोंड लावावें,' ह्मणोन सांगोन पाठविल्यावरोन आम्ही फौजसुद्धां मुकाबल्यास आलों. लेकिन तुम्हांकडोन एकही काम झालें नाहीं. तुम्ही तरी निघून आलां नाहीं, यावरून ताजूब दिसों आला. आतां ही त्याची फौज पळत आहे, त्याचा पाठलाग करून (म्हैसूर) सरकारची फौजही लागली आहे, अशा वख्तीं 'पळणारांबरोबर आह्मी येत नाहीं' ह्मणोन सांगोन आपले झेंडे उभारून एक जागा बाहिरसुद्धां उतरून इकडे निघुन आलिया तुमच्या कुमकेस सरकारची फौजही पाठीवर आहे, येणेंची सोय पडेल. तुम्ही न येतां त्यांबरोबरच गेलिया तुमचा परिणाम कैसा लागेल ! हें पाहून हरप्रकारें आपली फौज बाहीर सुद्धां निघून

येतसें करावें. आतां साबाजी पंडतास व गाजीखान सरदारास पांच हजार स्वार सुद्धां आपले कुमकेकरितां पाठविले आहेत; आपण फौज सुद्धां निघतांच हे सरकारची फौज तुम्हापाशीं सामील होत आहे. म्हणजे तुम्हांवर कोणाचाही इलाज चालणार नाहीं. खातरजमेनें निघून आलें पाहिजे. जादा काय लिहिणें." या चिठीवरून दिसून येईल कीं, फांकडयानें हरीपंतांस धरून कैद करण्याचें सामर्थ्य येण्याइतकी फौज फितावून आपल्या बाजूस मिळवून घेतली होती व शिवाय तिच्या कुमकेस शत्रु सकल सैन्यासह समीप होता! फांकडयानें मोठाच दगा केला होता परंतु त्या दिवशीं हरीपंतांच्या मर्दुमीमुळें व दक्षपणामुळें वेळ निभावली! त्याचें यथास्थित पारिपत्य करण्याकरितां हरीपंत व परशुरामभाऊ यानीं अकस्मात् त्याच्या गोटावर हल्ला केला. त्या वेळीं मानाजी फांकडे मात्र मारामार करीत निसटून शत्रूकडे गेला, परंतु फौजेनें त्याचा गोट लुटून फस्त केला व त्याच्या कुटुंबाचीं माणसें हरीपंतांच्या हातीं लागलीं.* या प्रकरणीं अधिक चौकशी करितां आढळून आलें कीं, हरीपंतांचे खिजमतगार सुद्धां मानाजीनें फितविले होते व शिलेदारांस वांटण्याकरितां त्यानें एक लाख होन शत्रूकडून आणिले होते! तो बहुतेक ऐवज धराधरी व मारझोड सुरू होतांच ज्यानीं ज्यानीं घेतला होता त्यांजकडून सरकारांत आला व फौजेच्या पोटास आयताच उपयोगीं पडला! या चौकशींत मोठमोठया लोकांचीं नांवें बाहेर आलीं व त्यांचें पारिपत्यही हरीपंतानीं समय पाहून करावयाजोगें होतें तें केलें. या गुन्ह्यांत सांपडलेले म्हसवडकर यशवंतराव माने हे एक फांकडयाप्रमाणेंच डोईजड प्रस्थ होतें. त्यास धरून हरीपंतानीं तोफेच्या तोंडीं दिलें त्यामुळें फितुराचा बहुतेक बींमोड झाला. महादजी राजे भोसले मुंगीकर व नीलकंठराव थोरात हेही फितुरांत सांपडले होते, परंतु

६ जाने. १७७८.

* मानाजीच्या पारिपत्याचा प्रकार शत्रूसमक्षच घडून आला असें कर्नल विल्क याच्या लिहिण्यावरून दिसतें. तो लिहितो कीं, हैदर पुढें पुढें सरत होता व मराठे बंदोबस्तानें मागें हटत चालले होते. असें चाललें असतां मराठ्यांच्या लष्करांत अकस्मात् धुळीचे मोठमोठाले लोट दिसूं लागले, मागून हजारों घोडेस्वार त्वरेनें दौड करीत एका ठिकाणाकडे जात आहेत असें दिसलें; व हें काय असावें याविषयीं हैदराचे लोक तर्क करीत आहेत तों खुद्द मानाजी फांकडेच आपला गोट लुटला गेल्याची बातमी सांगत सैरावैरा दौडत येऊन पोंचला!

आपाजीराव पाटणकर वगैरे सरदारांनीं रदबदली केल्यामुळें त्यांचे जीव बचावले. सरदाऱ्या मात्र तूर्त गेल्या. शत्रूकडे गेल्यावरही माना-जीचे फंद सुरूच होते. मालोजी नाईक निंबाळकर दहिगांवकर व मुधोळचे मालोजी व शंकराजी घोरपडे यांजकडे त्याचें सूत्र अजूनही होतेंच. परंतु यापुढें कोणी मराठा सरदार त्याच्या नादास लागला नाहीं.

पुण्याहून फौजेच्या खर्चास पैका येईना म्हणून शत्रूच्या मुलखावर पोट भरण्याच्या उद्देशानें हरीपंतानीं मसलत केली ती वर सांगित-ल्याप्रमाणें फसली व पुनः फौजेचे हाल सुरू झाले. ते हाल कसकसे होत होते याचें दिग्दर्शन पूर्वीं झालेंच आहे. कोणी असा प्रश्न करील कीं, कारभाऱ्यांजवळ जर पैसा नव्हता, तर ते इतकी तीस, चाळीस, पन्नास हजार फौज चाकरीस ठेवून परमुलखीं कशाला पाठवीत होते ? असल्या बेदिल व फंदफितूर करणाऱ्या लोकांकडून कांहीं काम व्हावयाचें नाहीं हें कारभाऱ्यांस कळत नव्हतें कीं काय ? यावर उत्तर असें आहे कीं, अशा फौजा कारभारी स्वारीस न पाठविते तर हैदरअल्ली व इंग्रज तत्काळ राज्य घेते हें निराळेंच; पण स्वसंरक्षणा-करितां तरी निदान कारभाऱ्यांस असेंच करणें भाग होतें. कारण कीं, हे शिकारीकरितां तयार केलेले वाघ नेहमीं शिकारीवरच गुंतवून ठेवणें जरूर होतें ! असें न करतां त्यांस रिकामे घरीं राहूं दिलें तर ते परस्परांस फाडून खाणार, नाहीं तर घरधन्यासच गिळून टाक-णार ! घरीं बखेडा करणारे लोक मोहिमेच्या सबबीनें परमुलखीं पाठविणें यांतच शहाणपणा होता. कोणी रिकामा सरदार दृष्टीस पडला कीं, महिना पंधरा दिवसांची पोटाची बेगमी करून देऊन नानानीं त्यास कर्नाटकचे मोहिमेवर रवाना करून द्यावें, पुढें त्याच्या पोटास घालण्याचें व त्याजकडून काम घेण्याचें जसें बनेल तसें हरी-पंतानीं बघून घ्यावें ! सारांश, फौजेचा पूर्वींचा लौकिक व हल्लींची संख्या आणि मुख्य सरदाराचा शहाणपणा एवढ्यावरच परराष्ट्रांस ' पुणें दरबार अद्यापि जिवंत आहे ' हें आतां कळावयाचें होतें !

हरीपंत तुंगभद्रेच्या सुमारें परत येतात तों त्यांस धौशा येऊन मिळाला. मग पूर्वी ठरल्याप्रमाणें बुणगें वगैरे जड सामान सुरक्षित स्थळीं ठेवून सडे होऊन हरीपंत तात्या धौशास बरोबर घेऊन पुनः शत्रूवर चालून जाण्याच्या उद्देशानें निघाले. धौशाचें पायदळ, तोफा,

वगैरे सामान चांगलें व मुबलग होतें. परंतु त्या सरदाराचा मोहिमेच्या कामास कांहीं उपयोग व्हावा तें बाजूलाच राहून तो आल्यापासून मराठी फौजेच्या विपत्तींत मात्र अधिक भर पडली! धौशास हैदरानें यापूर्वींच गुप्तपणें लांच देऊन अनुकूळ करून घेतलें होतें! त्यामुळें नाना प्रकारच्या सबबी लावून तो फौजेचा मुक्काम करवी. आतां मोहरम महिना आला सबब दहा दिवस मुक्काम, अमुक तोफ हातीं आली नाहीं ती येईपर्यंत सहा दिवस मुक्काम, अमुक गोष्ट नबाब निजामअल्लीस विचारिली आहे तिचें उत्तर येईपर्यंत आठ दिवस मुक्काम! एखादी हलकी मजल झाली तर थकवा घालविण्यासाठीं चार मुक्काम सहजासहजींच होत! हरीपंतांस मागेंही येतां येईना व पुढेंही जातां येईना! धौशास टाकून पुढें जावें तर तो मागें काय करील हें भय, आणि बरोबर न्यावें तर ही दशा! जी मराठी फौज वेळ पडल्यास तीस चाळीस कोस एका दिवसांत दौड करणारी, तिची धौशाच्या संगतीस लागल्यामुळें दोन महिन्यांत वीस कोस मजल! अशा स्थितींत पुढें काय करावें या फिकिरींत हरीपंत पडले असतां नाना फडनवीस यांचीं पुण्याहून पत्रें आलीं कीं, 'मोरोबादादा व होळकर एक होऊन राज्यांत मोठेंच खूळ उभें राहिलें आहे. आह्मीं महादजी शिंदे यांस कोल्हापुराहून ताबडतोब निघून येण्याविषयीं पत्र लिहिलें आहे व नागपुराहून भोंसल्याची पांच हजार फौज माहूरच्या सुमारें आणविली आहे. तुम्हांकडे पाठविलेले आपा बळवंत व बाजीपंत अण्णा यांसही वाटेंत आहां तेथेंच मुक्काम करून रहावें म्हणून लिहिलें आहे. तुम्हींही इकडील बातमींत असावें.' हीं नानाचीं पत्रें येतांच हरीपंत व परशुरामभाऊ चिंताक्रांत होत्साते तत्काळ मोहीम तहकूब करून माघारे फिरले.

दिसेंबर १७७७.

पावसाळा झाल्याबरोबर महादजी शिंदे रहिमतपुराहून निघून दर मजल कोल्हापुराकडे आले. ते येण्यापूर्वींच पेशव्यांचा सरदार रामचंद्र गणेश व कोल्हापुरचा येसाजी शिंदे यांमध्यें कवठें हिंगणगांव येथें लढाई होऊन येसाजी-

चा मोड झाला होता,* व त्याच्या चार तोफा व आणखी कांहीं लूट रामचंद्र गणेश याच्या हातीं लागली होती.

३० मे १७७७. मागाहून महादजी शिंदे आले त्यानीं वडगांव, हेरलें, कडोली, आळतें, वगैरे ठाणीं घेऊन खुद्द कोल्हापुरास वेढा घातला. कांहीं दिवसांनीं कोल्हापुरकर अगदीं

जानेवारी १७७८. जेरीस येऊन तह करण्यास कबूल झाले. मग तह ठरला त्यांत कोल्हापुरकरानीं पेशव्यांस वीस लक्ष रुपये द्यावे, त्यांत सहा लक्षांची सावकारी निशा पटल्यावर शिंद्यानीं मोर्चे उठवावे, बाकीचे रुपये चार महिन्यांनीं द्यावे, चिकोडी व मनोळी वगैरे पेशव्यांचा मुलूख घेतला होता तो सोडावा, व लोक धरून नेलेले व लढाईंत पाडाव झालेले सर्व सोडून द्यावे; दादासाहेब व हैदरअली यांशीं संबंध ठेवूं नये, याप्रमाणें मुख्य कलमें होतीं. हा तह ठरण्यापूर्वीच महादजी शिंद्यांस नाना फडनवीस यांचें पत्र आलें होतें कीं, 'कोल्हापुरकरांच्या बंदोबस्तापुरती पांच हजार फौज तेथें ठेऊन तुह्मीं बाकी फौजेसह तावडतोब निघून पुण्यास

एप्रिल. यावें.'

कर्नाटकची व करवीरची मोहीम सुरू असतां व त्यापूर्वीं तुकोजी होळकर यांची वागणूक कसकशी होत होती हेंहीं येथें सांगितलें पाहिजे. देशीं आल्यापासून त्यानीं महत्त्वाचें असें सरकारी काम एकही केलें नाहीं. सारा काळ कारभाऱ्यांशीं रुसण्या भांडण्यांतच घालविला. त्यानीं कोळ्यांचा दंगा मोडण्यासाठीं सरकारी फौजेबरोबर आपल्या फौजेची एक टोळी देऊन दिवाण नारो गणेश यास पाठविलें होतें. तोतयाचें बंड जारीनें सुरू असतां सिंहगडचा किल्लेदार बिथरून बंड करण्याच्या लागांत होता तेव्हां होळकरानीं किल्ल्यास वेढा घालून त्या किल्लेदारास वठणीस आणिलें. सोलापूर जिल्ह्यांत पटवर्धनांचें करकंब म्हणून ठाणें होतें तें नरसो गोविंद नांवाच्या बंडखोरानें बळ-

---

* या लढाईसंबंधें लिहितांना डफसाहेबानें दोन चुक्या केल्या आहेत. पहिली व ढोबळ अशी चूक ही कीं, तो येसाजी शिंद्यानें रामचंद्र गणेश याचा पराजय केला असें वस्तुस्थितीचा विपर्यास करून लिहितो आणि दुसरी चूक तो रामचंद्र गणेश यांचें नांव 'रामचंद्र हरी' असें लिहितो !

काविलें होतें. त्या प्रांतीं देवदर्शनाकरितां तुकोजी होळकर तुळजापुरास गेले होते तेव्हां सरकारचे हुकमावरून त्यांनीं तें ठाणें घेऊन पटवर्धनास दिलें. दक्षिणेंत आल्यापासून काय त्या या तीन कामगिऱ्या त्यांनीं केल्या. परंतु त्यांच्या थोरवीस साजण्याजोगी यांत एकही नाहीं! सरकारांत पैक्याची ओढ पडल्यामुळें कारभाऱ्यानीं स. १७७६ त सर्व राज्यांतून इनामें, तैनाता व वतनें यांची एकसाली ह्मणजे एक सालचें उत्पन्न सरकारांत घेतलें आणि उदमी व्यापारी यांपासून व्यापारावर शेंकडा एक रुपया याप्रमाणें 'प्राप्तीवरचा कर' घेतला. शिवाय सर्व रयतेपासून दहकपट्टी ह्मणजे जमीन महसुलावर शेंकडा दहा रुपये अधिक घेतले. शिवायसुद्धां सर्व सरदारांनीं आपापल्या सरंजामाच्या मुलखांतून ही एकसाली व प्राप्तीवरचा कर व दहकपट्टी वसूल करून सरकारचे पोत्यास जमा केली. परंतु नातवानीच्या सबबी सांगून होळकर हा ऐवज देण्याची टाळाटाळ करूं लागले. शेवटीं कारभाऱ्यांनीं अतिशय जिकीर केल्यामुळें त्यांनीं या ऐवजाची नऊ लक्षांवर तोड करून घेतली, आणि तीही रक्कम देण्यास भारी प्रयास पाडिले! कारभारी शिंद्यांस जहागीर देतात हें ऐकतांच होळकर ह्मणूं लागले कीं, आम्हांसही दहा लक्षांची जहागीर व अशीरगडच्या योग्यतेचा एक किल्ला मिळाला पाहिजे. कारण शिंदे व आह्मी बरोबरीचे सरदार! आधीं शिंद्याप्रमाणें कामें करून दाखवा, आणि मग काय मागणें आहे तें मागा; शिंद्यांस तरी अजून आह्मी काय दिलें आहे, असें कारभारी म्हणत होते; पण होळकर कोठें तें ऐकत होते! फत्तेसिंगराव व गोविंदराव गायकवाड यांमध्यें बरेच दिवस सरदारीचा तंटा लागला होता. हल्लीं फत्तेसिंगरावानीं सरकारांत अठरा लक्ष रुपये नजराणा देतों, सरदारी मला द्यावी, असें बोलणें लाविल्यावरून कारभाऱ्यांनीं तें कबूल केलें. नारो शंकराच्या जहागिरीबद्दल त्याचे दोघे दत्तकपुत्र त्र्यंबकराव व रघुपतराव यांमध्यें तंटा लागला होता त्याचा निकाल कारभाऱ्यांनीं असा लाविला कीं दोघांनीं मिळून सरकारांत दहा लक्ष रुपये नजराणा द्यावा व निम्मे निम्मे जहागीर वांटून घ्यावी. या दोन कामांबद्दल एवढी मोठी अठ्ठावीस लक्षांची रक्कम सरकारांत येणार ही बातमी कर्नाटकांत हरीपंत व परशुरामभाऊ यांस कळतांच त्यांस मोठा हर्ष झाला.

आगस्ट १७७७.

ही रक्कम आपल्या फौजेच्या खर्चास उपयोगीं पडून आपण कचा- ट्यांतून मुक्त होऊं व अजूनही कर्नाटकची मोहीम फत्ते करूं, याप्र- माणें ते सरदार मनांत मांडे खात होते. पण होळकर काय करणार आहेत हें त्यांस कोठें ठाऊक होतें! त्यानीं कारभाऱ्यांजवळ आग्रह धरिला कीं, गायकवाडांची सरदारी फत्तेसिंगास न देतां ती गोविंद रावास द्यावी. कारभारी ह्मणाले कीं, पैक्याच्या टंचाईमुळें सरकारची हलाखी काय चालली आहे हें तुह्मी पहातच आहां. गोविंदरावांचा प्रथमपासून ओढा दादासाहेबांकडे असल्यामुळें त्यांस सरदारी देणें योग्य नव्हे. तथापि तुमच्या भिडेमुळें आह्मी तेंही करूं. मात्र गोविंद- रावानीं येथें येऊन इतःपर इमानानें वागण्याबद्दल तुमचे मार्फतीनें आमची खात्री करून दिली पाहिजे, आणि फत्तेसिंग देतो तेवढा नजराणा दिला पाहिजे. या दोन गोष्टी गोविंदरावांकडून घडल्या नाहींत तरी त्यांसच सरदारी द्यावी हा आग्रह होळकर सोडीनात! आपल्या सरदारी मिळविण्याच्या मार्गांत होळकराचें प्रस्थ आडवें आलेलें पहातांच फत्तेसिंगरावास वचक बसून त्यानीं पुणें दरबारास नजराणा देण्यासंबंधानें तत्काळ हात आंखडला! नारो शंकराच्या जहागिरी प्रकरणीं होळकरानीं हट्ट धरिला कीं, जहागिरीची वांटणी दोघा भावांत न करितां ती सर्व एकट्या रघुपतरावासच द्यावी! त्या कामांतसुद्धां रघुपतरावाकडून नजराणा येता तर कारभारी होळकरां- चा हट्ट चालविण्यास कबूल होते. परंतु नजराण्यास कुठेच ठिकाण नाहीं आणि होळकरांचा आग्रह मात्र कायमच! अर्थात् तो भावा- भावांचा तंटा न मिटल्यामुळें सरकारांत नजराणा येण्याचा मजकूर तसाच राहिला! कर्नाटकांत जाऊन हरीपंतांस मदत करण्याबद्दल कारभाऱ्यांनीं होळकरांस सांगितलें तेव्हां कांहीं महिने ते आज निघतो, उद्यां निघतो, असें म्हणतच होते! शेवटीं फारच तगादा लागला तेव्हां त्यानीं साफ सांगितलें कीं, शिंदे येतील तर त्यांबरोबर आपण कर्नाटकच्या मोहिमेवर जाऊं. एकटे जाणार नाहीं! याप्रमाणें वागून व उलट कारभाऱ्यांवरच रागावून होळकर वाफगांवास जाऊन बसले. त्यांची समजूत काढण्यासाठीं कारभाऱ्यांनीं सरदार विसाजी कृष्ण बिनीवाले यांस पाठविलें होतें, परंतु त्यांची समजूत झाली नाहीं.

दिसेंबर सन १७७७.

एवढा वेळपर्यंत खुद्द नाना फडनवीस, सखारामबापू, हरीपंत, परशुरामभाऊ, शिंदे, होळकर, दादासाहेब, इंग्रज, निजामअल्ली व हैदरअल्ली वगैरे विषयींच्या हकीकती कालक्रमानेंच वर्णन करण्यांत आल्या. त्या सर्व हकीकतींचा परस्परांशीं निकट संबंध असल्यामुळें सर्वांविषयींच थोडाबहुत विस्तार करावा लागला. शिवाय आतां कालक्रमाच्या ओघानेंच मोरोबादादांचें कारस्थान वर्णन करण्याचा प्रसंग आला आहे व तें कारस्थान नीट समजण्याला मागील हकीकतींची अशी सविस्तर फोड करणें जरूर होतें. आतां पुढच्या प्रकरणांत मोरोबादादांच्या कारस्थानाविषयीं लिहिणें सोईचें झालें आहे.

---

# प्रकरण आठवें.

## मोरोबादादांचें कारस्थान.

### उभारणी.

नानासाहेबांच्या वंशाचे पाय भुईस लागावे व तेणेंकरून आपल्या राष्ट्राचें रक्षण व्हावें म्हणून जिवावरच्या संकटांस न जुमानितां नानानीं हिय्या धरून आजपर्यंत जे भगीरथ प्रयत्न केले ते सर्वही व्यर्थ जावयाचा योग स. १७७८ त मोरोबादादांच्या कारस्थानामुळें आला होता. पण याही संकटांतून ते आपल्या अलौकिक करामतीच्या बळावर कसे पार पडले हें आतां दाखवावयाचें आहे. सर्व आयुष्यांत त्यांचा देशाभिमान, स्वामीभक्ति, धैर्य व बुद्धिवैभव हीं कसोटीस लागण्याची ही वेळ होती. या कारस्थानाचा वृत्तांत जो आह्मी पुढें देत आहों त्यास मुख्यत्वें आधार परशुरामभाऊंच्या पत्रांचा असून तीं पत्रें चार चार दिवसांआड लिहिलेलीं सर्व स्वदस्तुरचीं आहेत. या प्रकरणासंबंधें शिवाजीपंताचीं पत्रें आहेत तीं देखील फार चांगलीं आहेत.

बापू व नाना यानीं बारभाईचें कारस्थान आपणास वगळून केलें, मसलत सिद्धीस जाईपर्यंत तिचा सुगावा देखील लागूं दिला नाहीं, हल्लींही सर्व कारभार आपण दोघांनींच आटोपून आपणास घरीं

बसवून ठेविलें आहे, याबद्दल काय तो उभयतां कारभाऱ्यांवर मोरो-बादादांचा रुसवा. दादांची समजूत करण्याचा प्रयत्न आज तीन वर्षें चाललाच होता. मध्यंतरीं सन १७७७ त तो प्रयत्न सफळ होण्याची संधी आली होती. दादांस दीड हजार स्वारांचा सरंजाम [ साडे चार लक्ष रुपये उत्पन्नाचा मुलूख ] द्यावा, जसे दोघे कारभारी आहेत त्याप्रमाणेंच हे तिसरे असावे, आणि या नवीन कारभाऱ्यानीं फौजेचा कारभार पहावा, येथपर्यंत नाना फडनवीस कबूल झाले होते. मोरो-बाही या शर्ती कबूल करण्याच्या बेतांत होते. त्यांची कशी तरी सम-जूत काढावयाची म्हटल्यावर नानाकडे मुलकी कारभार, मोरोबाकडे फौजेचा कारभार आणि दोघांवरही सखारामबापूंची दे-खरेख ही व्यवस्था कांहीं वाईट नव्हती, पण सखारामबापूंचे विश्वासू आप्तइष्ट कोणी होते त्यांनीं त्यांस सल्ला दिला कीं, हे दोघे भाऊ-भाऊ एक झाले तर तुमचा नाश करितील. याकरितां यांचा मिलाफ होऊं देऊं नये. नाना 'देवावें' करूं लागल्यापासून व त्यानीं शिंद्याशीं रहस्य केल्याचें दिसूं लागल्यापासून त्यांविषयीं बापूंच्या मनांत कि-ल्बिष उत्पन्न झालेंच होतें. मात्र तें मनांत अत्यंत गूढ ठेवलेलें होतें. हल्लीं त्यानीं मोरोबांस काय इशारा पोंचाविला न कळे, ती स्वारी नानाजवळ एकदम भलभलत्या मागण्या करूं लागली ! त्याबद्दलचीं उत्तरें प्रत्युत्तरें होतां होतां सन १७७८ साल सुरू झालें.

सन १७७८.

त्या सालच्या जानेवारींत नाना फडनवीस पुण्याहून पुरंदरास गेले. बापूही सासवडाहून तेथें आले. महिना पंधरा दिवस दोघांचा मुक्काम एकत्र होता. हरीपंतांकडे कर्नाटकांत कुमक पाठविणें, व मोरोबाची कांहीं निघाली तर समजूत काढणें, या दोन गोष्टींचा विचार करण्याकरितां हे उभयतां कारभारी एके जागीं मिळाले होते. पैकीं पहिली गोष्ट त्यांनीं केली. ती अशी कीं, त्यांनीं आपा बळवंत व बाजीपंत अण्णा यांबरोबर सात आठ हजार फौज कर्नाटकांत रवाना केली. दुसरी गोष्ट मोरोबाची सम-जूत; पण ती तर कशानेंच होईना ! कारण त्यांचा आग्रह पडला कीं, सर्व राज्याचा कारभार मी एकटा अखत्यारीनें करणार. मी जें जें करीन त्यास तुह्मीं हूं ह्मणत असावें ! त्यांच्या बोलण्यांतील पाचपेंच पहातां कांहीं तरी मोठीच मसलत त्यांच्या मनांत घोळत आहे असा

नानास रंग दिसला. होळकराशीं मोरोबादादाचें कांहीं राजकारण घाटत आहे अशी त्या वेळीं भुमका पुण्यांत पसरली होती, परंतु सर्व बखेड्यांचें उगमस्थान सखारामबापू असावयाचे, याकरितां त्यांच्याच मनाचा ठाव पहावा म्हणून नानानीं प्रयत्न केला, परंतु तो मुत्सद्दी ' प्रसन्नसलिलो गूढनक्र इव ह्रदः ' असा असल्यामुळें त्याच्या मुखांतून प्रेमाचीं व विश्वासाचीं भाषणें व ईमानाबद्दल पाहिजे तसल्या आणा शपथा याखेरीज कांहीं निघतच नव्हतें! एकंदर सर्व गोष्टींचा विचार करितां सखारामबापू आपणास विरुद्ध होणार नाहींत, आणि ते जेथपर्यंत विरुद्ध नाहींत तेथपर्यंत आपणावर कोणाचें कांहीं चालणार नाहीं, हाच नानांचा ग्रह झाला. बाकी बापू प्रतिकूल आहेत हें जरी नानास पक्कें कळलें असतें, तरी त्याविषयीं कांहीं प्रतिकार तूर्त त्यांच्या हातून होण्याजोगा नव्हताच ! आंतून आंतून नानाप्रकारच्या खटपटी चालल्या आहेत हें त्यांस ठाऊक होतें; पण त्या उघडपणें लोकांच्या नजरेस येतपर्यंत तिकडे डोळेझांक करणें भागच होतें ! अशा स्थितींत शिवरात्रीनिमित्त चार दिवस कृष्णातीरीं राहण्याकरितां नाना पुरंदराहून मेणवलीस गेले व सखारामबापू सासवडास परत आले.

नाना व सखारामबापू यांचीं राजकारणाचीं धोरणें भिन्न भिन्न होतीं त्यामुळें दोघांनीं एक दिलानें पुष्कळ वर्षेंपर्यंत कारभार करणें स्वभावतःच अशक्य होतें. राज्यरक्षण करावें हें धोरण नानांचें. राज्याचें कांहीं कां होईना, आपलें प्रस्थ दिवसेंदिवस वाढावें, निदान आहे तें तरी कायम रहावें हें धोरण बापूंचें. ' देवावें ' करण्याचा प्रघात नानानीं पाडिला त्यांत मुख्य उद्देश दरबारी कामांत बापूकडून नेहमीं अडथळा होत असे, तो केव्हां केव्हां निवारण करण्याचें साधन आपल्या हातीं असावें ह्मणून. परंतु आपला अधिकार संपुष्टांत आणावा ह्मणून नानानीं ही गोष्ट केली हें बापूस वाटणें त्या स्थितींत साहजिकच होतें. राज्यांत शिंद्याएवढा पराक्रमी व कर्तृत्वाचा सरदार राहिला नाहीं, तो प्रतिकूल किंवा उदास राहिला तर काय अनर्थ होतात हें प्रत्ययास येऊन चुकलें, त्यामुळें त्यास अनुकूळ करून घेऊन ' आरण्यकं गजमिव प्रगुणीकरोमि ' असा निश्चय करून त्यास नानानीं राज्यरक्षणाच्या कामावर योजिलें, यांत कोणतें वावगें

झालें ? परंतु माझा नाश करण्याच्या उद्देशानें त्यानीं शिंद्याशीं संधान बांधिलें असें सखारामबापूस वाटलें ! शिंदे करवीरचे मोहिमेवर व फडके आणि पटवर्धन कर्नाटकचे मोहिमेवर गुंतले आहेत ही संधी साधून सखारामबापूनीं मनांत आणिलें कीं, सखारामबापू ह्मणून कोणी व्यक्ति अद्यापि जिवंत आहे, ती ह्मातारी झाली तरी तिची अक्कल अद्यापि शाबूत आहे, राज्य चालावयाचें असलें तर तें तिच्या तब्बेतीस अनुसरूनच चाललें पाहिजे, या गोष्टींचें नाना फडनवीस यांस विस्मरण झालेलें दिसतें. तर आतां त्यांची यासंबंधें आठवण कायमची जागृत राहील असा कांहीं चमत्कार करून दाखवावा ! स्वतः अलिप्त राहिल्यासारखें करून दुसऱ्यास उत्तेजन देऊन त्याजकडूनच परस्पर बखेडे व कारस्थानें करवावयाचीं, उत्तेजन देतांना सुद्धां वचनें व आणा शपथा रगड द्यावयाच्या, परंतु दस्तऐवजीं कोठेंही गुंतावयाचें नाहीं, मसलत अंगावर येऊं लागली तर तींतून धडपणें निसटून जाण्याची योजना आगाऊच करून ठेविलेली असावयाची, ही सखारामबापूंची नेहमींची तऱ्हा होती. मोरोबादादा हें बाहुलें आपण होऊन नाचावयास तयार झालें आहे, तर त्यासच चार दिवस नाचवून नाना फडनवीस यांस कारभारांतून काढावें व त्यांचा नाश करावा असा सखारामबापूनीं बेत केला. पुरंदराहून नाना मेणवलीस गेले तेव्हांच बापू सासवडास गेले हें मागें सांगितलेंच आहे. त्या वेळीं मोरोबादादांचा मुक्काम जेजुरीस होता. अजूनही कांहीं तडजोड काढून त्यांची समजूत करण्याचा प्रयत्न राजरोसपणें सुरूच होता, परंतु त्यांची समजूत मात्र झालेली दिसत नव्हती ! या सुमारास त्यांसंबंधें शिवाजीपंत लिहितो कीं, “ राजश्री मोरोबादादाच्या मनांतील भाव अनेक प्रकारचे आहेत. कोणी अनुकूळ झाल्यास मांडी थापटण्यास चुकणार नाहींत ! स्वतः अंगेजणी होणें न होणें कळलेंच आहे ! ” शिवाजीपंताचें हें मत अगदीं बरोबर होतें. पण मोरोबास सखारामबापू अनुकूळ होतील हा मात्र कयास त्यास करितां आला नाहीं !

नानाविषयीं अनावर मत्सर मनांत उत्पन्न झाल्यामुळें मोरोबानीं त्यांचा समूळ उच्छेद करण्याकरितां कारस्थान उभारण्याचें यावेळीं मनावर घेतलें होतें. मागें एकदोनदां दगा करण्याच्या मसलती त्यानीं

केल्या होत्या त्यांपैकीं हल्लींची नसून हींत त्यांचें बरेच कौशल्य दिसून येत होतें. ही मसलत अमलांत आणण्यास हल्लींची वेळही त्यानीं चांगलीच हुडकून काढिली होती ! त्यांच्या कारस्थानांतील मुख्य मुद्दे पुढें दिल्याप्रमाणें होते-१ राज्याची मालकी व पंतप्रधानाचें पद सवाई माधवराव पेशवे यांजकडे हल्लीं आहे त्याप्रमाणेंच पुढेंही असावें. त्यांत फेरफार करावयाचा नाहीं. २ पेशव्यांचें वय लहान, सबब ते प्रौढ दशेंत येतपर्यंत श्रीमंत दादासाहेबांस पेशव्यांच्या जागीं स्थापावें. 'वडीलकी' चा मान हल्लीं सखारामबापूकडे आहे तो दादासाहेबांकडे असावा. ३ पेशवाईचे मुख्य कारभारी सखारामबापू आहेत तोच अधिकार त्यांजकडे चालावा. त्यांजकडे सरंजामाचा मुलूख, तैनाता, इनामें व मानमरातब सरकारांतून जे जे चालत आहेत ते ते पुढेंही निर्बाध चालावे. ४ अखत्यारीचा कारभार व दुय्यम कारभारी हें पद नाना फडनवीस यांजकडे आहे तें आपणाकडे चालावें. नानाचा कारभाराशीं कांहीं एक संबंध असूं नये. याप्रमाणें मोरोबाच्या कारस्थानाचे मुख्य मुद्दे होते. यांत सवाई माधवराव यांची मालकी व ते वयांत येतपर्यंत दादासाहेबांकडे 'वडीलकी' चालेल या मुख्य गोष्टी कबूल केल्यामुळें दोहीं पक्षांच्या लोकांस आपणास सामील होतां यावें अशी त्यानीं सवड राखिली होती. दादासाहेब अधिकारावर आरूढ झाल्यावर ते भोळे असल्यामुळें त्यांस आपण पाहिजे तसें वळवूं ही मोरोबास घमेंड होती. आपल्या या नवीन व्यवस्थेंत सखारामबापू केवळ नामधारी मुख्य कारभारी राहणार हें खरें, परंतु ते आतां वृद्ध झाल्यामुळें त्यांची जहागीर वगैरे त्यांजकडे चालविली म्हणजे मुख्य कारभाऱ्याच्या पोकळ मानावर ते तृप्त राहतील हाही त्यांस भ्रम होता. दादासाहेबांस आणून अधिकारावर स्थापण्याची मसलत सखारामबापूस मुळींच आवडणारी नव्हती. अगदीं गळफांस लागेपर्यंत ते या गोष्टीस कबूल झाले नसते ! 'वडीलकी' व इतर अधिकार आपल्या हातचे सोडावयाचेंही त्यांच्या मनांत बिलकुल नव्हतें. परंतु मोरोबाचा दम ताजा असल्यामुळें व कारस्थानाची उठावणी करण्यास त्याची अत्यंत अवश्यकता असल्यामुळें इतक्यांत त्याचा उत्साहभंग करावा हें बापूस ठीक वाटलें नाहीं. ते मोरोबाच्या प्रत्येक गोष्टीस हूं हूंच म्हणत गेले. बाकी ऐन आयत्या वेळीं त्यानीं आपला

मतलब सिद्धीस न्यावयाचा तो नेलाच, हें पुढें कळून येईल. असो. मोरोबाच्या कारस्थानाची उभारणी कशी जलदीनें होत गेली हें आतां दाखवूं.

नाना मेणवलीस असतां त्यांच्या गैरहजिरींत एका रात्रीं बापू सासवडाहून व मोरोबा जेजुरीहून येऊन एका स्थळीं गुप्तरूपें भेटले. त्या समयीं दोघांचे करारमदार व आणाशपथा झाल्या. कारस्थान तडीस नेण्यास फौज पाहिजे. ती फौज आणण्याचें सखारामबापूच्या इशाऱ्यावरून तुकोजी होळकरानीं कबूल केलें. पण त्यानीं मोरोबाजवळ आगाऊ पांच लक्ष रुपये कर्ज म्हणून मागितले. शिवाय मसलत सिद्धीस गेल्यावर नानानीं शिंद्यांस ज्याप्रमाणें जहागीर व किल्ला देऊं केला आहे, त्याप्रमाणें आपणास द्यावा व फौजेचा सर्व खर्च सरकारांतून द्यावा, असें मोरोबाजवळ वचन मागितलें. त्याप्रमाणें मोरोबानीं पांच लक्ष रुपये होळकरास देऊन त्यांच्या इच्छेप्रमाणें वचनही दिलें. शिवाय नारो शंकराचा मुलगा रघुपतराव नारायण यास पन्नास हजार रुपये व आणखीही कोणाकोणास फौज चाकरीस ठेवण्याकरितां कांहीं दिलें. शिवाय त्यानीं औरंगाबादेस मोगलाईत कांहीं गारदी व स्वार गुप्तरूपें चाकरीस ठेविले; आणि बजाबा पुरंदरे, चिंतो विठ्ठल, गोपाळ नाईक तांबवेकर इत्यादि दादासाहेबांचे अनुयायी अनुकूल करून घेतले. फडके व पटवर्धन यांची फौज जरी दूर कर्नाटकांत होती व तिची स्थिति फार हलाखीची होती, तरी मोरोबादादांस तिचें फार भय वाटत होतें. याकरितां त्या फौजेंत फोडाफोड करण्यासाठीं त्यानीं नरसिंगराव धायगुडे या सरदारास अनुकूल करून घेऊन त्याचेमार्फत तिकडेही कांहीं पैका पेरून ठेविला. दादासाहेबांस मुंबईहून पुण्यास आणून त्यांची अधिकारावर स्थापना करण्याच्या कामगिरीबद्दल त्यानीं मुंबईसरकारचे वकील मिस्तर मॉस्टिन् यांच्यामार्फत त्या सरकारास छत्तीस लाख रुपये देऊं केले !

याप्रमाणें मोरोबाच्या या खटपटी झपाट्यानें व गुप्तपणानें चालत असतां लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकण्यासाठीं सखारामबापूनीं असा पुकारा केला कीं, कर्नाटकचा बंदोबस्त करण्याकरितां व हरीपंतांची कुमक करण्याकरितां आपण स्वतः तिकडे जाणार ! त्याप्रमाणें डेरे दण्यांत येऊन स्वारीची तयारी जारीनें सुरू झाली. ह्यातायानें

आविर्भाव तर असा आणिला कीं, जणु आजच निघून चालूं लागणार ! पण पुढें एकदोनदां अपशकुन झाल्याचें निमित्त होऊन स्वारीस निघण्याची मसलत जी एकदां थंड पडली ती पडलीच !

इतकें होतें तों नाना मेणवलीहून पुण्यास आले. ते येतांच मोरोबानीं त्यांस सांगितलें कीं, आम्हीं देवदर्शनाकरितां कुटुंबसुद्धां पंढरपुरास जातों. एक महिन्यानें पाडव्याच्या सुमारास परत येऊं. असें सांगून ते कुच करून बारामतीस गेले. इतक्यांत मोरोबानीं मोगलाईंत गुप्तपणें चाकरीस ठेवलेले गारदी व पठाण पुण्याकडे येऊं लागले. त्यांजवळ सरकारचें दस्तक अर्थातच नव्हतें. त्यामुळें नानानीं ते बंडखोर आहेत असें जाणून त्यांवर फौज पाठवून त्यांस कैद केलें व कांहींस मारून टाकिलें. चौकशी करितां हे मोरोबाचे लोक असा छडा लागला. त्याक्षणीं बापूनीं गुप्तपणें मोरोबास सूचना पाठविली कीं, ' आतां मंत्र फुटला, यास्तव त्वरा करावी ! ' मग आपलीं मुलेंमाणसें बारामतीकर यांच्या वाड्यांत ठेवून व श्रीमंत दादासाहेबांचे जामात पांडुरंगराव बारामतीकर यांस बरोबर घेऊन मोरोबादादा वाफगांवास होळकराकडे गेले. रघुपतराव नारायण आपल्या पथकासह तेथें होते. चिंतो विठ्ठल, बजाबा पुरंदरे, गोपाळ नाईक, बाळाजीपंत दामले व सदाशिव रामचंद्र हे सारे याच वेळीं होळकराकडे गेले. मग होळकरासुद्धां या सर्वांची मिळून सोळा सतरा हजार फौज पुण्यावर चालून आली. तें पहातांच नाना फडनवीस पुण्याहून निघून पुरंदरास आले, आणि तेथें आपल्या नूतन स्त्रीस ठेवून व किल्ल्याचा बंदोबस्त करून खालीं नारायणाचें देऊळ होतें तेथें येऊन राहिले. या वेळीं त्यांनीं घाई घाईनें पांच सहा हजार फौज तेथें गोळा केली होती. पण त्यांत त्यांचें स्वतःचें हजार स्वारांचें पथक व प्रतिनिधींचें पांचशें स्वारांचें पथक एवढीच काय ती त्यांच्या विश्वासाची फौज होती.

मार्च सन १७७८

इकडे मोरोबादादानीं येऊन पुणें ताब्यांत घेतलें. शहरांत जागोजाग नानाच्या चौक्या होत्या त्या काढून टाकून त्यानीं आपल्या बसविल्या. शनवार वाड्यांत मरणास टेंकलेली पार्वतीबाई होती तिजकडून दिवाणगिरीचीं वस्त्रें, मुतालिकीची शिक्के कट्यार, जरीपटका व नौबत हीं घेतलीं. नंतर ते व होळकर

२६ मार्च.

पुरंदरावर चालून येण्यास निघाले. तेव्हां सखारामबापू सासवडाहून नानाकडे आले आणि ह्मणूं लागले कीं, नाना, आतां पुढें कसें करितोस? " ते फार. आम्ही थोडके. शिंदे समयास येत नाहींत. कृष्णराव बळवंत (आपा बळवंत) ही समयास येत नाहींत. फडके पटवर्धन दूरच आहेत. झुंजल्यास परिणाम नाहीं. किल्ल्यावरी जावें तरी फौज लुटितील. राजश्री दादासाहेबांस मुंबईहून आणितील. किल्ल्याखालीं घेरा घालून बसतील. तेव्हां काय ( करावयाचें ठरवितोस ) ? किल्ल्यावर जावें म्हणत असल्यास मी सिद्ध आहें. निघोन जात असल्यासही मी सिद्धच आहें. परंतु (हा मनसबा) पल्ल्यास पावों देणार नाहीं. **त्यांस जाऊन भेटावें हेंच चांगलें दिसतें.** "

बापू आतां म्हणत होते तें सर्व खरें होतें हें नानास समजत नव्हतेंसें नाहीं. किल्ल्यावर जावें तरी अडचण. शिंद्याकडे अगर फडक्यांकडे पळून जावें, तर श्रीमंतांस किल्ल्यावर टाकून कसें पळावें? होळकर वगैरे सरदारांशीं आजच लढाईवर मसलत आणून राज्यांत दुही माजवून आपणासाठीं राज्याचा नाश करावा हें योग्य नव्हे, त्यापेक्षां आपलेंच काय होईल तें होवो, असा त्यांनीं निश्चय केला. राज्याच्या कल्याणासाठीं स्वार्थत्याग करण्याची बुद्धि त्यांस कोणी नवीन शिकवावयाची होती असें नाहीं. त्यांच्या ठायीं तो संस्कार आनुवंशिकच होता. नानांचे आजे बाळाजी महादेव भानु हे बाळाजी विश्वनाथ पेशव्यांबरोबर दिल्लीच्या स्वारीस गेले असतां चौथ सरदेशमुखीच्या सनदा बादशहापासून मिळवितांना दिल्ली शहरांत लढाई झाली तींत ठार पडले. नानांचे वडील जनार्दन बल्लाळ भानु हे सावनूरच्या लढाईंत तोफेचा गोळा लागून जखमी झाले असतांही पुनः स्वारीस निघून त्या दुखण्यांत मरण पावले. अशा राष्ट्राभिमानी आजांचे नातु व अशा कर्तव्यदक्ष वडिलांचे सुपुत्र हे बाळाजी जनार्दन भानु. यांच्याही आयुष्यांत हा परीक्षेचा समय प्राप्त झाला. यावेळीं यांनीं कसें वागावें? दोन मार्ग यांस मोकळे होते. ज्या अधिकारासाठीं मोरोबादादा झोंबत आहेत तो अधिकार आपल्या हातचा न जावा यासाठीं प्रयत्न करावा, त्या कामीं रक्ताचे पूर वाहिले व राज्याचें वाटोळें झालें तरी बेहत्तर. हा स्वार्थसाधनाचा पहिला धोपट मार्ग. हा पंडितापासून पामरापर्यंत सर्वांस सहज सुचण्याजोगा होता. दुसरा मार्ग

म्हटला म्हणजे राज्याच्या कल्याणासाठीं तूर्त अधिकार गमावावा व पड घ्यावी. पुढें समय साधेल तेव्हां युक्तीच्या वाटेनें अधिकार मिळवावा तो राज्याच्या कल्याणासाठींच मिळवावा. त्यांत राज्याचें काडीमात्र नुकसान होऊं देऊं नये व महाराष्ट्रवीरांच्या रक्ताचा थेंबही भूमीवर पडूं देऊं नये. हा दुसरा मार्ग छातीचा, अकलेचा व फार धोक्याचा होता. खऱ्या देशाभिमानी मुत्सद्याची तारीफ यांत होती. नानानीं हा दुसरा मार्ग पत्करला! त्यानीं सखारामबापूस सांगितलें कीं, दादासाहेबांस पदच्युत करून गंगाबाईची स्थापना करण्याच्या मसलतींत मी पडलों तो तुमच्या विश्वासावर. तोच माझा तुम्हांवरचा विश्वास अद्यापि कायम आहे. या प्रसंगीं जें चांगलें दिसेल तें तुम्हीं करावें, त्यास मी कबूल आहें.

याप्रमाणें नानाची कबुली मिळाल्यावर सखारामबापूनीं मोरोबादादास सांगून पाठविलें कीं, तुम्हीं फौजेसह पुरंदरावर चालून येऊं नये. मीच तुमच्या भेटीकरितां कवडी येथें येतों आणि सर्व गोष्टी तुमच्या मनोगताप्रमाणें करार करून देतों. असा निरोप पाठवून बापू कवडीस गेले. तिकडून मोरोबादादा येऊन उभयतांच्या भेटी झाल्या. नाना प्रकारें तडजोडीच्या व साधक बाधक गोष्टी बोलून दुसऱ्याचें मन वळविणें व युक्तिप्रयुक्तीनें त्यास आपल्या धोरणाप्रमाणें वागावयास लावणें या कामीं सखारामबापूंचें चातुर्य सुप्रसिद्ध होतें. त्या चातुर्याच्या बळावर या भेटींत त्यानीं मोरोबावर हं हं म्हणतां पगडा बसविला. त्यानीं त्यांस सांगितलें कीं, अखत्यारीचा कारभार नानाकडे आहे तो ते तुमच्या हवालीं करण्यास कबूल आहेत. मात्र त्यांचें एवढेंच म्हणणें आहे कीं, आपणाकडे किल्लेकोट, सरंजाम व पुरंदरचा बंदोबस्त वगैरे जें जें चालत आहे तें तें मोरोबानीं आपणाकडे चालवावें. त्यांत ढवळाढवळ करूं नये. शिवाय मोरोबानीं अखत्यारीचा जो जो कारभार करणें असेल तो आपल्या इतल्ल्याखेरीज करूं नये. नानाच्या या दोन गोष्टी कबूल केल्यानें दोन महिन्यांपूर्वी तुम्ही जें मागत होतां तें तुम्हास अनायासेंच प्राप्त होत आहे. तर्त एवढ्यावर तृप्त होऊन तुम्हीं समेट करून घ्यावा हें बरें दिसतें. केवळ बळजबरीनें पुरंदर व पेशवे हातीं घेऊं असें म्हणून तुमचें चालणार नाहीं. कारण कीं, प्राण गेला तरी बेहत्तर, पण पेशव्यांस तुमच्या हातीं

लागूं द्यावयाचें नाहीं हा नानाचा निश्चय आहे. लढाईच्या भरीस पडाल तर तुह्मांस जड जाईलसें वाटतें. पेशवे व छत्रपति नानांच्या हातीं असल्यामुळें ते पाहिजे तें करूं शकतील. आज मितीस किल्ले, पैका, फौज, सरदार हें सर्व त्यांच्या लगामीं आहे. निजामअल्ली व भोंसले यांजकडे त्यांचीं राजकारणें पक्कीं आहेत. या सर्व गोष्टींचा दूरवर विचार करून पहा. अखत्यारी एकदां हातीं आल्यावर फितूर वगैरे युक्ती योजून नानाचें सामर्थ्य कमी करण्याचें काम आस्ते आस्ते करितां येईल. आजच करूं म्हणाल तर कसें होईल ? मी आजपर्यंत तुमच्या किती उपयोगी पडलों आहें हें ध्यानांत घेऊन व तुम्हांखेरीज आतां मला बळ कोणाचें नाहीं हें समजून ' वडीलकी ' चा अधिकार माझा मजकडेच राहूं द्या. मी तुमच्या इच्छेविरुद्ध तिळमात्र जाणार नाहीं. दादासाहेब व इंग्रज यांस राज्यांत आणिल्यानें जिकडे तिकडे असंतोष व अस्वस्थता उत्पन्न होणार. फायदा तर काहींच होणार नाहीं. त्यांस आणण्यावांचून आज कांहीं नडलें नाहीं. नानास चुप बसविण्यास तुह्मी आह्मी बस्स आहोंत. ते नच आवरतील तर दादासाहेब व इंग्रज यांस आणण्याचें तुमचें निर्वाणींचें शस्त्र आहेच. त्याची समय पाहून योजना करितां येईल. याप्रमाणें नानाप्रकारें बोध करून बापूनीं मोरोबास ताळ्यावर आणिलें. मग पुढें कसें वागावयाचें याबद्दल उभयतांत याद ठरली. तिचीं चार कलमें होतीं तीं अशीं—" सखारामपंतानीं ' देणें ' करावें. ' वडीलपण ' आहे तसेंच त्यांजकडे असावें. त्यांस पुसल्याशिवाय कामकारभार करूं नये. २ अखत्यारी राजश्री मोरोबादादानीं करावी. नानास संमतांत घ्यावें. **'देविणें' नानानीं करूं नये.** ३ सर्वत्रांचें ( सरंजाम, तैनाता, इनामें वगैरे) यथापूर्व चालवावें. कोंकणस्थ देशस्थ हें चित्तीं आणूं नये. ४ दादासाहेबांस **तूर्त** आणूं नये. **पुढें आणिलें तर आणावें.** "

याप्रमाणें ही चार कलमांची याद ठरल्यावर बापू व मोरोबादादा पुरंदरास आले. तेथें बापूनीं मोरोबाची व नानाची भेट करून दिली. लगेच बजाबा व चिंतो विठ्ठल आले. मग पांचही असामींनीं श्रीमंतांस भेटून नजरा केल्या. मागून होळकर आले. त्यांची भेट किल्ल्याखालीं नानानीं श्रीमंतांस आणून उभाउभी करविली. तूर्त तरी चोहोंकडे स्वस्थ झालें. मोरोबाचें खूळ

१ एप्रिल.

फारच फैलावणार होतें, परंतु सखारामबापूंनीं सर्वांच्या समजुती पाडून समेट करून स्थिरस्थावर केलें; याबद्दल त्यांच्या शहाणपणाची चोंहों-कडे फारच वाहवा झाली !!! आजपर्यंत उभयतां कारभारी होते ते आतां त्रिवर्ग कारभारी झाले. हें आदल्या वर्षीं होणारच होतें. फरक काय तो एवढाच कीं, अखत्यारीचा कारभार नानाकडे होता तो आतां मोरोबाकडे गेला. तो कारभार तरी मोरोबानीं नानास कळ-विल्याखेरीज करूं नये, असें चार कलमांच्या यादींत ठरलेंच होतें. 'देविणें' नानानीं करूं नये असें कलम यादींत होतें त्याची दुरु-स्ती 'देविणें कोणींच करूं नये' अशी नानानीं मागाहून करून घेतली होती. पुरंदरचा बंदोबस्त व श्रीमंतांचें संरक्षण हीं कामें पूर्वी-प्रमाणें नानाकडे बिनतक्रार चालावीं हें मोरोबानीं कबूल केलेंच होतें. मिळून आतां भांडावयास जागा कोणासच न राहिल्यामुळें दर-बारचा कारभार सुयंत्रपणें चालेल असा रंग दिसूं लागला. पुणें प्रांतीं मोरोबाचें खूळ उठल्याचें वर्तमान ऐकतांच हरीपंत व परशुराम-भाऊ कर्नाटकांतून माघारे फिरल्याचें मागें लिहिलेंच आहे. हल्लीं त्यांस त्रिवर्ग कारभाऱ्यांचीं पत्रें गेलीं कीं, आमची आपसांत समजूत झाल्यामुळें आतां इकडील काळजी करण्याचें कारण राहिलें नाहीं. तुह्मांस खर्चास पाठविण्याची तजवीज इकडून होत आहे. तुह्मीं मोहीम सोडून येऊं नये. हीं पत्रें वाचून हरीपंत व परशुरामभाऊ यांचें समा-धान झालें नाहीं. सबब ते पुण्याहून खर्चास येण्याची वाट पहाण्याचा बहाणा करून आठ चार दिवस वाटेंतच मुक्काम करून राहिले. त्यांचें सारें लक्ष पुण्याकडील हालचालींकडे वेधून राहिलें होतें.

नानाकडे कारकून होते ते चट सारे दप्तरें घेऊन कामाकरितां मोरोबाकडे जाऊन बसूं लागले. प्रांतोप्रांतींच्या फिर्यादी घेणें व तेथील अंमलदारांस ताकीदपत्रें लिहिणें, सर्व खात्यांच्या बर्या घेणें व नवीन हुकम देणें, तंट्यांचे निकाल लावण्यासाठीं पंचाइती नेमणें, हरएक प्रकारचा मुलकी व फौजदारी खात्यांकडील बंदोबस्त राखणें, अशीं एक ना दोन; नानाकडे जितकीं ह्मणून कामें होतीं तीं सारीं आतां मोरोबादादा करूं लागले. होळकरांच्या दपटशामुळें असा कडेकोट बंदोबस्त होऊन गेला कीं, मोरोबाच्या हुकुमाखेरीज राज्यां-तलें पान सुद्धां हालूं नये ! मोरोबाच्या घरीं दरबार दररोज भरत,

त्यांत राज्यांतले तमाम सरदार व सुभेदार यांचे व परकी राजेरजवाडे यांचे वकील हजर राहून आपापल्या कामाविषयीं विनंती करीत. प्रत्येक काम अखेर निकालाकरितां नानाप्रमाणेंच मोरोबाही सखारामबापूकडे नेत, पण तें आतां बापू तत्काळ मोरोबाच्या मर्जीप्रमाणें करीत ! नानाप्रमाणें त्यांस नडवून व त्रास देऊन त्यांचीं कामें खोळंबवून पाडीत नसत ! एकंदरींत सारें राज्य आपल्या हातीं आलें असें मोरोबादादांस वाटूं लागून त्यांची अधिकाराची हौस परिपूर्ण झाली !

---

# प्रकरण नववें.

## मोरोबादादांचें कारस्थान.

### चलती.

नवीन प्राप्त झालेल्या अधिकाराचा करडा अंमल नानावरही गाजविण्यास मोरोबानीं कसूर केली नाहीं ! ‘ शिलक सांखळी समजावून देणें ’ ह्मणून ते नानास हुकूम फर्मावीत, नानाप्रकारें नाकांत काडया घालीत, पाणउतारा करीत, तुह्मीं आपल्या अमदानींत अमुक गोष्ट अशा तऱ्हेनें कां केलीत ह्मणून जबाब विचारीत ! नानांचें संमत पडल्याखेरीज कोणचाही कारभार करूं नये असें यादींत कलम होतें तरी ते कांहीं गोष्टी नानास विचारीत व कांहीं न विचारीत ! नाना इतकेही अपमान सहन करून मोरोबादादा व चिंतो विठ्ठल व सखारामबापू व होळकर वगैरे प्रतिपक्षांतील सर्व प्रमुख मंडळींशीं सलोख्यानेंच वागत होते. मात्र किल्ल्याचा बंदोबस्त राखून रात्रंदिवस सावध राहण्यांत त्यांनीं तिळमात्र आळस केला नाहीं व जवळची फौजही दूर केली नाहीं. प्रथम दर्शनीं त्यांचा ग्रह असा झाला होता कीं, मोरोबाच्या बंडाची पाळेंमुळें राज्याबाहेर गेलीं नसून केवळ होळकराच्या बळावर मोरोबा व त्यांचे सोबती चार दिवस उडया मारीत आहेत. करवीराहून महादजी शिंद्यांस आणून होळकरापुढें उभें केलें म्हणजे होळकर तत्काळ शुद्धीवर येतील व बाकीच्या मंडळींच्या रेंगडया आपोआप बंद होतील. शिंदे येतपर्यंत आपण गरिबी धरली म्हणजे प्रतिपक्षांतील लोकही अधिक गडबड कर.

नाहींत. यासाठींच त्यानीं महादजीशिंद्यांस करवीराहून बोलाविलें होतें. बाजीपंत व आपा बळवंत यांस वाटेंतच मुक्काम करून राहण्याचा त्यानीं हुकूम केला होता व नागपूरकर भोंसल्याची फौज माहूरच्या सुमारें आणविली होती त्यांत तरी वेळ पडल्यास शिंद्यांस पाठबळ असावें एवढाच हेतु होता. परंतु पुढें त्यांस असें आढळून आलें कीं, चार कलमांच्या यादींतलें चवथें कलम ' दादासाहिबांस तूर्त आणूं नये. पुढें आणिलें तर आणावें ' असें जें लटपटीत लिहिलें आहे तें केवळ आपणास भेडसावण्यास लिहिलेलें नसून त्याच्या मुळाशीं कांहीं तरी अधिक पापबुद्धि आहे, आणि पुण्यावर चालून येण्यास तयार होण्याविषयीं दादासाहेब व इंग्रज यांस मोरोबाकडून खरोखरच इशारा गेला आहे ! नुसती अखत्यारी हातीं आल्यानें मोरोबाची तृप्ति नाहीं. आपला व आपल्या बाजूच्या सरदारांचा नायनाट केल्याशिवाय स्वस्थ बसावयाचें त्यांच्या मनांत नाहीं. या कामीं दादासाहिबांस आणून त्यांच्या द्वारें राज्यांत इंग्रजांचा प्रवेश करून देण्यासही ते तयार आहेत ! इंग्रज व दादासाहेब आले तर पेशव्यांचे व आपले व इतर हजारों प्रमुख लोकांचे प्राण जातील व वर्षानुवर्ष आपापसांत लढाया चालून शेवटीं मराठी साम्राज्य इंग्रजांच्या घरांत जाईल, हें मनांत येतांच नानांचा जीव चरकला; आणि केवळ महादजी शिंद्यांस आतांच्या आतां पुण्यास आणविल्यानें भावी अरिष्टाचें निवारण होण्याजोगें नसून फार सावधपणानें निराळीच मसलत योजिली पाहिजे, अशी त्यांची खात्री झाली. असें त्यांचें मत होण्यास खालीं लिहिल्याप्रमाणें कारणें घडलीं.

नाना फडनवीस कोठें जातात, काय करितात, कोणाशीं बोलतात, याची मोरोबादादा पाळत ठेऊं लागले. ते श्रीमंतांस घेऊन शिंद्याकडे अगर अन्यत्र कोठें पळून जातील ही कायती तूर्तच्या प्रसंगीं मोरोबास भीति पडली होती ! एकीकडे गोड बोलावयाचें, आणि एकीकडे पाळतही ठेवावयाची, असें करितां करितां पुरंदरच्या पायथ्यास नानांची पांच सहा हजार फौज होती तींत फितूर करून होळकराकडून त्यांस कैद करविण्याचाही एकदां मोरोबानीं एल्गार केला ! परंतु नानाही नेहमींच सावधपणानें रहात असल्यामुळें ते किल्ल्यावर तत्काळ पळून गेले व तेव्हांपासून ते किल्ल्यावरच राहूं लागले. कार्याकारण मात्र खालीं येऊन ते लगेच परत वर जात असत. दक्षि-

णच्या बाजूनें मार्गोमार्गीं चौक्या बसवून नानाचे कारकून, जासूद अगर सांडणीस्वार शिंदे व फडके यांच्या लष्करास जातील अगर तिकडून नानाकडे येतील ते कैद करावे असा मोरोबानीं बंदोबस्त केल्यामुळें नानाचें तिकडचें दळणवळण अगदीं बंद झालें. येऊन जाऊन पुरंदर, पेशवे व पंधराशें स्वार एवढें काय तें आतां त्यांच्या ताब्यांत राहिलें. आणखी एखादा फितूर होऊन हेंही हातांतून जावें, आणि मग प्राण तरी जावे अगर सर्वस्व जाऊन कारागृह तरी पहावें लागावें, असें दुर्धर संकट त्यांस प्राप्त झालें !

प्रस्तुतच्या कारस्थानाची उभारणी करण्यांत प्रतिपक्षांतील प्रमुख लोकांचे काय काय हेतु होते हें दाखविणें अवश्य आहे. सखारामबापूच्या मनांत नानांच्या हातांतून अखत्यारीचा कारभार काढावा आणि आपली ' वडीलकी ' कायम राखावी. दादासाहेबांस पुण्यास आणून अधिकारावर स्थापावें हें त्यांस अर्थातच आवडत नव्हतें. कारण तसें झाल्यास आपली ' वडीलकी ' जाईल एवढेंच नव्हे, तर दादासाहेब आपलें पारिपत्य करतील असेंही त्यांच्या पोटांत भय होतें ! कारण कीं, श्रीमंतांस पदच्युत करून गंगाबाईची स्थापना करण्यांत पहिल्या नंबरचे गुन्हेगार सखारामबापू व दुसऱ्या नंबरचे नाना फडनवीस होते ! मोरोबादादांस कारभारांत सखारामबापू अगर नाना कोणीच नको होते. सर्व कारभार आपणच आटपावा ही त्यांची हांव होती. तथापि त्यांतले त्यांत नानाचा उच्छेद करावा ही वासना प्रबळ असून तींत भर पडण्यास आणखी भाऊबंदकीचा द्वेषही जागृत होता. मोरोबासही आतां अधिकार मिळाल्यावर दादासाहेब पुण्यास यावयास नको होते. कारण ते आल्यावर आपल्या अधिकाराचा संकोच होईल हें त्यांस भय होतें. युक्तीनें किंवा बळजबरीनें आपण नानाची बाजू उलथून पाडूं अशी त्यांस अजून उमेद वाटत होतीच. तें काम आपल्या हातून झेंपत नाहीं असें पक्कें कळल्यावर मात्र ते दादासाहेब व इंग्रज यांस आणण्यास कबूल होते. होळकरास वाटत होतें कीं, नाना कारभारांत नसावे. कारण कीं, आपणास टाकून त्यानीं शिंद्याशीं गट्टी जमविली आहे ! नानाखेरीज कारभारी कोणींही असला तरी चालेल. मोरोबाच्या नादीं लागून आपण या फंदांत पडल्यासारखी इंग्रजांच्या मदतीनें

दादासाहेबांची अधिकारावर स्थापना झाली तर बरें, नाहीं तर नाना सर्व राज्यांतले सरदार आपणावर उठवून आपला सत्यनाश करतील ! चिंतो विठ्ठलास बापू, नाना अगर मोरोबा कोणीच नको होते ! एक दादासाहेब मात्र यावे अशी त्याची उत्कट इच्छा होती. कारण कीं ते आल्यावर त्यांची दिवाणगिरी चिंतो विठ्ठलास मिळावयाची होती ! दादासाहेबांकडे राज्याचा मुख्याधिकार आला तर बजाबा पुरंदऱ्यांस सातारचा किल्ला व छत्रपतीचे संस्थान यांचा बंदोबस्त राखण्याचें काम पुनः मिळणार होतें. सदाशिव रामचंद्र यांस अहमदाबादच्या सुभ्याचें काम पुनः मिळणार होतें आणि गोपाळ नाईक तांबवेकर यांस पेशवेसरकारच्या पोतदारीचें काम पुनः मिळणार होतें. (पुनः म्हणण्याचें कारण पूर्वी हे तीन अधिकार या तिघांकडे होते.) अर्थात् या तिघांस कारभारांतून नाना निघावे व दादासाहेब यावे हें अत्यंत इष्ट होतें. इंग्रजांचा वकील मिस्तर मॉस्टिन् या कारस्थानांत शिरला होता तो एवढ्याचकरितां कीं, आपल्या लोकांचे वैरी नाना फडनवीस यांच्या हातांतून अधिकार निघावा, फ्रेंच लोक पुण्याच्या दरबारीं प्रस्थ माजवूं पहात आहेत त्यांचें उच्चाटन व्हावें, आणि ईस्ट इंडिया कंपनीच्या मदतीनें दादासाहेबांची स्थापना होऊन तिजवर रुपयांचा पाऊस पडावा ! असल्या भिन्न भिन्न मनोगतांचे लोक ज्या कारस्थानांत शिरतील तें कारस्थान फार दिवस टिकणारें नव्हे हें उघडच आहे. पण नानाचा द्वेष ही एक गोष्ट सर्वांच्याच ठायीं वसत असल्यामुळें त्यांचा नाश करण्यासाठीं मोरोबादादास हे सर्व असामी चिथावून देत होते. त्यास अनुसरून मोरोबा दादा कसे नानाच्या हात धुवून पाठीस लागले होते हें मागें सांगितलेंच आहे.

नानाप्रमाणें हरीपंत व परशुरामभाऊ यांवरही मोरोबाची नजर करडी होती. त्यानीं त्या दोघांस हुकूम पाठविला कीं, फौजेस निरोप देऊन हरीपंतानीं पुण्यास सड्या स्वारीनिशीं यावें व भाऊनींही आपली फौज घरोघर लावून देऊन परस्पर तासगांवास जावें. इकडे येऊं नये ! हरीपंत पुण्यास आल्यावर मोरोबा काय त्यांचें डोचकें मारणार होते कीं तोफेच्या तोंडीं देणार होते न कळे !

इकडे हें सर्व होत आहे तों दादासाहेब मुंबईहून निघून साष्टीस आले. त्यांबरोबर इंग्रजांचीं चार पलटणें व सत्रा तोफा असा सरंजाम

स्वारीच्या तयारीनें सज्ज होऊन निघाला होता. कांहीं इंग्रज साष्टी-ची खाडी उतरून उरणास आले व पेशवे सरकारचा एखादा दुसरा महाल त्यानीं ताब्यांतही घेतला ! एकंदरींत मोरोबाकडून इशारा गेल्याबरोबर दादासाहेबांस बरोबर घेऊन पुण्यावर चालून येण्याचा इंग्रजांचा इरादा स्पष्ट दिसूं लागला. त्याला आणखी प्रत्यंतर असें होतें कीं, बंगाल खात्याचीं सहा पलटणें यमुना उतरून काल्पीच्या सुमारें याच वेळीं येऊन पोंचलीं होतीं. त्यांचाही रोंख पुण्याकडेच येण्याचा होता. या सर्व गोष्टी घडत असतां नुकती एप्रिल महिन्यास सुरुवात झाली होती.

याप्रमाणें चोहोंकडची स्थिति लक्षांत घेऊन नानानीं मसलत ठर-विली तिचा नकाशा पुढें लिहिल्याप्रमाणें होताः– मोरोबा व सखा रामबापू या दोघांच्याही मनांतून दादासाहेब व इंग्रज यांस आणा-वयाचें नाहीं. आपण जरब दाखवून त्यांस भाग पाडूं तर मात्र ते त्यांस आणतील. याकरितां त्यांशीं वागण्यांत हल्लीं आपण लीनता धरिली आहे ही अशीच आणखी कांहीं दिवसपर्यंत कायम ठेवावी. आपण दुर्बल झालों, हारीस आलों, तुम्हापुढें आमचें कांहीं चालत नाहीं, तुमचा अधिकार आम्हीं शिरसा मान्य केला, असेंच सोंग आणावें. तेणेंकरून सखारामबापू निर्धास्त राहतील व मोरोबाही आपली अख-त्यारी कायम झाली असें मानून संतुष्ट राहतील आणि इंग्रज व दादा-साहेब यांस आणण्याचें त्यांस तादृश अगत्य भासणार नाहीं. पुण्या-वर स्वारी करण्यास एप्रिल व मे एवढेच काय ते दोन महिने आतां इंग्रजांस सोईचे राहिले आहेत. एवढे कसे तरी काढिले म्हणजे राज्य निभावलें. पुढें जूनपासून पावसाळा सुरू झाल्यावर तोफा वगैरे अव-जड सामान व लष्करचें अनिवार लटांबर घेऊन इंग्रजाच्यानें घांट चढून पुण्यावर चालून येणें होत नाहीं हें खास. पुढें त्यांची ती मस-लत आक्टोबर नोवेंबरावर जाणार. तेथपर्यंत शिंदे, फडके व पटवर्धन यांच्या फौजा आणून आपण मोरोबाचें बंड मोडून टाकूं. याप्रमाणें राज्यांत शांतता होऊन घरभेद्यांचा नायनाट झाल्यावर मग इंग्रजांशीं वर्षानुवर्ष लढावें लागलें तरी तें काम तितकें कठिण नाहीं !

मसलतीचा नकाशा वर सांगितल्याप्रमाणें नानानीं जो योजिला होता तो ध्यानांत येईपर्यंत हरीपंत व परशुरामभाऊ यांच्या समजुतींत

बराच घोंटाळा झाला. इंग्रज व दादासाहेब यांस आणून मोरोबादादा राज्यांतील मुत्सद्दी व सरदार यांजवर सूड उगविणार व राज्य बुडविणार, ते नानाची चोहोंकडून जखडबंदी करून त्यांस धरण्याचा यत्न करीत आहेत, त्याअर्थी त्यांचा जीव घेण्यासही ते चुकणार नाहीत. दादासाहेब आल्यावर पालन करण्याच्या निमित्तानें पेशव्यांस ताब्यांत घेऊन ते त्यांचा खचित प्राण घेतील, या गोष्टी त्या उभयतांच्या डोळ्यासमोर मूर्तिमंत दिसूं लागल्या ! अशा प्राणसंकटांत नाना फडनवीस कांहींच हातपाय हालवीत नाहींत, हें पाहून परशुरामभाऊंस फार राग आला होता. या प्रसंगीं त्यांचें मन निराशेमुळें किती उदासीन झालें होतें हें त्यांच्या निरनिराळ्या तारखांच्या पत्रांतून वाक्यें खालीं उतरून घेत आहों त्यावरून कळून येईल.

४ एप्रिल, प्रातः काळ. " आतां श्रीगजाननानें श्रीमंत राजश्री रावसाहेबांचा व नानांचा बचाव करावा, ( पुरंदर ) किल्ल्यांचा बंदोबस्त असावा, म्हणजे सर्व जोड पावली ! "

४ एप्रिल, तिसरा प्रहर. " पुण्याहून नानाचीं पत्रें आलीं त्यावरून सर्व आशा मोडली ! श्रीमंत राजश्री दादासाहेबांचा ढेंभा उभा राहिला ! श्रीमंतांची व नानांची काय अवस्था होत्ये श्रीहरि जाणे ! श्रीमंत रावसाहेबांस सलामत असावी म्हणजे बाकी फिकीर करीत नाहीं."

६ एप्रिल. " सखारामपंत (मोरोबाच्या भेटीस) पुण्यास गेले तेव्हां विवेकच व्हावासा प्रकार दिसतो. याचें कारण, बाजी हातांत असल्या खेरीज जावयाचे नव्हत, त्याकरितां वाटतें. "

१४ एप्रिल. " विना ज्यानीं राजकारण केलें त्यानीं शिद्यांस टाकून केलें असेल असें नाहीं. जेथें होळकर तेथें शिंदे याचा संशयच नाहीं ! हरकसेंही करून श्रीमंतांचें व नानांचें संरक्षण होतें म्हणजे बरें होतें. "

१८ एप्रिल. " ज्यापक्षीं थोरले श्रीमंत आणावेसा सिद्धांत तेथील ( मोरोबाचा ) आहे तेव्हां फारच वाईट होणार. त्या लक्षांत वृद्ध ( सखारामबापू ) आहेत त्यांसही विरुद्ध होईलसें वाटतें. सारांश करवीरकर गृहस्थाचे ( महादजी शिंद्याचे ) पुरतेपणें आंतील भाव समजून त्यांस या कार्यावर प्रवर्तविलें पाहिजे. "

२१ एप्रिल. " श्रीमंतांस ममईहून आणविणार हा तर सिद्धांतच

दिसतो, तेव्हां बाकी काय राहणार ? प्राणाशींच गांठ आहे ! नानास मनसबा करणें असता तर फौजेस खर्चास पाठविते, पत्रे न येत तर विप्र एकामागून एक रवाना करिते, तें नाहीं तेव्हां सर्व कळलेंच आहे ! श्रीमंत रावसाहेबांस कसाबाच्या हातीं देतील इतकाच खेद ! वरकड ते तर आपले जिवावर उदारच आहेत. पुढें पैका कोण खाणार श्री हरि जाणे ! "

२४एप्रिल. " श्रीमंत इंग्रज सुद्धां येतात त्यापक्षीं कोणाचे जीव राहतात असा अर्थ नाहीं. श्रीमंतांशीं घांसलें नाहीं असें राज्यांत कोणीच राहिलें नाहीं. सर्व त्यांच्या नजरेंतच आहेत. ! ........ ( मोरोबानीं ) इंग्रजांस छत्तीस लाख रुपये देऊं केले ते कोणच्या मोहिमेंत मिळवून देणार ! तेव्हां (आह्मांसारख्या) चार गोरगरिबांपासूनच घेतील ! "

मध्यंतरीं परशुरामभाऊंस कळून आलें कीं, नाना केवळ निरुत्साह होऊन मोरोबाचा छळ सोशीत रिकामे बसले नसून त्यानीं कांहीं मसलत योजिली आहे व मोरोबा, सखारामबापू, इंग्रज, दादासाहेब व तत्पक्षीय सर्व लोक यांशीं टक्कर मारण्याची हिंमत धरिली आहे. त्याप्रमाणें नानाचा त्यांस व हरिपंत तात्यांस इशाराही आला कीं, तुह्मी अगदीं हळूहळू कृष्णेपावेतों यावें व पुढें सुचवीन तसें वागावें. तो इशारा येतांच परशुरामभाऊंस फार बरें वाटलें. ते ता. १ मे च्या पत्रांत लिहितात--

" नानास मनसबा करणें, तेव्हां जिवावर उदार असलें पाहिजे........ सर्वांचीं लक्षें हिमतीनें राखावीं,........सारांश, हिंमत न सोडावी. किल्लेकोटांचे बंदोबस्त चांगले करावे. त्यांणीं काय करणें आहे ! ........ नानानीं या मसलतींत पडणें तेव्हां अब्रूनें मेळवावें अगर गमवावें. नासल्यास हिंमत न सोडावी. नबाबाकडील राजकारण पक्कें करावें. तसेंच भोसले गाइकवाड यांचें लक्ष नीट रक्षावें, असे निरोप नानाकडे सांगून पाठवावे. "

"राजश्री नाना किल्ल्याखालीं येतात जातात ह्मणून कळलें, त्यास येविशींची सूचना जरूर करावी ( कीं ) खालीं उतरूं नये. ते ( होळकर मोरोबा वगैरे ) दगाबाज आहेत. कोणे समयीं काय करितील न कळे, यास्तव वरूनच जाबसाल करणें तो करावा. येविशीं आह्मी नानासही चिठी लिहिली आहे. "

हरीपंतांविषयीं येथें थोडें लिहिलें पाहिजे. त्यांच्या फौजेचे हाल व दुर्दशा अद्यापि चालूच असून हल्लीं तिची कांहीं चमत्कारिक स्थिति झाली होती. 'फौजेस निरोप देऊन सडे पुरंदरास यावें' म्हणून मोरोबादादानीं त्यांस जो हुकूम पाठविला होता त्याची अंमलबजावणी आपोआपच होत होती. कारण कीं तीन महिने सरकारांतून पोटास एक पैसाही न मिळाल्यामुळें दररोज शेंकडों शिलेदार निराश होऊन आपोआपच घरास जात होते. कांहीं राहिले होते त्यांस फितवून एकीकडे हैदरअल्ली आपणाकडे ओढूं पहात होता तर दुसरकिडे मोरोबादादाही तेंच करित होते! मोरोबाचा फितूर दोन प्रकारांनीं चालू होता. कांहीं लोकांस ते फौजेंतून 'उठून जाणें' म्हणून चिथावून देत, आणि कांहींस 'हरीपंतास पुढें घालून घेऊन पुरंदरास येणें' अशीं पत्रें पाठवीत! असा त्या फौजेचा गळाठा होता. नानानीं अलीकडे एकदां मात्र रोजमुरे वांटण्याकरितां हरीपंताकडे दोन लक्ष रुपये पाठविले होते, पण ते तर चणेफुटाण्यावारी केव्हांच उडून गेले! त्यानीं आधिक तरतूद करावी तर त्या फौजेविषयीं आपली अधिक आस्था आहे हें लक्षांत येऊन मोरोबाही इंग्रजांशीं अधिक लगट करूं लागतील हें नानांस भय होतें! परंतु त्यांतले त्यांत हरीपंतांच्या फौजेतील प्रमुख सरदारांची मर्जी सुप्रसन्न राखण्याची कांहीं खटपट नानानीं केल्याचें दिसून येतें. त्यानीं नीलकंठराव थोराताचा गुन्हा माफ करून त्याची पागा त्यास परत दिली; तोफखान्यावरचे अंमलदार सखारामपंत पानशे यांस विजापुरच्या सुभ्याचें काम सांगितलें; आणि मुधोळचे मालोजी राजे व शंकराजी राजे घोरपडे यांस तिकोटें, पडसलगी वगैरे पन्नास हजारांचा सरंजाम देऊं केला. अशाही विपत्तींत "हुजरातीची फार करून श्रीमंत रावसाहेबांच्या पायांवर दृष्ट आहे" असें परशुरामभाऊ अभिमानानें लिहितात! एका पत्रांत ते म्हणतात कीं, "हलके हलके येतों यास्तव लोकांची कटकट पडती. 'उपवासी मरत मरत हलकी मजल कां नेतां? लांब मजल करून लवकर घरास तरी जाऊं!' असें लोक बोलतात. पोटास मागावयाचें लोक विसरले!" बिचारे भोळे शिलेदार! साष्टीस तयार झालेलीं इंग्रजांचीं चार पलटणें व सत्रा तोफा हरीपंतांच्या डोळ्यांसमोर रात्रंदिवस दिसत होत्या. त्या या अ-

एप्रिल.

डाणी शिलेदारांस कोठें दिसत होत्या ! देशबुडव्या मत्सरी मुत्सद्यानीं आपल्या राष्ट्रावर केवढें अरिष्ट आणिलें आहे हें त्यांस कळत नव्हतें ! ती मोठी नाजूक वेळ होती. हरीपंत उतावीळपणा करिते तर मोरोबादादा घाबरून तत्काळ दादासाहेब व इंग्रज यांस बोलाविते ! याकरितां हरीपंततात्या अगदीं हळू मजलीनीं येत होते इतकेंच नाहीं, तर उलट आपण परतून हैदरावर स्वारी करून जाण्याच्या तजविजींत आहों असें मोरोबास भासवीत होते !

इकडे पुण्यास मोरोबादादांचें गुरगुरणें फुरफुरणें सुरूच होतें. रामचंद्र गणेश कानडे हे नामांकित सरदार. माधवराव पेशव्यानीं सन १७६९।७० त उत्तर हिंदुस्थानांत स्वारी पाठविली तेव्हां त्या स्वारीवर यांस मुख्य सरदार नेमिलें होतें व विसाजी कृष्ण बिनीवाले यांस यांचे दुय्यम नेमिलें होतें;* आणि शिंदे होळकरानीं यांच्या हाताखालीं काम करावें असें ठरविलें होतें. एवढ्या योग्यतेच्या सरदारास मोरोबानीं तंबी दिली कीं, तुह्मी आतांच्या आतां आपल्या फौजेस निरोप देऊन जरीपटका ‡ माझ्या हवालीं करा, नाहीं तर पहा होळकरास सांगून तुमचें कसें करीन तें ! त्या सरदारानें नानाकडे पाहिलें आणि त्यानीं मान डोलवितांच फौज घरोघर लावून दिली व जरीपटका मोरोबांच्या हवालीं केला ! हरीपंतांच्या कुमकेस आप्पा बळवंत व बाजीपंत अण्णा कर्नाटकांत जात होते ते कृष्णेवरच मुक्काम करून राहिले होते. त्यांची कर्नाटकांत रवानगी करण्यांत नानाचा हेतु हरीपंतांस मदत व्हावी हा होता आणि सखारामबापूचा हेतु कसें तरी करून त्यांस नानापासून दूर घालवावें हा होता; हें आतां वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. होळकरानीं नानास धरण्याचा यत्न केल्याचें वर्तमान ऐकतांच ते दोघे सरदार तत्काळ परत आले. त्यांच्या फौजेचा तळ पुण्याहून दक्षिणेस दहा कोसांवर किकवी येथें पडला. ती फौज पहातांच होळकरांस

---

* बिनीवाले मुख्य सरदार व रामचंद्र गणेश त्याचा दुय्यम असें डफसाहेब लिहितात ती चूक आहे.

‡ मोठ्या मोहिमेवर सरकारच्या वतीनें जो सरदार जाईल त्यास सरकारांतून हें निशाण देण्यांत येत असे. आदल्या वर्षी करवीरच्या मोहिमेवर रामचंद्र गणेश यांची सरकारांतून रवानगी झाली तेव्हां त्यांस हा जरीपटका मिळाला होता. मोरोबादादांनीं पार्वतीबाईकडून असलाच एक जरीपटका मिळविला होता, हें वाचकांस स्मरत असेलच.

संशय येऊन ते किकवीची फौज व पुरंदराखालची नानाची फौज यांच्यामध्यें करेच्या पाण्यावर येऊन उतरले. मोरोबानीं याही फौजेस तावडतोब निरोप देण्याविषयीं नानास सांगून पाठविलें. तें न ऐकावें तर कलागत होणार, असें पाहून नानानीं आप्पा बळवंत व बाजीपंत यांस आपणाजवळ बोलावून घेऊन त्यांजकडून त्यांच्या बहुतेक फौजेस निरोप देवविला. रोजमुऱ्याचा हिशेब न चुकवितां केवळ बळजबरीनें वर सांगितल्याप्रमाणें मोरोबानीं फौजा घरोघर लावून दिल्या हें मोठें अन्यायाचें कृत्य केलें. दुसऱ्या एखाद्या वेळीं याबद्दल कटकट पडून रक्तपात झाल्याशिवाय राहिला नसता. परंतु ती वेळ सबुरी करण्याची असल्यामुळें नानाच्या बाजूचे ते सरदार गप बसले. खरें पाहिलें तर मोरोबास कारभारांतून काढण्यास नाना आतां निमित्त मात्र होणार होते. एरवीं होळकराच्या किंबहुना इंग्रजांच्या बळावर सुद्धां त्यांच्या हातीं चार दोन महिने कारभार राहणें मुष्कील होतें. हातांत अखत्यारी येऊन महिना पंधरा दिवसही झाले नव्हते, अजून कशास कांहीं ठिकाण नव्हता, तों इतक्यांतच ते शिंदे व पटवर्धन यांच्या जहागिरी खालसा करण्याच्या गोष्टी बोलूं लागले, आणि निजामअल्लीस इतकी जहागीर कां दिलीत म्हणून बापू व नाना यांस दोष देऊं लागले !

अखत्यारी हातीं आल्यावर मोरोबादादांच्या मनांत येऊं लागलें होतें कीं, श्रीमंत दादासाहेबांस मुंबईहून आणण्यांत आपला कांहीं फायदा नसून उलट तोटा मात्र मोठा आहे; याकरितां त्यांस आणूं नये. परंतु श्रीमंतांचे चितो विठ्ठल वगैरे अनुयायी व होळकर व इंग्रजांचा वकील हे त्यांस चैन पडूं देत नव्हते. पूर्वी आह्मांशीं कबूल केल्याप्रमाणें आतां श्रीमंतांस कधीं आणणार अशी त्यांची टकळी नेहमींच सुरू होती. त्यावरून त्रिवर्ग कारभाऱ्यांच्या 'कौन्सिल' च्या बैठका जेव्हां जेव्हां होत, तेव्हां तेव्हां मोरोबादादा श्रीमंतांस आणावें कीं न आणावें ही चर्चा काढीत आणि प्रत्येक वेळेस नाना त्यांच्या आक्षेपांचें समाधान करून श्रीमंतांस आणूं नये असेंच मत स्थापीत असत. याप्रमाणें एप्रिल महिना चर्चेंत निघून गेला. त्या महिन्याच्या अखेरीस मोरोबानीं होळकरांकडून नानास धरविण्याचा यत्न केला. तो यत्न फसलासें पहातांच मोरोबाची खात्री झाली कीं, नानाची बाजू खंबीर असून तिजपासून आपला नाश होण्याचें भय

अद्यापि कायमच आहे. आतां फितूर वगैरे आपले सर्व उपाय थकले. दिवस तर अखेरीचे आले. आतां श्रीमंत दादासाहेब व इंग्रज यांस आणिल्याबांचून गत्यंतर नाहीं, अशी खाती झाल्यावरून त्यानीं सखारामबापूस चिठ्ठी लिहिली कीं, "पटवर्धनांचें व वडिलांचें (वयानें वडील चुलतबंधु नाना यांचें) व शिंद्यांचें पारिपत्य नाहीं तरी आम्ही सर्वच बुडतों. सर्व दौलत नानाचे हातीं याचा विचार केला पाहिजे. याजकरितां विसाजीपंत व दादोपंत वाघोलकर असे पाठवावे. त्यांसीं बोलून आपणाकडे पाठवितों. ते सविस्तर सांगतां कळेल." बातम्या काढण्याच्या कामांत नाना फडनविसांची कांहीं पराकाष्ठा होती! त्यानीं ही मोरोबाची चिठ्ठी बापूच्या दप्तरांतून 'कोणे द्वारें खर्च वेंच करून' मिळविली व कांहीं दिवसांनीं ती महादजी शिंदे व परशुरामभाऊ यांस दाखवून मोरोबाच्या दुष्ट हेतूंबद्दल त्यांची पक्की खात्री करून दिली! असो. ज्या अर्थी या चिठ्ठीचें कांहीं अक्षर मोरोबाच्या हातचें व कांहीं गोपाळ नाईक तांबेकर याच्या हातचें होतें, त्याअर्थी दादासाहेबप्रकरणाशीं या चिठ्ठीचा संबंध उघड दिसतो. कारण कीं, हा तांबेकर व मुष्टीम (मि० मॉस्टिन्) असे दोघे असामी मोरोबाकडून श्रीमंत दादासाहेबांस बोलाविण्याकरितां मुंबईस जाणार ही वदंता पुण्यांत आठ पंधरा दिवस पसरली होती. या बोलावण्यास सखारामबापूंची संमति अवश्यक होती. ती संमति मिळविण्याच्या मसलतीचा चिठ्ठीच्या द्वारें हा उपोद्घात झाला होता. परंतु आयत्या वेळीं दादासाहेब व इंग्रज यांस बोलावणें पाठविण्याच्या भानगडींत पडण्याचें सखारामबापूंनीं अगदीं साफ नाकारिलें! तें कां हें नीट समजण्यास या वेळीं इंग्रजांचीं कारस्थानें काय चाललीं होतीं हें समजलें पाहिजे. याकरितां त्याविषयीं आतां थोडें लिहूं.

पुरंदरचा तह होईपर्यंत इंग्रजांशीं बोलण्या चालण्याचे व पत्रव्यवहार करण्याचे नाना फडनविसांस अनेक वेळां प्रसंग आले त्यांवरून हे इंग्रज लोक लबाड व दगलबाज आहेत असें त्यांचें मत झालें. तह झाल्यावर तरी इंग्रजांनीं त्याप्रमाणें वागणें योग्य होतें. परंतु ते तसे न वागल्यामुळें त्यांविषयीं नानांचें प्रतिकूल मत अधिकच ठाम ठरलें. दादासाहेबांस आसरा देऊं नये हें जें तहांतलें मुख्य कलम—कीं ज्या-

साठीं पुणें दरबार तह करण्यास कबूल झालें---तें इंग्रजांनीं पाळण्याचें नाकारून श्रीमंतांस दरमहा दहा हजार रुपये नेमणूक ठरवून मुंबईंत ठेवून घेतलें. तेथून ते (श्रीमंत) आपल्या स्वभावाप्रमाणें मराठी राज्यांत रोज नवे नवे फंद फितूर निर्माण करीत असत व त्यामुळें पुणें दरबारास फार त्रास पोंचत असे. मराठी राज्यांतल्या बंडखोरांस आश्रय देऊं नये असें तहांत कलम असतां तोतयाच्या बंडांतल्या हजारों लोकांस इंग्रजांनीं साष्टीच्या टापूंत ठेऊन घेतलें होतें. अशी त्यांनीं वांकडी चाल धरिलेली पहातांच त्यांस ताळ्यावर आणण्याकरितां नानासही जे योग्य उपाय वाटले ते त्यानीं केले. तहांत बारा लक्ष रुपये हप्तेबंदीनें इंग्रजांस देण्याचा करार होता ते त्यानीं दिले नाहींत, व तीन लक्ष रुपये उत्पन्नाचा मुलूख देण्याचा करार होता त्याप्रमाणें मुलूखही दिला नाहीं. आपली वागणूक तहाच्या शर्तीप्रमाणेंच आहे हें दाखविण्यासाठीं मुंबईचे गव्हर्नर व कौन्सिलर नाना प्रकारचीं तर्कटी उत्तरें देत, त्यामुळें नानाही तर्कटाशीं तर्कटच लढवूं लागले. !!! यास उदाहरण वर सांगितलेला तीन लक्षांचा मुलूख देण्यासंबंधाचें आहे. इंग्रजांस नाना बोलले कीं, तुम्हांस तीन लक्ष रुपये आकाराचा मुलूख देण्याचें फक्त तहांत कलम आहे. तो आकार 'कमाली' कीं 'वसुली' हें कांहीं तहांत लिहिलेलें नाहीं. आम्ही 'कमाली' आकाराचा मुलूख देऊं, 'वसुली' आकाराचा देणार नाहीं! आतां 'कमाली' व 'वसुली' हे दोन्ही शब्द जरी जमाबंदी खात्यापैकींच आहेत तरी या दोन शब्दांच्या अर्थांत मोठाच फरक आहे. **कोणा एका काळीं** एखाद्या परगण्याचा अधिकांत अधिक वसूल सरकारी दप्तरांत नमूद असेल तो त्याचा 'कमाली' आकार होय. 'वसुली' म्हणजे **हल्लीं** खरोखरी जो आकार वसूल होत असेल तो. तीन लाख 'कमाली' आकाराचा मुलूख कांहीं अस्मानी सुलतानीमुळें ओसाड पडून **आतां** एक लाख वसुलाचाही असूं शकेल किंवा निर्जन अरण्यही असूं शकेल! इंग्रज अर्थातच 'वसुली' आकाराचा मुलूख मागत होते. याप्रमाणें 'कमाली' कीं 'वसुली' ही तक्रार उभय सरकारांमध्यें दोन वर्षें चालली होती! नानासारख्या पहिल्या प्रतीच्या राजकारणी पुरुषानें असली फसवेगिरीची कोटि लढविल्याचें वाचून वाचकांस मोठा वि-

स्मय वाटेल. पण मुंबई सरकारचें वर्तनही असेंच गर्हणीय होतें हें त्यावेळचा इंग्रजी पत्रव्यवहार जो निःपक्षपातानें वाचील त्यास सहज कळून येईल. असो. तर याप्रमाणें 'शेरास सवाशेर' या न्यायानें वागणाऱ्या नानावर इंग्रज फार जळफळत असत. सखारामबापू मुख्य कारभारी असून त्यांवर त्यांचा नानाइतका राग नव्हता !

त्यांतल्यात्यांत इंग्रजांस विशेष चीड येण्याजोगी एक गोष्ट नानांनीं आदले वर्षी केली होती. ती ही कीं, त्यांनीं इंग्रजांचे हाडवैरी फ्रेंच लोक यांचा वकील पुणें दरबारीं ठेवून घेतला इतकेंच नाहीं, तर त्या वकिलाचा खूब बडेजाव राखून इंग्रजांस असें भासविलें कीं, फ्रेंचांची व आपली दोस्ती झाली आहे ! इंग्रजांनीं दादासाहेबांस घालवून द्यावें व आपणाशीं सरळपणानें वागावें एवढ्यासाठीं नानांनीं हें एक बुजगावणें उभें केलें होतें, पण इंग्रजांस तें सारें खरें वाटून त्यांच्या अंगाचा तिळपापड होऊन गेला ! फ्रेंच लोक आमुचे हाडवैरी असतां त्यांच्या वकिलास आणण्याकरितां अंबारीचा हत्ती, स्वार, नौबत, निशाण वगैरे एखाद्या राजाच्या स्वारीचा लवाजमा बोरघांटाच्या पायथ्यापर्यंत पुणें दरबार पाठवितें आणि आमच्या वकिलास भाड्याचें तट्टू सुद्धां मिळत नाहीं ! तो फ्रेंच वकील अंबारींत बसून थाटानें दरबारास येतो तेव्हां सखारामबापू व नाना फडनवीस त्यास सामोरे जातात आणि दरबारांत आणून आपणाजवळ बसवून घेऊन ' फराचिसांच्या बादशहाचा वकील ' म्हणून बरोबरीच्या नात्यानें वागवितात; आणि त्याच दरबारास आमचा वकील जातो तेव्हां कोणी तिसऱ्या प्रतीचा मुत्सद्दी सामोरा येऊन त्यास कोठें कोंपऱ्यांत नेऊन बसवितो आणि घटकाभरानें बोळवण करून लावून देतो ! केवढा हा अन्याय ! इंग्रजांनीं आरोळी ठोकली कीं, नाना व फ्रेंच एक झाले, त्याअर्थी फ्रेंचांचीं पलटणें पुण्यास येण्यापूर्वी नानास चिरडून टाकिलें तरच आमची धडगत ! आतां त्यांस जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं नाना फडनवीस दिसूं लागले व त्यांस चावूं कीं गिळूं असें होऊन गेलें !

पुढील आशेवर नजर देऊन इंग्रजांनीं दादासाहेबांस हट्टानें मुंबईस ठेवून घेतलें होतें, पण त्यांचा खर्च चालविण्याकरितां महिना दहा हजार रुपये द्यावे लागत होते ते त्यांस आतां जड वाटूं लागलेच होते. त्यामुळें दादासाहेबांस पुण्यास नेऊन मुख्य अधिकारावर स्थापून

आपलें कल्याण करून घ्यावें आणि नानास जमीनदोस्त करावें, अशी इंग्रजांनीं मसलत योजिली. त्या मसलतीस अनुसरून त्यांचीं मागें सांगितलेलीं सहा पलटणें उत्तरेकडून काल्पीपर्यंत आलीं होतीं. पुढें तीं इकडे आल्यावर मुंबईच्या पलटणांस सामील होऊन मोहिमेस सुरुवात व्हावयाची होती.

इतक्यांत मोरोबाचें खूळ उभें राहण्याच्या बेतांत आलें तेव्हां अनायासेंच आपले मनोरथ सिद्धीस जाण्याचा हा सुयोग आला असें वाटून इंग्रजांस फार आनंद झाला. त्यांचा वकील मॉस्टिन् यानें मोरोबा व त्याचे सागे यांस बगलेंत मारून होळकर व सखारामबापू यांशीं सारें राजकारण ठाकठीक जुळवून ठेविलें असावें. परंतु मोरोबाचें बंड प्रकट होईल तेव्हां वर्ष दोन वर्षें मराठी साम्राज्यांत धुमश्चक्री माजेल व तींत पडण्याकरितां आपणास निमंत्रण होऊन मुबलग पैका व मुलूख मिळविण्याची संधी येईल म्हणून मुंबईसरकारास जी आशा होती ती मात्र सफळ झाली नाहीं! सखारामबापूनीं मोरोबाचा व नानाचा समेट करून दिला व नानानीं आपली अखत्यारी बिनतक्रार मोरोबाच्या हवालीं केली, या दोन्हीं गोष्टी मि. मॉस्टिन् यास आवडल्या नाहींत. तो खेदानें लिहितो कीं, इतक्या सुलभ रीतीनें मोरोबांचें काम झाल्यावर ते आतां दादासाहेबांची व आमची आठवण कशास काढितील? त्यांचें काम झालें. त्यांस पाहिजे होतें तें मिळालें. अखत्यारी मिळाल्याबरोबर नानास धरून कोठें पाताळांत गाडून टाकावें तें न करतां मोरोबानीं नानाकडे अद्यापि पेशवे, पुरंदर व फौज राहूं दिली आहे हा त्यांचा केवढा मूर्खपणा! नानाची अखत्यारी गेल्यानें आम्हांस काय फायदा झाला? कारभाऱ्यांच्या कौन्सिलांत नाना अजूनही मेंबर आहेतच. महत्वाच्या बाबतींत त्यांचा सल्ला घेतल्याखेरीज मोरोबाचें कांहीं एक काम तडीस जात नाहीं. फ्रेंचांचा वकील तर अजून पुण्यांत बसलाच आहे. मि. मॉस्टिन् यानें पुणें दरबारची ही स्थिति लिहिलेली वाचून मुंबईसरकारचा हिरमोड झाला. त्यानीं स्वारीसाठीं सैन्याची तयारी केलेली फुकट गेली. याप्रमाणें एप्रिल महिना गेला.

पुढें इंग्रज व दादासाहेब यांस आणिल्यावांचून गत्यंतर नाहीं असें जेव्हां मोरोबास वाटलें त्या वेळीं पडत्या फळाची आज्ञा

घेऊन व प्रत्येक कामांत भरपूर फायदा हुडकणारी वाणिज्य-वृत्ति टाकून देऊन जलदीजलदीनें जर इंग्रज दादासाहेबांस घेऊन पुण्यास येते तर त्यांचा कार्यभाग साधण्याची ती उत्तम संधी होती. सखारामबापू त्यांच्या येण्याकडे कानाडोळा करिते व आपल्या वित्त-विषयाच्या सुरक्षितपणाबद्दल त्यांची हमी घेऊन स्वस्थ घरीं बसते. किंवा न बसते तरी इंग्रजांपुढें त्यावेळीं त्यांचें काय चालणार होतें ! नानांचेंही कांहीं चाललें नसतें हें उघड आहे. श्रीमंत दादासाहेबांस पुण्यास नेऊन तेथें त्यांची अधिकारावर स्थापना मात्र आम्ही करूं. पुढें तो अधिकार आपणाकडे कायम राखणें हें काम श्रीमंतांचें आहे. कारभारी व सरदार यांशीं मिलाफ करून घेऊन तें त्यानीं साधून घ्यावें अगर काय पाहिजे तें करावें, त्याबद्दल आपण जबाबदार नाहीं, एवढेंच इंग्रजांचें ह्मणणें होतें. या पलीकडे त्यांच्या मसलतीची धांव आजपर्यंत केव्हांही गेली नव्हती. आणि इतकें तडीस जाण्यास ती उत्तम वेळ होती. परंतु यावेळीं इंग्रजांचा बेसुमार लोभीपणा त्यांस आडवा आला !.त्यानीं अशा अटी घातल्या कीं, श्रीमंतांस पुण्यास आणून अधिकारावर स्थापण्याच्या कामगिरीबद्दल वसईचा किल्ला व परगणा आम्हांस बक्षीस मिळावा. मागच्या तहांत पेशवेसरकारांतून गुजराथेंत मुलूख देऊं केला आहे तो आह्मांस नको. त्याच्या मोबदला वसई परगण्यास लागून तितक्याच आकाराचा मुलूख आह्मांस द्यावा. शिवाय स्वारीच्या खर्चाबद्दल छत्तीस लाख रुपये द्यावे.* या सर्व शर्ती कबूल करून सखारामबापूनीं मुख्य कारभारी या नात्यानें सही शिक्यानिशीं आम्हांस लिहून द्यावें कीं, आमच्या बोलावण्यावरून तुम्ही श्रीमंत दादासाहेबांस घेऊन येत आहां ! ह्मणजे इंग्रजांस इतक्या गोष्टी पाहिजे होत्या—१ कारभारांतून नाना फडनवीस निघाले पाहिजेत. २ फ्रेंचांचें उच्चाटन होऊन त्यांस पुनः आसरा न मिळण्याचा बंदोबस्त झाला पाहिजे. ३ आपल्या

* ह्या काळच्या इंग्रजी पत्रव्यवहारांत 'कांहीं नियामित रक्कम' एवढेच शब्द आहेत, परंतु परशुरामभाऊंच्या पत्रांत 'छत्तीस लाख' असें स्पष्ट ह्मटलें आहे. आणि मुंबईसरकारानें १७७५ त फौजेच्या खर्चाकरितां दादासाहेबांजवळ ज्याअर्थी पंचवीस लाख मागितले होते त्याअर्थी हल्लीं छत्तीस लाख मागितले असतील हें संभवतें. कारण कीं, त्या वेळेपेक्षां हल्लीं श्रीमंतांच्या कुमकेस येणारी इंग्रजी फौज अधिक होती.

गळ्यांत दादासाहेबांचें लोढणें अडकलें आहे तें निघून शिवाय त्यांची अशा अधिकारावर योजना झाली पाहिजे कीं, जेणेंकरून पुढें त्यांपासून आपणास अनेक फायदे करून घेतां येतील. ४ या तिन्ही गोष्टी पेशवेसरकारच्या खर्चानें होऊन त्यांतही आपणास चार रुपये किफायत राहील अशी सोय असली पाहिजे. ५ शिवाय बक्षीस व मोबदला मिळून अशा सोईचा मुलूख मिळावा कीं, जेणेंकरून खुशाल घाटापर्यंत पाय पसरतां यावे. ६ आणि सर्वांत ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट ही कीं, सखारामबापूंनीं लेखी आमंत्रण द्यावें. ही आमंत्रणाची शर्त ठरविण्यांत बाहेरून दाखविण्याचा हेतु हा कीं, पुरंदरच्या तहावर बापूंची मुख्य कारभारी म्हणून सही आहे, याकरितां त्यानीं आमंत्रण केलें म्हणजे पूर्वीचा तह कायम राहून हा नवीन तह त्याची पुरवणी मानितां येईल व तह मोडल्याचें अपेश न घेतां साकसुरतपणें घेण्यास आह्मास ठीक पडेल. पण पोटांतील मतलब असा कीं, बापूंनीं अपणास लिहून दिलें ह्मणजे निदान छत्तीस लाखांस तरी एक भरभक्कम जामीन मिळाला! **राज्याच्या कल्याणा**साठीं **मुख्य कारभारी** या नात्यानें तुह्मी आह्मास बोलाविलेंत, याकरितां आह्मास खर्च लागला आहे तो **राज्यांतून** वसूल करून द्या; असें ह्मणावयास मोकळीक! पण याप्रमाणें ‘ आंखूडशिंगी बहुदुधी अल्पमोली ’ ची चोहोंकडून ओढाओढ सुरू होतांच ती लाथा मारून उधळून गेली! इंग्रज मागत होते त्याप्रमाणें सखारामबापूंनीं लिहून द्यावें तर त्यांस इकडे आड व तिकडे विहीर! इंग्रजांची मसलत नासली तर नाना फडनवीस प्राण घेणार. साधली तर छत्तीस लाखांचें सुदर्शन पाठीस लागणार, आणि प्रसंग इंग्रजांशीं! बापूंनीं साफ सांगितलें कीं असलें लिहून बिहून आपण कांहीं एक देणार नाहीं!!! झालें. सारेंच राजकारण घडघडलें! श्रीमंत दादासाहेबांची स्वारी चैत्र वद्य दशमीच्या सुमुहुर्तें साष्टीहून निघून अक्षतृतीयेच्या मुहूर्तें पुण्यांत प्रवेश करणार इत्यादि वल्गना आतां आपोआपच बंद झाल्या!

सखारामबापूंनीं याप्रमाणें आयत्या वेळीं फसविल्याचें वर्तमान मॉस्टिन यानें मुंबईच्या गव्हर्नरसाहेबांस लिहून पाठविल्यावर कांहीं दिवसांनीं असें ही कळविलें कीं, आतां मोरोबाचाही फारसा भरंवसा धरण्यांत तात्पर्य नाहीं. कारण कीं, नानाच्या शिकवणीवरून अलीकडे मोरोबादादाही

फ्रेंच वकिलाच्या नादीं लागले आहेत. मी अनेक वेळां जिकीर करून त्या वकिलास दरबाराकडून निरोप देवविला असतांही त्यानीं त्यास ठेवून घेतलें आहे! तें वर्तमान कळतांच गव्हर्नरसाहेब व त्यांचे कौन्सिलर यांस मोठा घुस्सा आला. त्यानीं हे पुणें दरबारांतले तिघेही कारभारी लबाड आहेत असें ठरवून आपल्या वकिलास लिहिलें कीं, पुरंदरच्या तहा-पैकीं अमुक अमुक कलमांचा आह्मी ह्मणतों याप्रमाणें कारभारी फडशा करून देतात कीं नाहीं हें त्यांस लेखी विचारून चौदा दिव-सांत त्यांचीं लेखी उत्तरें घ्यावीं. तीं उत्तरें समाधानकारक नसतील तर त्यांस साफ बजावून सांगावें कीं, इतउत्तर इंग्रज सरकारानें मराठी राज्याशीं लढाई सुरू केली आहे! परंतु इतकें होईतों मे महिना संपत आला होता त्यामुळें इंग्रजांनीं कितीही डरकण्या फोडिल्या तरी चार महिने तिकडे लक्ष देण्याचें नानास कारण राहिलें नाहीं!

या दिवसांत नाना फडनवीस कसे वागत होते हें लक्ष्यपूर्वक अवलोकन केलें ह्मणजे त्यांच्या धारिष्टाची, निश्चयाची, आत्म-संयमनाची व बुद्धिमत्तेची तारीफ करावी तितकी थोडीच असें वाटूं लागतें! मोरोबादादा बेसावध व खूष कसे राहतील या तज-विजींत रात्रंदिवस असावयाचें व त्यांस उलथून पाडण्यासाठीं गुप्त-पणें एकसारखा यत्न सुरू ठेवावयाचा, अशीं हीं दोन कामें त्यांस ए-काच वेळीं करावयाचीं होतीं! मोरोबाच्या चौक्या मार्गोमार्गीं बसले-ल्या होत्या. त्यांचे गुप्त हेर लष्करांत, दरबारांत, घरांत, असे चोंहींकडे होते. इतक्यांच्या डोळ्यांस पडदे बांधून आपला कार्यभाग साधीत राह-ण्याचें काम सुलभ नव्हे! मोरोबा, होळकर व त्यांचे चिंतो विठ्ठल वगैरे दुसरे सोबती आपणास लुटण्यास, कैद करण्यास किंबहुना ठार मार-ण्यास टपलेले आहेत, या सर्व अनर्थांचें मूळ सखारामबापू आहे, ज्यानीं आपल्या फौजेंत फितूर करून आपणास धरण्याचा यत्न केला ते पुरंदरच्या गडकऱ्यांसही फितविण्यास चुकणार नाहींत, या सर्व गोष्टी पक्कया ठाऊक असूनही अशा सर्व लोकांशीं लीनतेनें व हास्य-युक्त मुद्रेनें नेहमीं गोड बोलणें व त्यांच्या दुष्ट मसलती आपणास मा-हीत असल्याची लवमात्र ओळख त्यांस न देणें, हें करण्यास नानाच्या अंगीं केवढें आत्मसंयमन असलें पाहिजे! त्यांचें वक्तृत्व तर असें अमोघ होतें व भाषणाच्या शैलींत अशी मोहकता होती कीं जेणेंकरून मी कधीं

फसणार नाहीं असा निर्धार करणारे व सावध असणारे मोरोबादादा-ही फसून त्यांच्या कपटजालांत गुरफटून गेले! ज्या दिवसांत पुढच्या घटकेस काय दगा होईल याचा नेम नव्हता, अशाही दिवसांत नाना किल्ल्याखालीं कारणपरत्वें येत जात होते, होळकर व चितो विठ्ठल वगैरे मंडळीच्या गांठी घेत होते, आणि कारभारासंबंधें खलबतें होत तेव्हां तेथें बसून अमुक कारभार अमुक रीतीनें करावा असा सल्ला देत होते! आणि त्याच वेळीं मोगल व भोसले यांशीं आपणास अनुकूल राहण्यासाठीं पक्कीं राजकारणें करीत होते, आणि शिंदे, फडके, पटवर्धन यांजकडे पुढील मसलतीसंबंधें विश्वासू कारकुनांबरोबर निरोपही पाठवीत होते! सारांश दारूखान्यांत उभें राहून कोलितांचे खेळ खेळण्याचा त्यांवर प्रसंग आला होता. जर कोठें एखादी ठिणगी पडती तर सर्वस्वानिशीं प्राणांचा होम होण्यास उशीर नव्हता! पण हा खेळ ते धारिष्टानें, कौशल्यानें व सावधपणानें खुशाल खेळत होते!

मोरोबादादा वाटेंत पत्रें धरितील या भयानें नाना सर्वं कारस्थानें निरोपानिरोपींच चालवीत होते. अमुक काम नानाच सांगत आहेत ही खात्री पटण्याकरितां त्यांच्या हातची चिठी घेऊन पाठवून देण्याविषयीं परशुरामभाऊनीं शिवाजीपंतास ल्याहावें, आणि तशी चिठी तो नाना जवळ मागूं लागला म्हणजे 'लेख द्यावयाचा नाहीं' असें त्यानीं त्यास निक्षून सांगावें! पटवर्धनांच्या दप्तरांत मोरोबाच्या कारस्थानासंबंधाचीं शेंकडों पत्रें आहेत, पण त्यांत नानाच्या हातचें एकही नाहीं! इतर मुत्सद्यांनीं व सरदारांनीं वगैरे जीं पत्रें लिहिलेलीं आहेत तीं सर्व सांकेतिक भाषेत लिहिलेलीं असल्यामुळें त्यांचा अर्थ उकलण्यास जरा जडच जातें! उदाहरणार्थ पुरंदराहून शिवाजीपंतानें मिरजेस गंगाधरराव पटवर्धन यांस लिहिलेला पुढील मजकूर पहा.—"आपण लग्नाचा प्रकार दर्शविला, त्यास अवकाश थोडका राहिला. वऱ्हाडी जमा झाले पाहिजेत. समारंभ चांगला लौकिकाप्रमाणें झाला पाहिजे. येथें लग्नाच्या साहित्यांत आहेत. येथील साहित्यास गुंता नाहीं. तिकडून लग्न आलें म्हणजे कार्यसिद्धि होईल. साहित्य करून गृहस्थ वाट पहातात. पहिलेंच नाहीं म्हटलें असतें म्हणजे निश्चित राहते. निश्चयाचें सांगोन आतां अडचणी सांगों लागले, तथापि यानीं वचन बळकट धरून बसले आहेत. त्यांचें येणें न झाल्यास आणखीकडे जसा मिळेल तसा ( वर ) पाह-

तील." यावरून काय समजावें! पत्रावर नांव नाहीं गांव नाहीं! रवाना तारीख मात्र छ. ४ रबिलाखर ( २।५।१७७८) अशी आहे. पत्राच्या प्रारंभीं दोन तीन ओळींत लोकप्रसिद्ध गोष्टींचा उल्लेख करून पुढें हा वर उतरून घेतलेला मजकूर आहे. याचा सरळ मराठींत तर्जुमा करावयाचा झटला ह्मणजे असा होतो.—"शिंद्याची फौज इकडे येणार ह्मणून लिहिलेंत, पण आतां मोहिमेचे दिवस थोडके राहिले. तितक्यांत मोरोबाचें खूळ मोडण्याची तजवीज झाली तर बरें. नाहीं तर मृगसाल सुरू झालें ह्मणजे मोरोबा राज्यांतील मामलतींची घालमेल करणार आणि रसदेच्या रूपानें निम्मा वसूल मामलेदारांपासून घेणार. मग शिंदे येऊन काय उपयोग? दुसरे सरदारही जमा झाले पाहिजेत. बंदोबस्त चांगला झाला पाहिजे. नाना येथें मसलतीची तयारी करीत आहेत. येथल्या तयारीची काळजी नको. तिकडून फौज आली ह्मणजे कामच होईल. नाना तयारी करून वाट पहातात. शिंदे प्रथमच येत नाहीं ह्मणते तरी हरकत नव्हती. येतों असें खात्रीनें सांगून आतां तकरारी त्यानीं सांगितल्या तरी त्यांच्या प्रथमच्या वचनावर विश्वास ठेवून नाना स्वस्थ आहेत. ते येत नाहींत असेंच झाल्यास नाना अन्यत्र राजकारण करितील." याप्रमाणें या मजकुराचा अर्थ होतो. या पत्रव्यवहारांतले कित्येक सांकेतिक शब्द थोड्याशा तर्कानें कोणासही कळण्याजोगे आहेत. 'कपी' 'वृद्ध' 'जांबुवंत' हीं सखारामबापूचीं नांवें त्याच्या वार्धक्यावरून. 'लेखक' ह्मणजे वाक्याचें धोरण असेल त्याप्रमाणें नाना अथवा मोरोबा, त्यांच्या फडनविशीच्या दरकावरून. 'विदुर' व 'तांडव कृष्ण' हीं महादजी शिंद्यांचीं नांवें तो दासीपुत्र व लंगडा होता म्हणून. 'अजापालक' म्हणजे होळकर तो धनगर म्हणून! कित्येक शब्द समजण्यास दूरचे संबंध ठाऊक असावे लागतात. कांहीं संकेत आतां मुळींच कळण्याजोगे नाहींत.

इंग्रज मागत होते त्याप्रमाणें लेखी आमंत्रण देण्याचें बापूनीं नाकारिल्यापासून होळकर, मोरोबा व चिंतो विठ्ठल वगैरे मंडळीचें त्यांवर पूर्वीप्रमाणें प्रेम व विश्वास राहणें अशक्यच होतें. त्यांत मोरोबांचा उल्लू व शिरजोर स्वभाव पाहून बापूचें मन त्यांविषयीं दिवसेंदिवस विटत चाललें होतें आणि नानाचा नाश करण्यासाठीं आपण जी ही मसलत

आरंभिली आहे ती सिद्धीस जाण्याचा रंग दिसत नाहीं, आपण या फंदांत पडलों हें बरें झालें नाहीं, असेंही त्यांस अलीकडे वाटूं लागलें होतें; त्यामुळें त्यानीं पुनः नानाशीं सख्य करण्याचा बेत केला व भिवराव पानशे यांचे मार्फतीनें त्यांशीं बोलणें सुरू केलें. बापूकडून आपणाकडे असें बोलणें कधीं तरी येईल, मोरोबाचें व त्यांचें सख्य फार दिवस टिकणार नाहीं, हा अजमास नानानीं आगाऊच केलेला होता, त्यामुळें त्यानीं कालदेशवर्तमानावर नजर देऊन ती गोष्ट मागेंपुढें न पहातां तत्काळ कबूल केली. याप्रमाणें बापू व नाना यांची एकी झाली व तेणेंकरून बापूस फार संतोष होऊन त्यांचें मन स्वस्थ झालें. पुष्कळ दिवस मनास न मिळालेला हा स्वस्थपणा नानाशीं मैत्री झाल्यामुळें मिळाल्याबरोबर त्यानीं—त्या सत्तर पाऊणशें वर्षांच्या 'जांबुवंता' नीं—लग्न करून घेतलें ! ! ! वंदन किल्ल्याखालीं गोवें म्हणून गांव आहे तेथील एका गृहस्थाची मुलगी वधू नेमस्त केली होती. ता. २ मे रोजीं बापूंची स्वारी सासवडाहून निघून किल्लेवंदन येथें गेली व तेथें लग्नाचा सोहळा उरकून चार आठ दिवसांत परत आली. 'वधू चांगली थोर आहे;' म्हणून शिवाजीपंत निष्ठुरपणानें शिफारस करितो ! त्या काळची थोर वधू म्हणजे सात किंवा आठ वर्षांची ! बापूस पहिल्या बायकोपासून पुत्र आकोपंत म्हणून झाला होता. ती पहिली 'बायको वाईट' म्हणून त्यानीं स० १७६५ त दुसरें लग्न केलें होतें. ( पहा. ऐ. ले. सं. नं. ५३६ ) या द्वितीय संबंधापासून त्यांस एक कन्या झाली तिचें वय हल्लीं सहा सात वर्षांचें होतें. * गेल्या पांच वर्षांत बापूचा पुत्र आकोपंत वारला व दुसरी बायकोही वारली. पहिली जिवंत होती तिला मूल आतां होत नव्हतें. बापूसारख्या ऐश्वर्यवान् वृद्धास आपणास पुत्र नाहीं ही उणीव भासणें साहजिक आहे. तो हेतु पूर्ण व्हावा म्हणून हल्लीं बापूनीं तिसरें लग्न केलें. लग्न करून परत येतां येतां बापूनीं पुरंदरावर नाना फडनवीस होते त्यांकडे सांगून पाठविलें कीं, आम्ही तुह्मांकडे भोजनास येतों. तयारी करावी. त्या-

---

* पाऊणशें वर्षांच्या मनुष्यानें सात वर्षांच्या मुलीशीं लग्न करणें हें या काळांत जसें विरळा, त्याचप्रमाणें लग्नाच्या वेळीं **त्याची मुलगी सात वर्षांची** असणें हेंही विरळाच होय !

वरून नानानीं किल्ल्याखालीं येऊन बापूस मेजवानी केली. याप्रमाणें उभयतां कारभाऱ्यांची पुनः मैत्री झाल्याचें जाहीर झालें, तेव्हां लोकांत मोठी चळवळ उडाली; आणि केलेलें कर्म निस्तरून पुनः जिकडे तिकडे सांधवासांधव करण्यासाठीं बापूनीं हा जो नवीन डाव टाकिला होता त्याचा परिणाम काय होतो इकडे सर्वांचें लक्ष वेधलें !

---

# प्रकरण दहावें.

## मोरोबादादांचें कारस्थान.

### शेवट.

एवढा वेळपर्यंत मोरोबाच्या बंडाचा आदि व मध्य यांचें विवरण झालें. आतां अवसान म्हणजे शेवट कसा झाला हें सांगावयाचें राहिलें. प्रथमपासून या बंडाचा शेवट लावण्याचें काम नानानीं महादजी शिंद्यांवर सोंपविलें होतें. ते शिंदे करवीरच्या मोहिमेवर गुंतले होते ते आतां मोकळे होऊन पुण्याकडे निघून येण्यास सज्ज झाले होते. मोरोबा प्रकरणीं त्यांची वागणूक व विचार काय होते हें आधीं सांगून नंतर पुढील कथाभागास सुरुवात करूं.

मोरोबादादांस राज्यांत मुख्यत्वें चौघांचें भय फार वाटत होतें. ते चौघे नाना फडनवीस, हरीपंत, परशुरामभाऊ व महादजी शिंदे हे होत. पैकीं पहिल्या तिघांवर फितूर वगैरे गुप्त उपायांचा प्रयोग करून त्यांस हैराण करण्याच्या कामीं मोरोबांस थोडेंबहुत यश आलें होतें हें यापूर्वी दाखविलेंच आहे. महादजी शिंद्यांवर तसला कांहीं प्रयोग करून पहावा तर तेथें त्यांचीं डाळ शिजण्याजोगी नव्हती. त्या करवीरच्या मोहिमेंत शिंद्यांचे दिवाण बाळाराव गोविंद व सल्लागार राणेखान भाई व सरदार हरी बाबाजी, इंगळे, कदम, ताकपीर वगैरे होते ते सारे एकदिल असून आपल्या धन्याच्या सेवेविषयीं एकनिष्ठ व तत्पर होते. स्वतः शिंदे हे सरदार मर्द व मसलती, हाताखालचे सरदार अनुभवी व विश्वासू, बरोबर पंचवीस हजार निवडक फौज, शिवाय तोफखान्याचा जय्यत सरंजाम, इतकें असल्यावर

मोरोबाच्यानें शिंद्यांचें काय नुकसान होण्याजोगें होतें ? तथापि त्यांच्यानें स्वस्थ बसवेना. कारण कीं, प्रथमपासून शिंदे आपणास विरुद्ध आहेत हें मोरोबास ठाऊक होतें. मार्च महिन्यांतच शिंद्यानीं होळकरांस निक्षून निरोप* पाठविला होता कीं, तुम्ही मोरोबांस बगलेंत मारून राज्यांत बखेडे करण्याच्या विचारांत आहां ही गोष्ट बरी नव्हे. आह्मी तुह्मांस या कामीं सामील होणार नाहीं. यामुळें शिंद्यांचा नाश करण्याची–निदान त्यांच्या मार्गांत तूर्तातूर्त तरी कांहीं अडचणी आणून उभ्या करण्याची-खटपट करणें मोरोबांस भागच होतें. त्यासंबंधें त्यानीं प्रथम करवीरच्या महाराजांकडे राजकारण लावून पाहिलें. त्या महाराजांस शिंद्यानीं जेरीस आणिल्यामुळें ते वीस लाख रुपये देऊन तह करून घेण्यास कबूल झाले होते हें मागें सांगितलेंच आहे. ह्लीं मोरोबानीं महाराजांस निरोप पाठविला कीं, शिंद्याशीं तह केलेला रद्द करून लढाई सुरू ठेवावी. आम्ही इकडून तुमची कुमक करितों. तें बोलणें महाराजांस खरें वाटलें. पुण्याच्या दरबारांत नानांची पीछेहाट व मोरोबाचा बोलबाला झालेला त्यानीं पाहिला व मोरोबांस मदत करण्याकरितां मुंबईहून इंग्रज येणार असेंही वर्तमान ऐकिलें, त्यावरून त्यानीं शिंद्याशीं केलेला तह मोडून लढाई सुरू केली. पण पुण्यांत कारभारी भांडोत कीं कांहीं करोत, मी ह्मणून ज्या कामगिरीवर आलों आहें ती कामगिरी यथास्थितपणें पार पाडल्याशिवाय येथून हालणार नाहीं, असा पाटीलबावानीं निर्धार दाखविला. त्यानीं करवीरचे मोर्चे अद्यापि उठविले नव्हतेच. तह मोडल्याचें समजतांच त्यानीं चार दिवस करवीरावर तोफांचा असा भडिमार केला कीं, दर गोळ्यास घोडीं व माणसें पटापट मरतांना पाहून महाराजांस त्राहि

---

* हा निरोप नारो शिवदेव यांच्या एका पत्रांत सविस्तर वर्णिला असून तें पत्र रा. रा. द. ब. पारसनीस यांनीं विविधज्ञानविस्ताराच्या मे स. १९०७ च्या अंकांत ' अहिल्याबाईच्या चरित्राचें सत्य स्वरूप ' या निबंधांत छापिलें आहे. पण त्या पत्राचा अहिल्याबाईच्या चरित्राशीं कांहींएक अर्थाअर्थी संबंध नसतां तेथें तें कां घुसडून दिलें आहे हें समजत नाहीं. तें पत्र स. १७८०।८१ त लिहिलेलें असून त्या वेळीं शिंदे होळकर नर्मदेच्या उत्तरेस होते असें रा. रा. पारसनीस समजतात, ती त्यांची चूक आहे. तें पत्र मोरोबा प्रकरणीं स. १७७८ च्या मार्चांत लिहिलेलें असून त्या वेळीं शिंदे करवीरास व होळकर वाफगांवास होते हें त्या पत्रांतच लिहिलेलें आहे !

त्राहि होऊन गेलें ! त्यामुळें त्यानीं निरुपायानें पूर्वीचाच तह कायम करून घेतला. नंतर त्या तहपैकीं एकेक कलमाचा फडशा होण्याचें काम चालीस लागलें. करवीरची मसलत फसलेली पहातांच मोरोबानीं शिंद्यांविरुद्ध आणखी एक कारस्थान केलें. मानाजी शिंदे फांकडे इकडून पळून हैदरअल्लीकडे गेला होता त्यास त्यानीं पत्रें पाठविलीं कीं, तूं ताबडतोब निघून पुण्यास ये म्हणजे तुला शिंद्याची सरदारी देतों. मानाजी हा महादजी शिंद्याचा भाऊबंद होता व मागें दादासाहेबानीं एकदां मानाजीस शिंद्याची सरदारी दिली होती. हल्लीं मानाजीस पुण्यास आणून त्यास सरदारीचीं वस्त्रें द्यावीं व महादजी शिंद्याशीं भांडण्यास त्यास उमेदवार करून नवें खूळ उभें करावें हा मोरोबाचा बेत होता. पण हैदरअल्लीकडे महादजी शिंद्याचेंही सूत्र चांगलेंच होतें. त्यानीं त्यास पत्रें पाठवून मानाजीस तिकडच्या तिकडेच कैद करवून मोरोबाचा व्यूह ढांसळून पाडिला ! मोरोबानीं इंग्रजांस आणण्याची मसलत केली होती तींत सुद्धां शिंद्यांचें पारिपत्य करण्याचा हेतु होताच. परंतु ती मसलत सखारामबापूनीं सिद्धीस जाऊं दिली नाहीं हें मागें आलेंच आहे.

या प्रसंगीं महादजी शिंद्यांच्या वागणुकींत जो सावधपणा व मुग्धपणा दिसून येत होता तो लक्षांत ठेवण्यासारखा आहे. मोरोबाचें बंड पुण्यास प्रकट झाल्याबरोबर त्यानीं कर्नाटकांत हरीपंत व परशुरामभाऊ होते त्यांस विचारिलें कीं, 'कोठें आहां ! काय मनसबा ?' त्यांनीं उत्तर लिहिलें कीं, 'आह्मी माघारे फिरलों. तुह्मी श्रीमंतांचे एकनिष्ठ सेवक व नानाचे लक्षांतील. याकरितां तुह्मी आह्मी मिळून हें खूळ मोडूं या.' त्याचें उत्तर त्या वेळीं कांहींच न देतां शिंद्यानीं कांहीं दिवस गेल्यावर त्यांस 'पुण्याकडे येण्याची फारशी गडबड करूं नये' एवढा मात्र इशारा केला ! नानास मात्र त्यानीं प्रथमच खात्रीपूर्वक वचन दिलें होतें कीं, मी पुण्यास येऊन सर्व बंदोबस्त यथास्थित करून देतों. तें वचन त्यानीं योग्य प्रसंगीं पार पाडून दाखविलें. पण तेथपर्यंत मी अमुक करणार, अथवा मी अमुक पक्षास अनुकूल किंवा प्रतिकूल, हा कोणास कांहीं सुगावा लागूं दिला नाहीं ! त्यांचें मागचें वर्तन पाहतां हल्लीं तरी ते खरेपणानें वागतात कीं नाहीं असा लोकांस संशय येणें वास्तविक होतें. परशुरामभाऊस तर असा संशय होताच.

गंगाधरराव पटवर्धन यानीं यासंबंधें जें लिहिलेलें आहे त्यावरून शिंद्यांविषयीं त्या वेळचें लोकमत चांगलें कळतें. ते लिहितात, " शिंदे श्रीमंत राजश्री बापू व नाना यांच्या पुरते लक्षांत असल्यास मग चिंता नाहीं. होळकरासुद्धां सर्वांस गुंडाळून ठेवितील. परंतु एकतत्त्वीं राहतील कीं काय पहावें ! ( कारभाऱ्यांनीं ) जहागीर व किल्ला देऊं केला आहे त्यावरून मात्र भरंवसा वाटतो. " केवळ जहागिरीच्या आशेमुळें मात्र शिंदे नानास अनुकूळ असतील असें गंगाधरराव लिहितात हा मात्र अन्याय आहे. कारण कीं तितकी जहागीर मोरोबाही शिंद्यास देत होते. किंबहुना अधिकही देते. परंतु या प्रसंगीं नानास अनुकूल होण्यांत पाटीलबावांची राज्याच्या कल्याणावरच नजर होती हें निःसंशय आहे.

शिंदे करवीरचा कारभार आटपीतपर्यंत हरीपंत व परशुरामभाऊ विजापूर पंढरपुराकडे फिरत होते व फौजेचा '.तवा तोबरा' कसाबसा चालवीत होते. अजूनही त्यांजवळ पंधरा हजार चांगली विश्वासू फौज होती.. ता. १५ मे रोजीं शिंद्यानीं शिरोली नजीक करवीर येथून कूच केलें ते एकतिसाव्या तारखेस लोणंद येथें आले. तों संकेताप्रमाणें फडके व पटवर्धन समीप येऊन पोंचले. अजूनही दादासाहेबांस आणण्याच्या मसलतीस शिंदे अनुकूल आहेत असेंच पुण्यास मि. मॉस्टिन् समजत होता !

शिंद्यांची स्वारी लोणंदच्या मुक्कामीं आल्याची बातमी येतांच सखाराम-बापू त्यांच्या भेटीस निघाले. परंतु हे आपल्या आधीं भेटून शिंद्यांस काय सांगतील न कळे, अशी मोरोबास शंका वाटून त्यानीं बापूस दरडाविलें कीं, शिंद्याचे भेटीस तुह्मीं जाण्याचें काम नाहीं. तेच येथें येत आहेत. आल्यावर त्यांचें काय ह्मणणें असेल तें ऐकून घेतां येईल. तें बोलणें ऐकून बापूंस फार वाईट वाटलें व ते सासवडास परत आले. तेथून ते पळून शिंद्याकडे जाऊं लागतील तर त्यांस कैद करावें अशा बेतानें मोरोबानीं त्यांजवर पहारे ठेविले होते ! नंतर कांहीं वेळानें झालेला प्रकार ठीक झाला नाहीं असें वाटून मोरोबादादा स्वतःच बापूच्या घरीं येऊन बोलूं लागले कीं, तुह्मीं जाऊन शिंद्यांस भेटावें. मीही तुह्माबरोबर येतों. माझी व शिंद्यांची भेट करून द्यावी ! तें ह्मणणें बापूनीं मान्य केलें.

नंतर जूनच्या दुसऱ्या तारखेस सखारामबापू, मोरोबादादा, बजाबा पुरंदरे, रघुपतराव नारायण, भिवराव पानशे, पांडुरंगराव बारामतीकर, आपा बळवंत, रामचंद्र गणेश, गणेश काशी कात्रे असे हे उभय पक्षांतील प्रमुख लोक शिंद्यांच्या भेटीकरितां तीन हजार फौजेसह परिंच्यास आले. तुकोजी होळकर व विसाजीपंत विनीवाले हे मात्र या मंडळींत नव्हते. शिंदे जेजुरीस जाऊं लागतील तेव्हां वाटेंतच त्यांस भेटावें असा या मंडळीचा बेत होता. पण मोरोबा अद्यापि आडरानांत शिरण्याचें टाकीत नाहींत तर त्यांची भेट घ्यावयाची नाहीं हा शिंद्यांचा निश्चय होता. इंग्रज आले तर बरेंच झालें, नाहीं तर दादासाहेबांची पडेल तशी समजूत घालून त्यांस तरी घेऊन यावें असें सांगून मोरोबानीं चिंतो विठ्ठल यांस दोन तीन दिवसांपूर्वी घाईघाईनें मुंबईस पाठविलें होतें ती गोष्ट सर्वत्र महशूर झाली होती. त्याकरितां मोरोबाची भेट घेण्याचें नाकारून शिंदे जेजुरीस न जातां मोरगांवच्या मुक्कामास आले. हरीपंत तात्या व परशुरामभाऊही आपल्या फौजांसह त्यांस तेथें येऊन मिळाले. शिंदे आपली भेट घेत नाहींत असें पहातांच मोरोबाचा हिरमोड होऊन ते बरोबरच्या मंडळीसह परत गेले. मी शिंद्यांस भेटतों व तुमचीही भेट करून देतों असें सांगून सखारामबापू मात्र त्या मंडळींतून फुटून ता. ५ जून रोजीं मोरगांवास आले. तेथें शिंद्यांस भेटून त्यानीं त्यांजवळ " बहुत प्रकारें मागून घेतलें कीं, हा दोष मजकडे. आमचेविशींची क्षमा करावी. हा दोष मजकडे खरा, परंतु राखावें. मोरोबा आपल्यास कैद करीत होता म्हणून ( तुह्मांकडे ) निघून आलों. याउपरी तुमचे विचारास येईल तसा कारभार करावा. जें नाना व तुम्ही सांगाल तें ऐकूं. राजश्री हरीपंताच्या व परशुरामपंताच्या मनांत येविशीं बांकडें फार आलें आहे, त्यांची खातरजमा होत नाहीं, ती करावी. " **शिंद्यानीं** उदार मन करून मोरोबांच्या खुळांत सामील झाल्याचा गुन्हा **सखारामबापूस** माफ केला ! ! नंतर पुढील मसलतीविषयीं बापू म्हणाले कीं, लढाई केल्यानें दुतर्फा नुकसान होऊन राज्याचें वाटोळें होईल. याकरितां प्रस्तुतच्या बखेडयाचा कांहीं तडजोड करूनच निकाल काढिला पाहिजे. तेंही म्हणणें शिंद्यांस कबूल होतेंच. नंतर शिंद्यानीं हरीपंत

फडक्यांस आपले डेऱ्यास बोलावून आणून त्यांची व बापूंची भेट करून दिली. भेटींत बापू हरीपंतास म्हणाले कीं, " होळकरांची व शिंद्यांची समजाविशी करावी या विचारांत आहों; परंतु समजाविशी होत नाहीं. खटपट करून पहातों. " जसा काय हा ' समजाविशी ' करण्याचा प्रसंग ज्या बखेड्यामुळें उद्भवला त्या बखेड्याशीं आपला कांहींच संबंध नाहीं ! शेवटीं जातां जातां बापूंनीं शिंद्यांस फारच भीड घातली कीं, मोरोबाची व तुमची भेट करून देण्याचें मीं कबूल केलें आहे, याकरितां त्याची भेट घेऊन मजबरचें अपेश चुकवावें. शिंद्यानीं तें कबूल केलें, पण भेट घेण्याची तऱ्हा मात्र मोरोबास पसंत पडण्याजोगी नव्हती ! कारण कीं, दुसरे दिवशीं शिंदे दहा हजार फौज व तोफा घेऊन नाझरें येथें बापूंच्या डेऱ्यास आले. मोरोबाही तीन हजार फौजेसह तेथें आले. शिंद्यानीं पुढें सामोरें जाऊन भेट घ्यावी, तें न करतां डेऱ्यांतच मोरोबाची उभाउभी भेट घेतली व त्याशीं एक शब्दही न बोलता तसेच मोरगांवास परत आले ! त्यावरून लोक समजले कीं, मोरोबाचें कपाळ फुटलें !!!

' समजाविशी ' करण्याची ही सखाराम बापूंची दीर्घसूत्री मसलत शिंद्यानीं कबूल केली, हें हरीपंत व परशुरामभाऊ यांस पसंत पडलें नाहीं. त्यांच्या मतें आपलेजवळ आतां चाळीस हजार फौज जमली असून प्रतिपक्षाची सारी सोळा हजार आहे. याकरितां आतां मोरोबा वगैरे लोकांस आणखी फंद करण्यास फुरसत न देतां तडकाफडकीनें त्यांचीं पारिपत्यें करावीं. या कामीं लढाई करणें पडली तरी बेहत्तर ! पण पाटीलबावानीं दम खाण्याबद्दल युक्तीनेंच त्यांची समजूत घातली. त्याविषयीं परशुरामभाऊ लिहितात कीं, " मंदवारीं रात्रीं शिंद्याच्या डेऱ्यास बोलून पुढील निश्चय करावा या अर्थे आम्ही व हरीपंत तात्या, मालोजी घोरपडे, शंकराजी घोरपडे व आप्पाजीराव पाटणकर असे गेलों. तीन प्रहर रात्रपावेतों बोलणें झालें. शिंदे यांच्या बोलण्यांतील तात्पर्य ' जलदी करून जाऊन झुजावें तर ( होळकर वगैरे ) पळून जातील. श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडे जातील, अथवा आणखी एखादीकडे जाऊन खूळ माजवितील; तेव्हां जड पडेल, तेव्हां खर्चाखालीं यावें लागेल. तुमचे फौजेंत दंगा, तेव्हां

जलदी कशी करावी ? यास्तव रविवारीं कूच करून पुरंदराजवळ जाऊं. श्रीमंतांची व नानाची भेट घेऊं. पुढील तरतूद नाना कशी करितात हें समजून त्यांचे आमचे विचारें ठरेल तसें करूं.' आम्ही विशेष बोलावें तर खर्चाच्या अडचणी हें बाह्यात्कारी, आंतील बापूचें बोलणें झालें हे भाव; तेव्हां आम्ही आग्रह धरून फल काय ? आणि ( शिंद्याशीं ) आमचे गुजारतींचें राजकारणही नव्हे, परभारें नानानीं केलें, आम्ही आग्रह कशास धरावा, या अर्थें तेंच वाजवी म्हणोन रविवारचें कूच ठराव करून उजाडतां गोटास आलों. मसलत लांबवूं नये, जलदी करावी, नाहीं तर घोडीं मरतील, असें बोलून आलों. त्यांचें बोलणें ' जलदीच करितों. दिवसगत लावीत नाहीं. ' नंतर ता. ८ जून रोजीं शिंदे, फडके व पटवर्धन पुरंदराखालीं श्रीमंतांच्या भेटीस आले. त्या भेटीची हकीकत परशुरामभाऊ देतात ती–" राजश्री नाना नारायण देवळाजवळ भेटावयास किल्ल्यावरून खालीं आले. तमाम लहानमोठ्या सरदारांच्या व लोकांच्या भेटी जाहल्या. श्रीमंतांचे डेरे किल्ल्याखालीं दिले होते तेथें श्रीमंत होते. लोकांच्या भेटीचा समारंभ उरकून खासे खासे श्रीमंतांचे भेटीस गेलों, तरी चार घटका श्रीमंत डेऱ्यांत बसून मुजरा लोकांचा घेऊन विडे दिले. धनियाचे पाय पाहिले, आनंद झाला तो कोठवर लिहावा ? लोंक कसाला सोसून आले, श्रीमंतांस पाहून बहुत संतोष झाला. श्रीमंतांची बसावयाची व बोलावयाची व देखणेपणाची तारीफ काय लिहावी ! अति उत्तम आहे ! भेट झाल्यावर तोफांची सरबत्ती खालीं व किल्लेवर झाली. श्रीमंत चार पांच घटका दिवस अस्तमानास राहिल्यानंतर किल्लेवर गेले. राजश्री बापूंची भेट श्रीमंतांजवळ झाली. कारभारी यांजवळ बसून चार घटका बोलोन राजश्री हरीपंत तात्या व पाटील बाबा व आम्ही निघोन सहा घटका रात्रीस गोटास आलों. श्रीमंतांची बाललीला काय लिहावी ! केवळ ईश्वर —स्वरूपी आहेत. !!! " या प्रसंगाचें आणखी वर्णन ते दुसऱ्या एका पत्रांत देतात कीं, " अर्ध घटका नानाचें व आमचें बोलणें झालें. शिंद्यांचें व बापूंचें कांहीं वेळ. शिंद्यांचें व नानांचें बोलणें घटकाभर जाहलें. मग शिंदे, नाना व बापू असे मिळून बोलणें झालें. त्यांतील अर्थ पहातां जांबुवंत यांचे मतें आपले मंडळीचें संरक्षण करावें, शिंद्यांची व होळकरांची भेट

करावी, मग नानानीं कारभार करावा. मोरोबाचें चित्तास येईल तें करावें. म्हणजे आमचीं (कोकण्यांचीं) बोटें आमच्याच डोळ्यांत घालावीं! उपरांतिक आमचें नानांचें तात्यांसुद्धां बोलणें झालें त्यांतील निश्चय नानानीं शिंद्यांच्या लष्करांत यावें, खडखडीत बोलावें, मग ठरेल तें खरें. शिंद्यांच्या बोलण्यांतही 'बोलण्यास लांब पडतें. बापू (व) तुम्ही आम्ही बसून निश्चय करावा.' त्यावरून आज (नानानीं येथें) यावेंसें ठरलें आहे........फल कांहीं चांगलें दिसत नाहीं. काल बुडता आला. शिंदे होळकर उभयतां सरदार. त्यांत खुद्द शिंद्याजवळ फौज भारी. आमचीही हुजरात सुद्धां बारा तेरा हजार फौज. शिवाय नानाजवळ पांच हजार लोक. कमपेश चाळीस हजार फौज, गारदी, तोफखाना उभयपक्षींचा म्हणतां मातबर सरंजाम. तिकडील होळकर सुद्धां सोळा पंधरा हजारांचा अजमास. याप्रमाणें फौजा आहेत, परंतु कार्य दिसत नाहीं! आंत आंत मनस्वी राजकारणें! कोणाचाही विश्वास येत नाहीं.! आणशपथेंत ताल कांहीं राहिला नाहीं! चिंतो विठ्ठल श्रीमंतांकडे मुंबईस गेलेच आहेत. मोरोबादादा आणखी फौज ठेवीतच आहेत. जांबुवंतांचे मतें बजाबा आदिकरून आपली मंडळी तिकडे मिळाली आहे तिचें संरक्षण करावें! मग मोरोबा आदिकरून कोकण्यांचे चित्तास येईल तें करावें! इतक्यांत श्रीमंत (मुंबईहून) येतात कीं काय पहावें! बापूंच्या मनांत आमच्या व हरीपंताच्याविषयीं वांकडें फार आहे, असो! श्रीमंतांचे पुण्यप्रतापेंकरून आम्हीं निष्ठेनें सेवा केली आहे. बापूशीं चहूं पांच वर्षांत कांहीं वांकडेपण केलें नाहीं, त्यापक्षीं चिंता नाहीं. त्यांचीं कर्मे त्यांस जाचून याचा प्रतिकार करितील."

याप्रमाणें या वेळीं पुण्याच्या दरबारांत बजबजपुरी माजली असून ती नाना व शिंदे यांस क्रमाक्रमानें मोडावयाची होती. ती त्यानीं कशी मोडली हेंही आतां आम्ही परशुरामभाऊंच्याच पत्रावरून दाखवितों. पाहिलें काम बापू व नाना यांचा समेट करण्याचें. ते दोघेही शिंद्यांच्या लष्करांत येऊन बसलेच होते. ता. १३ जूनच्या पत्रांत भाऊ लिहितात कीं, "आज दोन चार दिवस घालमेल राजश्री नानाचे व बापूचे समजाविशीची लागली आहे. किरकोळ ठराव जाहला. 'देवावें' अलीकडे नाना करीत होते तें करूं नये असें

बापू बोलतात. ' कदाचित् नानाचा आग्रहच असला तर त्यांत माझा संतोष नाहीं. ' येविशींचें उत्तर प्रतिउत्तर आज दोन दिवस होत आहे." नंतर ता. १६ जूनच्या पत्रांत लिहितात कीं, " काल इंदुवारीं दहा घटकानंतर एका घटकेंत राजश्री नानाची व बापूची आण-शपथ व बेलभंडार शिंद्याच्या विद्यमानें जाहला. कांहीं दिक्कत राहिली नाहीं असें दिसतें. उभयतांही फजीत पावून निखालस जाहले, तेव्हां दरज राहिली नाहीं असें वाटतें. आणि दरज राहिली-ही नाहीं. या समयीं पक्केंसें जाहलें आहे. त्यानंतर नाना व बापू उभयतां मिळून सायंकाळचा चार घटका दिवस राहतां आम्हांकडे आले. वृद्धांस आमचा संशय होता. बोलणें दोन घटका जाहलें. ( आम्ही म्हणालों कीं आपण ) " उभयतां एक झाले, **श्रीमंतांचे पायांपाशीं निष्ठेनें वर्तणूक करणार**, त्या पक्षीं आमचा दुसरा अर्थ नाहीं, " म्हणोन आम्हीं वचन दिलें. त्यानीं बेलभंडार दिला. आह्मीही दिला. " इतकें होतें तों होळकरांचें " शिंद्यांशीं बोलणें लागलें होतें. त्यांतील तात्पर्य–' **वृद्धानीं** आह्मांस फसविलें. अब्रूस खत्ता पावलों. जें तुम्ही केलें तें आम्हीं केलें. आह्मीं केलें तें तुम्हीं केलें. तुम्ही आह्मी भाऊ, त्या पक्षीं तुम्हीं केलें तेंच आह्मांस मान्य. राजश्री मोरोबादादाचेंही ठीक करुन द्यावें, नाहीं तर ( त्यांस ) काशीस पोंचवून द्यावें. अथवा त्रिवर्गांस एक करून द्यावें. " त्यावरून होळकराकडे शिंद्यानीं सांगून पाठविलें कीं, मोरोबाचा विचार निराळा होईल. तुम्ही त्याचा अभि-मान धरून सरकारांत गैररुजू राहिल्यानें परिणाम लागणार नाहीं. याकरितां मोरोबास सोडून तुम्ही लवकर आम्हांस येऊन मिळावें. नानाशीं व इकडील सर्व मंडळीशीं तुमचें पूर्वीप्रमाणें सख्य करून देतों. याप्रमाणें नुसता निरोप पाठवून शिंदे स्वस्थ राहिले नाहींत. तर स्वतः एक दोन वेळां होळकरांच्या लष्करांत जाऊन त्यानीं त्यांची नाना प्रकारें समजूत घातली. तेव्हां त्यांचें बोलणें मान्य करून मोरोबास सोडून देऊन होळकर आपले फौजेनिशीं जूनच्या एको-णिसाव्या तारखेस निराळे सासवडाजवळ येऊन उतरले. लगेच शिंदेही आपला तळ हालवून त्यांजवळ जाऊन राहिले. होळकराब-रोबरच विसाजीपंत बिनीवाले व आनंदराव गोपाळ हेही निघून आले. राहतां राहतां तळावर मोरोबादादा व बजाबा पुरंदरे व पांडु-

रंगराव बारामतीकर एवढे तिघे मात्र राहिले ! आतां तीन फौजांचे तीन निरनिराळे तळ झाले. शिंदे होळकर मिळून तीस पसतीस हजार फौजेचा तळ सासवडाजवळ होता. नाना फडनवीस, हरीपंत फडके, परशुरामभाऊ, आपाबळवंत, व हुजरातचे घोरपडे, पाटणकर, दरेकर, निंबाळकर वगैरे मोठमोठे मानकरी मिळून वीस हजार फौज पुरंदरच्या पायथ्यास होती. तिसरी मोरोबादादा वगैरे चार हजार फौज तेथून दोन कोसांवर करा नदीच्या पाण्यावर राहिलेली होती. शिंद्यांचें या वेळचें कौशल्य लक्षांत ठेवण्याजोगें आहे. होळकराची फौज दहा हजार असून ते शूर, अनुभवी व हरहुन्नरी सरदार होते. त्यांशी लढाई करण्याचा नानाच्या पक्षांतिल सरदारांस प्रसंग येता तर त्यांस अमळ जड जातें यांत संशय नाहीं. एकदां हट्टास पेटल्यावर रक्ताचे पूर वाहविल्याशिवाय स्वस्थ बसणारे तुकोजी होळकर हे सरदार नव्हते. आज अडीच महिने शिंद्यांची वाट पहात नाना फडनवीस बसले होते तें उगीच नव्हे ! शिंदे हे होळकरांपेक्षांही जबरदस्त असून त्यांचें त्यांजवर पूर्वीपासून विलक्षण वजन होतें. हे मुत्सद्दी आपआपसांत भांडोत, मरोत वा कांहीं करोत; त्यासाठीं तुम्हा आम्हांत लढाई व्हावयास नको, अशी समजूत घालून त्यानीं त्यांस एकीकडे काढून नेहमीं आपणाजवळ राहविल्यानें होळकर शिंद्यांच्या आहारीं पडले. त्यानीं कांहीं गडबड इतउत्तर करावी असा संभवच राहिला नाहीं; त्यामुळें मोरोबाचें पाहिजे तसें पारिपत्य करण्यास नानाचा हात मोकळा झाला.

होळकर आपणास सोडून जाणार असें पहातांच मोरोबास कांहीं सुचेनासें झालें. त्यानीं नानास सांगून पाठविलें कीं, तुम्ही बापूस मिळवून घेतां, त्यापेक्षां मला मिळवून घ्याल तर त्यांत पुष्कळ फायदे आहेत. तुम्हा आम्ही एक होऊन सखारामबापूचें उच्चाटन करूं ! परंतु नानानीं या गोष्टीचा धिक्कार केला व शिंद्यासही ती आवडली नाहीं. मग मोरोबाचें पुनः दुसरें बोलणें शिंद्याच्या मार्फत नानाकडे आलें कीं, मला मिळवून घ्या, गतवर्षी तुम्ही ह्मणत होतां त्याप्रमाणें बापू, तुह्मी व आम्ही मिळून त्रिवर्ग कारभारी होऊं. पण बापू व नाना यानीं साफ सांगितलें कीं, हा आम्हांत नको. हा आम्हाशीं सुधेपणानें वागणार नाहीं व याचें व आमचें बनणार नाहीं. हेंहा बोलणें थकलें,

तेव्हां शिंदे होळकरांच्या द्वारें मोरोबांचें तिसरें बोलणें लागलें कीं, शिवनेरी किल्ला, जरीपटका व शिक्केकटयार एवढें मजकडे आहे तें तरी मजकडे राखावें. मी शिवनेरीस जाऊन स्वस्थ राहतों. परंतु आतां सरकारचा मरातब व सरंजाम तुम्हाकडे कांहींएक राहणार नाहीं, सर्व आमच्या हवालीं करून व आपले फौजेस निरोप देऊन दोनशें लोकांसह भीमातीरीं बहुल येथें तुम्ही जाऊन रहावें; तुह्मावर सरकारची चारशें स्वारांची चौकी राहील; याप्रमाणें नानांचा त्यांस स्पष्ट निरोप गेला. आपलें कांहींच चालत नाहींसें पहातांच मोरोबानीं मोठाच वीरश्रीचा आव घातला ! 'माझी समजूत काढा, नाहीं तर मरून जाईन, पण शिक्केकट्यार व जरीपटका देणार नाहीं;' असा त्यांचा नानास उलट निरोप आला ! बजाबा पुरंदरे व पांडुरंगराव बारामतीकर हेही मोरोबास ह्मणूं लागले कीं, आह्मी जिवास जीव देणारे तुमचे निदानचे सोबती आहों. तुमची व आमची कारभाऱ्यानीं कांहीं समजूत काढिली तर बरें आहे. नाहीं तर आह्मीही तुम्हाबरोबर सरकारच्या फौजेशीं लढाई करून मरून जाऊं. मानापेक्षां प्राणाची प्रतिष्ठा आम्ही मानित नाहीं. मरून गेलों तरी बेहत्तर, परंतु दीनवाणें होऊन नानापुढें करुणा भाकणें आमच्यानें होणार नाहीं ! ज्यांनीं जन्मास आल्यातागायत कधींच लढाई पाहिलेलीही नव्हती, अशा या सुखवस्तु त्रिवर्ग मुत्सद्यानीं वर सांगितलेल्या प्रकारें शिपाईगिरीची ऐट आणिलेली पहातांच शिंदे, फडके व पटवर्धन यांच्या फौजेंतील लोकांस हसूं कोसळलें असेल व चार दिवस तो एक टर उडविण्याचा विषय होऊन बसला असेल यांत संशय नाहीं ! आपल्याप्रमाणेंच आपले फौजेंतील लोक मरण्यास तयार आहेत कीं नाहींत हें पहाण्यासाठीं मोरोबादादानीं आपले फौजेंतील लोकांस जेवण घातलें. 'आपले मरणाचे सोबती असतील त्यानीं मात्र जेवणास यावें' ही जेवणाची शर्त होती. परशुरामभाऊ विनोदानें म्हणतात कीं, "हजार बाराशें पात्र भोजनास झालें, मग किती मरतात पहावें !" मोरोबाच्या एकीकडे या चेष्टा चालल्या होत्या आणि आंतून मुंबईस जावें अगर हैदरअलीकडे जावें, निदान शिवनेरीस तरी जाऊन बसावें, असे पलायन करण्याचे बेत चालले होते ! परंतु नानास सर्व बातम्या होत्या, त्यामुळें त्यांच्या हुकमावरून जूनच्या बाविसाव्या तारखेस हरीपंत व परशुरामभाऊ

प्रातःकाळीं तयार होऊन मोरोबाच्या गोटावर चालून आले. त्यांच्या फौजांतील तमाम मानकरी वीरश्रीनें धुंद होऊन 'कोठचा मोरोबा आणि कोठचा बजाबा! आतांच्या आतां मारून गर्दीस मेळवितों, लुटून फस्त करितों,' असें म्हणून पुढें पुढें जाण्याची गलबल करूं लागले. तें पहातांच मोरोबादादा गर्भगळित झाले व त्यानीं शिंदे होळकरांकडे तांतडीनें निरोपांवर निरोप पाठविले कीं, आतां तुम्ही उभयतां मध्यें पडून माझे प्राण मात्र वांचवा. दुसरें मी कांहीं मागत नाहीं. नाना सांगतील तेथें राहण्यास मी कबूल आहे! तेव्हां त्या सरदारांचा नानास निरोप आला कीं, आजचा दिवस सबुरी करावी. तुमच्या सांगण्याप्रमाणें उद्यां मोरोबा फौजेस निरोप देऊन जरीपटका व शिक्केकटयार तुमच्या हवालीं करून बहुलास जातील. मध्यंतरीं ते पळून गेल्यास त्याचा जिम्मा आम्हांकडे लागला. पण फडके व पटवर्धन यांचें एवढ्यावर समाधान होईना. शेवटीं शिंदे होळकरानीं आपले दिवाण बाळाराव गोविंद व नारो गणेश यांस हजार बाराशें निवडक लोकांसह मोरोबाच्या डेऱ्या भोंवतीं चौकीस बसविलें, तेव्हां हरीपंत व परशुरामभाऊ आपल्या फौजेसह गोटास परत आले. भाऊ लिहितात कीं, "सरकारची फौज चार घटका रात्रीस गोटास आली. बारा घटका रात्रीस भोजन जाहलें. सोमवार प्रदोषाचे दिवशीं इतका प्रकार झाला."

'इतका प्रकार झाला' तरी आणखी चार दिवस हा घोळ चालून शेवटीं ता० २० जूनचे दिवशीं जरीपटका व शिक्केकटयार नानाच्या हवालीं करून व फौजेस निरोप देऊन मोरोबादादा बहुलास गेले. तेथें गेल्यावर तरी स्वस्थ बसून रहावें तें न करतां त्यांच्या आणखी खटपटी सुरू झाल्या. तेव्हां नानानीं घाटबंधारीस कोळी लोकांचा दंगा सुरू झाला होता, तो मोडण्याच्या मिषानें फौज पाठवून मोरोबास तारीख १२ जुलई रोजीं बहुलाहून धरून आणून गुलटेंकडीवर बंदोबस्तानें ठेविलें. पुढें त्यांस कोठें तरी किल्ल्यावर ठेवावयाचें घाटूं लागलें, तेव्हां मोरोबाचें म्हणणें पडलें कीं मला मिरजेस ठेवावें. नानाच्याही मनांत तेंच होतें, पण भाऊनीं साफ सांगितलें कीं, त्यांस तेथें ठेवणार असल्यास आमच्या इतःपर स्वाऱ्या शिकाऱ्या थांबल्या! कारण कीं, मोरोबावर पहारा करण्याकरितां आम्हांस

घरीं बसून रहावें लागेल ! त्यामुळें नानानीं तो बेत रहित करून मोरोबादादास नगरच्या किल्ल्यास रवाना केलें. तेथें ते बावीस वर्षें कैदेंत होते.

याप्रमाणें मोरोबाची हकीकत झाली. पण त्यांच्या बंडांत सामील असलेल्या मंडळींचें पारिपत्य अद्यापि व्हावयाचेंच होतें. ते लोक होळकराच्या लष्करांत दडून बसले होते. त्यांस स्वाधीन करण्यासाठीं सरकारांतून ताकीद झाली असतां होळकर त्यांस बऱ्याबोलानें स्वाधीन करीनात, तेव्हां बलात्कारानें त्या लोकांस स्वाधीन करून घ्यावें लागलें. त्यासंबंधाची हकीकत परशुरामभाऊ देतात ती–" होळकराकडील कारभारी राजश्री नारो गणेश यानीं इतकें खूळ केलें, त्यांस पाठवून देणें, म्हणून होळकरांस सांगून पाठविलें. ते सुप्रवर्तीनें पाठवीनात, तेव्हां काल भृगुवारीं शिंद्यांच्या विचारें फौजेसहित तयार होऊन होळकराचे गोटाजवळ गेलों. तेव्हां त्यांसही समजलें कीं, निकर्षाचा प्रकार दिसतो. तेव्हां राजश्री महादजी शिंदे मध्यस्थ पडोन 'ज्यानीं लबाडी केली त्यांस धरून द्यावें व आपली निखालसता करून घ्यावी' असें निक्षून सांगितलें. फौजही उरावर उभी राहिली. तेव्हां नारो गणेश, गोपाळ नाईक तांबवेकर, आपाजीपंत गोंधळेकर, कचोबा पाळंदे, बाळाजीपंत दामले, दादोपंत बाघोलकर व बाबाजी जामदार निंबाळकर इतके लागलेच होळकरानीं हातीं धरून दिले. ..........ते सरकारांत आल्यानंतर फौज गोटास आली. इतकी असामी पहिल्यापासोन खेळांतील, याजकरितां साऱ्यांस सरकारांत आणिलें. याजउपर शक्तिनुसार 'हिरण्यश्राद्ध' होईल !!! हें पांच सात दिवस घाटत होतें. परंतु शिंदे मन घालून करितील किंवा कसें होईल हे संशय होते, यास्तव लिहिलें नाहीं. हल्लीं सिद्ध झालें यास्तव लिहिलें आहे." हा वृत्तांत ता. १० जुलईस घडला. खुद्द आपला दिवाण नारो गणेश व आपल्या आश्रयास येऊन राहिलेले इतर असामी यांस हवालीं करून देण्याविषयीं शिंद्यांच्या संमतीनें सरकारांतून आपणावर बळजबरी झाली याबद्दल तुकोजी होळकरांस फार वाईट वाटलें. त्यांचें समाधान करण्यासाठीं नाना व बापू व शिंदे असे तिघे मिळून होळकरांच्या डेऱ्यास गेले होते. भाऊ ह्मणतात कीं, हे त्रिवर्ग ' शिष्टाचार करून आले. ' अर्थात् होळकरांचें समाधान झालें नाहीं. या मोरो-

याप्रकरणीं होळकरांचा आशाभंग व मानहानि झाली त्याबद्दल त्यांच्या मनांत दोन वर्षे राग धुमसत होता !

बंडखोरांचें पारिपत्य करण्याचें काम एवढ्यावरच संपलें नाहीं. यापेक्षां आश्चर्य करण्याजोग्या धरपकडी अजून व्हावयाच्या होत्या व भाऊ ह्मणतात त्याप्रमाणें 'हिरण्यश्राद्धां'ची झोड उठावयाची होती ! कारण कीं ता. १२ जुलईच्या दिवशीं विसाजी कृष्ण बिनीवाले व नरसिंगराव धायगुडे यांच्या घरांवर शिंद्यानीं चौक्या बसवून त्यांस कैद करून आपल्या गोटास नेलें आणि हाणामार करून 'बोला !' ह्मणून तसदी लाविली. 'बोला' याचा अर्थ 'किती दंड देतां तें बोला' ! ते दोघेही मातब्बर सरदार. त्यांत बिनीवाले स. १७७१।७२।७३ सालीं मराठ्यांच्या रोहिलखंडावर स्वाऱ्या झाल्या त्यांत सर्व सेनेवरचे मुख्य अधिकारी होते. हेच शिंदे होळकर त्या वेळीं यांच्या हाताखालीं काम करीत होते त्या वेळीं शिंद्यांचीं व यांचीं भांडणें झालीं होतीं त्यांचें प्रायश्चित्त त्यांस आतां मिळालें ! भाऊंच्या लिहिण्यांत "विसाजीपंत बिनीवाले यांस तसदी फारच झाली. येथील अन्याय थोडा, परंतु शिंद्यांचा हिंदुस्थानांतलि रोष फार होता यास्तव असा प्रसंग पडला ! मातब्बर मनुष्य. इलाज नाहीं !" याशिवाय खासगीवाल्यांच्या घराण्यांतले आनंदराव, बळवंतराव व पांडुरंगराव हे तिघे असामी, सदाशिव रामचंद्र, बाळाजीपंत सप्रे, आणि शेवटीं खुद्द सखारामबापूंचे यजमान बजाबा पुरंदरे या सर्वांस शिंद्यानीं धरून कैदेंत ठेविलें. हे सर्व द्रव्यवान् गृहस्थ मोरोबाच्या खुळांत प्रमुख होते. हर्लीं नाना व शिंदे यानीं त्यांपासून जबर दंड घेऊन द्रव्यहीन करून पुनः ते असले खेळ कधींही न करितील असा पक्का बंदोबस्त केला ! खासगीवाल्यांकडे परशुरामभाऊंचें आजोळ होतें त्यामुळें त्यांस रदबदलींत पडणें प्राप्त झालें. भाऊ लिहितात, "इष्टमित्र, शरीरसंबंधी, श्रीमंतांचे अन्नानेंच वाढलेले, सेवाचाकरी न करितां घरीं बसल्यासही लाख दोन लाख रुपयांचा सरंजाम खाऊन श्रीमंतांचें कल्याण चिंतून सुखी राहीनात ! खेळ चुकेनात ! कारभारी आज पांच वर्षे सबुरी करीत आले. परिणाम नाहीं, तेव्हां राज्यकारभार करणाऱ्यास बंदोबस्त केल्याशिवाय उपाय नाहीं, म्हणून कारभारी उभयतांनीं निष्ठुरता धरिली

आहे. आम्ही समीर आहों म्हणून आप्त व स्नेही यांची मुरवत पडती तेव्हां सरकारांत जावें लागतें. बोलल्यासही आरोप न बोलल्यासही आरोप, असें प्राप्त झालें आहे. उपाय नाहीं. " भाऊंच्या रदबदलीमुळें त्या तिघा खाजगीवाल्यांची कैद मात्र चुकली. बाकी जबर दंड द्यावे लागून शिवाय सरंजाम खालसा व्हावयाचे ते झालेच. बाकीचे बिनीवाले, धायगुडे वगैरे गुन्हेगार होते त्यांचे सरंजाम गेले, दंड भरावे लागले आणि शिवाय जन्मभर कैदेंतही रहावें लागलें ! अपराध्यांवर कांहीं दया करावी म्हणून भाऊनीं वेळोवेळ खटपट केली; परंतु फंदफितुरी लोकांचा बींमोड करण्याचें नाना व शिंदे यानीं मनावर घेतलें असल्यामुळें भाऊंच्या रदबदलीस फारसें यश आलें नाहीं. नानानीं गोपाळ नाईक यास रायगडच्या किल्ल्यावर आणि बजाबा पुरंदरे यास चंदनचे किल्ल्यावर कैदेंत ठेविलें. धायगुडे हे पटवर्धनांचे फार दिवसांचे ऋणानुबंधी, सबब त्यांस मिरजेच्या किल्ल्यांत ठेवण्यासाठीं भाऊनीं आपणाकडे मागून घेतलें. मोरोबास पकडण्याच्या गर्दींत रघुपतराव नारायण व पांडुरंगराव बारामतीकर हे मोरोबास सोडून निमूटपणें परशुरामभाऊंजवळ येऊन उतरले होते, त्यामुळें शिंद्यांच्या क्रूर दृष्टीची बाधा त्यांस झाली नाहीं व हालअपेष्टा व्हावयाच्या तेवढ्या मात्र टळल्या. बाकी ' हिरण्य श्राद्ध ' हें झालेंच असेल. तें कोणासही चुकलें नाहीं !

या प्रसंगीं गोपाळनाइकापासून पांच लक्ष, बिनीवाल्यांपासून पांच लक्ष व नारो गणेश यापासून दहा लक्ष रुपये असे पराकाष्ठेचे जबर दंड घेण्यांत आले. रघुपतराव नारायण हे मोरोबाच्या फितुरांत सांपडल्यामुळें त्यांचा वाडिलांच्या जहागिरीवरचा हक्क उडाला. त्यानीं पोटगी खाऊन असावें, आतां नारो शंकराची सर्व जहागीर एकट्या त्रिंबकरावानीं उपभोगावी व पूर्वी ठरलेला दहा लक्ष रुपये नजराणा सरकारांत भरावा, असें ठरविण्यांत आलें. होळकरांच्या दिवाणगिरीची जागा रिकामी झाली होती त्या जागेवर पूर्वीचे दिवाण गंगाधर यशवंत चंद्रचूड यांचे पुत्र दादाजी गंगाधर यांची नेमणूक होऊन त्यांस होळकराच्या दिवाणगिरीचीं वस्त्रें श्रीमंतांकडून ता० ११ जुलईस देवविण्यांत आलीं. त्या वेळीं असें ठरलें होतें कीं, या नवीन दिवाणानीं दहा लक्ष रुपये सरकारांत नजराणा द्यावा व पंधरा हजार

फौज ठेवून दसऱ्यानंतर कर्नाटकचे स्वारींत सामील व्हावें ! कोणी-कडून तरी पुष्कळ द्रव्य जमा करून फौजेचें चार वर्षांचें तुंबलेलें देणें फेडावें व तिची उस्तवारी करून पुनः कर्नाटकची मोहीम करावी व हैदरअल्लीची चांगली रग जिरवावी इकडे नानांचें लक्ष लागलें होतें. मोरोबाचें खूळ पूर्वी राज्यास धोका आणण्यास कारण झालें होतें, पण आतां परिणामीं द्रव्य जमा करण्यास तेंच उत्तम साधन होऊन बसलें! गेल्या पांच चार वर्षांच्या अनुभवावरून पुण्यांत बखेडे कर-णारे लोक कोण कोण आहेत हें नानास माहीत झालें होतें. ते सर्व लोक मोरोबाच्या बंडाच्या जाळ्यांत आयते एकदांच सांपडल्यामुळें त्यांस द्रव्यहीन करून व कैदेंत टाकून पुण्यांत बखेडा होऊंच नये असा बंदोबस्त करण्यास ही त्यांस उत्तम संधी सांपडली. एकंदरीत हें मोरोबाचें शिराळशेटीचें राज्य फार जणांस भोंवलें म्हणावयाचें !

---

# प्रकरण अकरावें.

## दरबारची डळमळ.

जुलै महिन्यांत मोरोबाचें बंड मोडलें तेथपासून आक्टोबरपर्यंत पुणें दरबारची स्थिति कशी होती हें आतां या प्रकरणांत दाखवावयाचें आहे. अजून देखील ती स्थिति धोक्याची व काळजी उत्पन्न करणा-रीच होती, आणि त्यामुळेंच नाना फडनवीस यांस फार सावधपणानें वागावें लागत होतें व महादजी शिंद्यांची मर्जी सुप्रसन्न राखावी लागत होती. त्या महादजी शिंद्यांच्या मर्जीत वारंवार कसा फेरबदल होत होता हें भाऊंच्या लेखांवरून चांगलें कळतें. जुलै महिन्यांत ते म्हण-तात—" प्रस्तुत नानाचा सर्व भार मनसब्याविशीं राजश्री पाटीलबा-बांवर आहे. तेही मन घालून करीत आहेत. " पण आक्टोबरांत " प्र-स्तुत राजश्री नाना पाटीलबावांच्या ( मर्जीच्या ) साधनांतच आहेत, केवळ बिघडेल असें वाटत नाहीं, " इतकेंच त्यांस सांगतां आलें !

मोरोबाचें बंड मोडल्याबरोबर शिंद्यानीं आपल्या फौजेस रजा द्यावी ती दिली नाहीं. त्याचें कारण ते उघडपणें सांगत कीं, कारभाऱ्यांनीं

दहा लक्षांची जहागीर व अशीरगडचा किल्ला यांच्या सनदा पूर्वी कबूल केल्याप्रमाणें आम्हांस दिल्या आहेत खऱ्या, पण अशीरगड कोठें आमच्या हातीं आला आहे ! तो आल्याखेरीज आपण फौज दूर करीत नाहीं ! शिंदे फौजेस निरोप देईनात म्हणून होळकरही देईनात, आणि हे दोघे फौजबंद राहिल्यामुळें हरीपंततात्यांसही केवळ आपली सारीच फौज घरोघर लावून देतां येईना ! याप्रमाणें या बड्या लोकांची लीला चालली होती; पण त्यांच्या लष्करांच्या पायमल्लीमुळें पुण्याभोंवता पांच पन्नास कोस मुलूख ओसाड पडत चालला होता इकडे कोणाचेंच लक्ष जाईना ! रयतेचें धान्य, चिरगूट, भांडें हें तर हमेशा लुटलें जात होतेंच. पण त्याशिवाय जेथें दिसेल तेथून वैरण आणावी व लांकुडफांट्यासाठीं घरें मोडून आणावीं हा क्रम शिंदे होळकरांच्या फौजांचा गेले सहा महिने अव्याहत चालला होता ! पुणें प्रांतींची रयत उसासे टाकून म्हणे कीं, माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दींत इतक्या फौजा येथें आसपास उतरत असत, पण तेव्हां आमच्या गवताच्या काडीस देखील धक्का लागत नव्हता, आणि आतां आमचे गांवचे गांव नाहींसे होऊं लागले तरी दाद घेणारा कोणी राहिला नाहीं ! ! !

मोरोबादादांचें पारिपत्य झालें तेव्हां त्यांच्या सोबतीस आपली बजाबा पुरंदरे, दादोपंत वाघोलकर वगैरे देशस्थ मंडळी होती त्यांचा बचाव व्हावा असें सखारामबापूंच्या मनांत होतें, व तसें कांहीं वचनही त्यानीं शिंद्यापासून घेतलें असावें असें वाटतें. परंतु पुढें बापूंस कोणती गोष्ट आवडेल किंवा कोणती न आवडेल इकडे दुर्लक्ष करून नाना व शिंदे यानीं जेव्हां देशस्थ कोकणस्थ सारे गुन्हेगार सारखेच भरडून काढण्याची सुरुवात केली, तेव्हां ती गोष्ट बापूंस फार असह्य झाली. त्यांत गंमत अशी कीं, बापू मुख्य कारभारी असल्यामुळें शिंदे व नाना प्रत्येक गोष्ट करण्यापूर्वीं त्यांची परवानगी विचारीत. त्यांत पुष्कळ गोष्टी—उदाहरणार्थ बजाबा पुरंदऱ्यांस कैद करण्याच्या वगैरे—त्यांच्या मनास कडू वाटण्याजोग्या होत्या तरी शिंद्यांच्या जरबेमुळें त्यांस निमूटपणें रुकार द्यावा लागे ! देशस्थ काय आणि कोकणस्थ काय, आपले सारेच खेळगडी नानानीं डोंगरी किल्ल्याची हवा दाखविण्यास नेले, आतां आम्ही कोणाशीं कारस्थानें व खेळ खेळावे, असें वाटून सखारामबापूंस आतां चुकल्या चुकल्या-

साखें होऊन गेलें ! राज्यकारभारासंबंधें ते उदास उदास असे राहूं लागले, व त्यांचे पूर्वींचे कांहीं कांहीं चाळे पुनः दृष्टोत्पत्तीस येऊं लागले तेव्हां नानास काळजी उत्पन्न झाली. आणाशपथा झाल्या, बेलभंडार झाले, तरी बापूच्या वर्तनांत सरळपणा दिसत नाहींसें पाहून परशुरामभाऊ त्रासून लिहितात कीं, "कपी ( सखारामबापू ) तर राज्यास किडाच ईश्वरें निर्माण केला आहे ! ! !"

या दोन तीन महिन्यांत सखारामबापूवर विशेष बारीक रीतीनें नजर ठेवणें नानास अवश्य होतें. कारण कीं राज्यांतले फंद फितूर अद्यापि मोडले नव्हते, व बापूसारखा सूत्रें चाळविणारा भेटला तर अजूनही एखादें भयंकर बंड उत्पन्न होण्यास उशीर लागणार नाहीं असें त्यांच्या वारंवार निदर्शनास येत होतें. चिंतो विठ्ठलाचीं मुलें-माणसें पुण्यांत नजर कैदेंत होतीं तीं एके दिवशीं अकस्मात् मुंबईस पळून गेलीं. शिवनेरीस मोरोबादादांचा कारकून होता त्यानें घाटबंधारीचे कोळी उठवून राजरोसपणें लुटालूट करण्यास सुरुवात केली. त्याच सुमारास खुद्द पेशवे राहत होते त्या ठिकाणीं म्हणजे पुरंदर किल्ल्यावर गडकऱ्यांपैकीं कोळी लोक होते त्यांत फितूर उमगला. आणि त्याच वेळीं नगरच्या किल्ल्यांत मोरोबादादा कैदेंत होते त्यानीं किल्लेकऱ्यांस वश करून पळून जाण्याचा यत्न केल्याचें उघडकीस आलें ! तेथील अंमलदार माधवराव नारायण नगरकर यानीं तत्काळ चौकशी करून फितुरी लोकांस कडक शासनें केलीं व मोरोबांची कैद अधिक सक्तीची करून किल्ल्याचा बंदोबस्तही चांगला केला. हीं सारीं दुश्चिन्हें निरनिराळ्या ठिकाणीं एकाच वेळीं घडत होतीं तीं कांहीं आपोआप घडून येत नव्हतीं. अर्थात् या निरनिराळ्या प्रकारांनीं जागोजाग उद्भूत होणारा तो नगरचा ज्वालामुखी—मोरोबा दादा--- अद्यापि शांत झाला नव्हता !

तूर्तच्या काळीं राज्यावर ओढवलेलीं संकटें पुरेतशीं न वाटल्यामुळेंच जणु काय, महादजी शिंद्यानीं याच संधींत एक विक्षिप्तपणाचा खेळ केला ! क्षेत्र पैठण हें स्थळ निजामअल्लीच्या ताब्यांतलें होतें. त्या ठिकाणीं पाटीलबावांनीं फौज पाठवून मोगलाई सरकारच्या अंमलदारांस हुसकून लावून तेथें आपला अंमल बसविला व तेथील एका सावकारापासून पैसा लुबाडण्यासाठीं त्यास धरून आणिलें ! दक्षिणे-

कडे हैदरअल्लीनें धारवाडपर्यंत राज्य ग्रासीत आणिलें होतें, व त्याच्या फौजेची बिनी जमखिंडी, मुधोळ, तेरदाळपर्यंत नुकतीच दौड मारून परत गेली होती; उत्तरेकडून पुण्यावर चालून येण्याकरितां इंग्रजांचीं सहा पलटणें काल्पीच्या अलीकडे आलीं होतीं आणि पश्चिमेकडून स्वारी करण्याकरितां मुंबईच्या पलटणांचीही झपाट्यानें तयारी होत होती. अशा वेळीं पूर्वेकडचा शेजारी एकटा निजामअल्ली मात्र अमळसा मराठ्यांच्या बऱ्यावर होता. त्यासही नाखूष करून राज्यावर आणखी एक नवी संक्रांत ओढून आणणारे हे पाटीलबावा चतुर व धोरणी मुत्सद्दी होते कीं खेडवळ अकलेचे रानदांडगे खरोखरीचेच पाटीलबावा होते? पण पाटीलबावांच्या शहाणपणाबद्दल संशयच घ्यावयास नको. हा आडदांडपणा त्यानीं जाणून बुजूनच केला होता. नानाचें व निजामअल्लीचें सख्य होतें त्यांत बिघाड यावा आणि राज्यांत किंवा राज्याबाहेर नानाचें स्वतंत्र असें राजकारण कोणाशींही जुळूं नये, जें काय होणें तें फक्त आपले मार्फतीनें होत असावें, व नानानीं नेहमीं आपले मुठींत रहावें, याकरितां शिंद्यांची ही शक्कल होती! मोरोबांच्या बंडाची बातमी कळतांच 'तुम्हाकडून इशारा येतांक्षणींच आम्ही स्वतः पुरंदरास फौजेसह येऊन राज्याचा बंदोबस्त करून देतों' असा निजामअल्लीचा नानास निरोप आला होता तो शिंद्यांच्या स्मरणांतून गेला नव्हता!

पुणें दरबारांत आपला अधिकार निर्बाध चालावा म्हणून ज्याप्रमाणें नानाचे प्रयत्न सुरू होते, त्याप्रमाणें फौजही आपल्या लगामीं रहावी याविषयीं त्यांची खटपट होतीच. आज बरींच वर्षें सुरापूरच्या संस्थानिकानें खंडणी दिली नव्हती त्यामुळें ती वसूल करण्यास फौज पाठवावयाची होती व हीच फौज पुढें कर्नाटकांत जावयाची होती. सखारामबापूंच्या मनांत या फौजेवरची मुख्य सरदारी दुसरा कोणी न पतकरील तर भिवराव पानशे यांस देऊन त्यांची रवानगी करावी असें होतें. अर्थात् स्वारीच्या तयारीस आगाऊ पैका लागेल त्याची तजवीज ते करणार होते. नानांचाही पानशांवर विश्वास नव्हतासें नाहीं; पण पानशांच्या निमित्तानें फौजेच्या कारभारांत आपली मंडळी घुसवावी व फौज वश करून घ्यावी हें सखारामबापूंचें बकध्यान नाना जाणून होते. याकरितां दसऱ्यास स्वारी निघावयाची तों आधीं आगस्ट

महिन्यांतच नानांनीं परशुरामभाऊंस तगादा लाविला कीं, 'या स्वारीची मुख्य सरदारी तुह्मास देतों, खर्चासही थोडेंबहुत देतों, तुह्मी आतांच बाहेर निघून डेरे दाखल व्हावें व आपल्या तयारीस लागावें.' स्वारीची मुख्य सरदारी ही अधिकाराची व किफायतीची जागा. ती कोणास नकोशी असणार ! पण सरदारी पतकरणें ह्मणजे हाताखालच्या फौजेच्या रोजमुऱ्यास जबाबदार होणें. तें करून करून तर गेलीं दोन वर्षें परशुरामभाऊ अगदीं मेट्यास आले होते व सावकारांचें लाखों रुपये त्यांस देणें झालें होतें. त्या कर्जाची वाट अद्यापि सरकारांतून कांहींच लागली नव्हती. याकरितां आतां ही थोरली सरदारी आपणास नको असेंच भाऊ ह्मणत होते. पण नानानीं स्वतः भाऊंच्या घरीं खेपा घालून चार चार घटका बसून नानाप्रकारें आग्रह केला; तुह्मी जात नसल्यास मीच फौज घेऊन स्वारीस जातों, तुह्मी व हरीपंत मिळून येथील कारभार आटपावा, असेंही ते उरेंबुरें बोलूं लागले तेव्हां परशुरामभाऊंचा निरुपाय झाला. त्यांतही आणखी हरीपंततात्यानीं भीड घालण्याची पराकाष्ठा केली, त्यामुळें सप्टेंबरच्या अखेरीस परशुरामभाऊ एकदांचे बाहेर निघाले. भाऊंचा हुजूरकारकून लिहितो--"राजश्री हरीपंततात्यानीं नवमीच्या दिवशीं प्रातःकाळापासून अडीच तीन प्रहरपर्यंत बसोन खलबत केलें. भोजन मग केलें. उपोषितच बसले होते. हे ऐकेनात, यास्तव चार चार वेळां तात्यानीं पदर पसरून पायांवर डोई ठेवून बाहेर काढिलें ! ! !" भाऊंबरोबर जावयास बारामतीकरांची वगैरे किरकोळ पागा व हुजरातेपैकीं पाटणकर वगैरे पथकें व सरंजाम्यांपैकीं रास्ते, प्रतिनिधि व आनंदराव गोपाळ यांस नानानीं नेमिलें होतें. पैकीं सरंजामी भाऊंबरोबर न जातां पुढें लवकरच इंग्रजांची मोहीम उद्भवली तिकडे गेले. सरकारचा तोफखाना घेऊन राजाबा पानशे भाऊंच्या स्वारींत हजर होते व एकंदर फौजेची संख्या आठ हजारपर्यंत होती.

स्वारीस निघण्यापूर्वीं भाऊनीं पांडुरंगराव बारामतीकर यांस नानाकडून बारामतीस जाण्यास निरोप देवविला. पांडुरंगराव बारामतीकर यांचा गुन्हा थोडा, वय लहान, त्यांतून ते श्रीमंत दादासाहेबांचे जामात, शिवाय त्यांविषयीं भाऊंची रदबदली, या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन नानानीं त्यांचा गुन्हा माफ केला; आणि अडीचशें

स्वारांची पागा व अर्थात् तिच्या खर्चास पंचायशीं हजारांचा सरंजाम व बारामतीचें ठाणें त्यांजकडे होतें तें असें सर्व त्यांजकडे कायम ठेविलें. यासंबंधें भाऊ सप्टेंबरमधल्या एका पत्रांत लिहितात— " बाबूजी नाईक यांचे चिरंजीव श्रीमंतांचे जामात यांजकडे बारामती रहावी असें ठरून निरोप घेऊन गेले. चिरंजीव बयास पाठवावें ह्मणून ( त्यानीं ) बहुत आग्रह केला. नाइकांचें वर्षश्राद्ध पंचमीस आहे. यास्तव काळ लावून दिली. फिरोन दसरियास आणवितों."*

* वरील उताऱ्यांत भाऊंची थोरली कन्या बयाबाई हिचें नांव आलेलें आहे,त्या नांवामागें ' सौभाग्यवती ' हें उपपद नाहीं हें वाचकांनीं लक्षांत घ्यावें. जिचा पुनर्विवाह करण्याविषयीं परशुरामभाऊनीं रामशास्त्री यांची संमति मिळविली व काशीहून शास्त्रार्थ आणविला असें पुनर्विवाहवाद्यांचें ह्मणणें आहे, ती भाऊंची बालविधवा कन्या हीच होय. सन १७६१ त बयाबाईचा जन्म झाला. सन १७६८ त तिचें बाबूजी नाईक यांच्या मुलाशीं लग्न झालें व नंतर तिचा नवरा त्याच वर्षी वारला, इतक्या गोष्टी मात्र सरकारी कागदपत्रांच्या पुराव्यावरून सिद्ध होत आहेत. पण या पलीकडे १ बयाबाईचा पुनर्विवाह करण्याविषयीं भाऊनीं रामशास्त्र्यांस संमति विचारली, २ त्यानीं ती दिली, ३ भाऊनीं काशीहून शास्त्रार्थ आणविला, या तीन गोष्टींचा मागमूस मिरज, मळा, कुरुंदवाड व इचलकंजी या चार संस्थानांच्या जुन्या दप्तरांत आम्हांस कोठें मिळाला नाहीं, यावरून या गोष्टी निराधार आहेत असें सिद्ध होतें. एखादा यःकश्चित् पाटलानें कोठें बारीकसारीक पुंडावा केलेला असला तर त्याबद्दल मळासंस्थानच्या दप्तरांत पांचपंचवीस ठिकाणीं उल्लेख सांपडतात आणि ह्या तर अशा प्रसिद्ध मनुष्यानें साऱ्या ब्राह्मणजातीविरुद्ध केलेला पुंडावा; याविषयीं कोठें एक शब्दही लिहिलेला नसावा हें आश्चर्य नव्हे काय ? यावरून या गोष्टी मुळीं घडल्याच नाहींत हें स्पष्ट आहे. शिवाय या गोष्टी घडण्याचा संभवही नव्हता असें आह्मांस दोन कारणांवरून वाटतें. पहिलें कारण असें कीं, बयाबाईचें लग्न झालें तेव्हां ह्मणजे स. १७६८ त भाऊंचें वय सारें एकुणतीस वर्षांचें होतें. त्या वेळीं मुख्य सरदारी थोरले चुलतबंधु गोपाळराव गोविंद यांजकडे असून फक्त त्यांचे हाताखालीं भाऊनीं सरदारीचें काम करावयाचें असे. घरच्या कारभारावर देखरेख करण्यास गोविंद हरि व त्रिंबक हरि हे दोघे चुलते हयात होते व मातोश्री जानकीबाई ही होती. बयाबाईचें लग्नही गोपाळरावानीं ठरविलें, भाऊनीं नव्हे. त्यांजकडे लष्करी किंवा घरगुती कोणत्याही कामाचा यजमानपणा अजून आलेला नव्हता. अशा स्थितींत ते असला उद्योग वडिलांच्या मर्यादेचा भंग करून करितील हें संभवत नाहीं. दुसरें कारण असें कीं, परशुरामभाऊ हे मोठे धर्मनिष्ठ व आचारसंपन्न होते हें त्यांच्याच लेखांतून शेंकडों उदाहरणें दाखवुन सिद्ध करतां येईल. तेव्हां आपल्या मुलीचा पुनर्विवाह करावा असें त्यांच्या मनांत परमार्थतः येणें हेंच मुळीं विसंगत दिसतें; मग तसें करण्याची प्रवृत्ति तर दूरच राहिली ! सदरहू गोष्टी सन १७९० त घडल्या असें कोणीं लिहिलेलें आहे तें अगदींच बाष्कळ आहे. त्यावेळीं बयाबाई एकुणतीस वर्षांची होती व तिचें लग्न होऊन बावीस वर्षें झालीं होतीं !!

या चातुर्मास्यांत पुणे दरबारीं कर्नाटकच्या मसलतीसंबंधें बरीच वाटाघाट झाली. तिकडच्या पटवर्धन व रास्ते यांच्या जहागिरी व धारवाडचा सुभा आतां हैदरअल्लीनें बळकाविला होता हें मागें दर्शविलेंच आहे. हा मुलूख त्यापासून परत घेण्याचें आतां एकट्या पेशवे सरकारांत सामर्थ्य राहिलें नव्हतें. कारण कीं या सुमारास इंग्रजांशीं बिघाड होण्याचा रंग दिसत असल्यामुळें एकाच वेळीं हैदर व इंग्रज या दोघांशीं लढाई सुरू ठेवणें दुरापास्त होतें. गतवर्षीं हैदर ह्मणत होता कीं, तुमच्या व आमच्या राज्याची सीमा तुंगभद्रा नदी असावी. तुमचा त्या नदीच्या दक्षिणेस असलेला मुलूख आह्मीं घेतला आहे व तुमच्या संरक्षणाखालीं असलेलीं तिकडचीं संस्थानें आह्मीं घेतलीं आहेत त्यांविषयीं तुह्मीं बोलूं नये. सालाबादप्रमाणें तुमची खंडणी देतों. पण त्या वेळीं पुणें दरबारास निजामअल्लीच्या मदतीची धमक होती व इंग्रजांचा शिलशिला बंद झालेला होता, ह्मणून त्यानीं तें बोलणें नाकारिलें होतें. हल्लीं निजामअल्लीच्या मदतीचा कांहीं उपयोग होत नाहीं असें दोन वर्षांच्या अनुभवावरून कळून चुकलें व इंग्रजांशीं पुनः लढाई होण्याचा सुमार दिसूं लागला तेव्हां कारभारी वर सांगितलेला तुंगभद्रेचा तह करण्यास कबूल झाले. पण आतां हैदर तुंगभद्रेचें नांव सोडून घटप्रभा व मलप्रभा यांचीं नांवें घेऊं लागला! पावसाळा झाल्याबरोबर नाना व बापू यानींच फौज घेऊन कर्नाटकांत जावें व शिंदे होळकर या उभयतानीं—निदान दोघांतून एकानें तरी— कारभाऱ्यांबरोबर जावें, अशी कांहीं दिवस चर्चा चालली होती; आणि परशुरामभाऊ स्वारीस निघाले तेव्हां असेंही ठरलें होतें कीं, भाऊनीं सुरापूरची मोहीम आटपून कर्नाटकांत उभयतां कारभाऱ्यांस येऊन मिळावें. परंतु पुढें मुंबईस इंग्रजांची तयारी पुण्यावर स्वारी करण्यासाठीं होत आहे अशी पक्की बातमी आली, तेव्हां पुणें सोडून कर्नाटकांत जाणें कारभाऱ्यांस प्रशस्त वाटलें नाहीं. त्यानीं शिंदे होळकरांस कर्नाटकची मोहीम पतकरण्याचा आग्रह केला तेव्हां ते वांटणीचा करार आगाऊ करावा असें बोलूं लागले. नाना म्हणाले कीं, मोहिमेचा फायदा म्हणून तुंगभद्रेपलीकडे जितका मुलूख व पैका मिळेल त्याची निम्मे वांटणी देण्याचा निजामअल्लीशीं तह पूर्वींच झालेला आहे, त्याप्रमाणें त्यास वांटणी दिली पाहिजे. न

द्यावी तर तो खेळ करण्यास चुकणार नाहीं. आतां निम्मे वांटणी सरकारांत राहील त्यांतला हिस्सा तुम्हांस देऊं. पण तो पेश्याचा देऊं, मुलुखाचा देणार नाहीं. पण हें बोलणें शिंदे होळकरांच्या मनास येईना. पटवर्धन रास्ते वगैरेंच्या जहागिरी धारवाडप्रांतीं आहेत त्या हैदर घेतो त्यापेक्षां शिंदे होळकरच कां घेईनात, असें मनांत आणून नाना त्यांकडे त्या जहागिरी कांहीं शर्तींवर ओपून देण्यास तयार होते. पण तेंही म्हणणें त्यांस मान्य झालें नाहीं. पुढें इंग्रजांशीं लढाई सुरू झाल्यामुळें तूर्त सर्वच वाटाघाट बंद पडली.

---

# प्रकरण बारावें.

## इंग्रजांचा पराजय.

मे महिन्याच्या अखेरीस मुंबई सरकारानें विचारिलेल्या सवालांस पुणें दरबाराकडून उत्तरें गेलीं त्यांत फ्रेंच लोकांशीं आम्हीं कोणताही करार अगर तह केलेला नाहीं असें स्पष्ट म्हटलें होतें. तथापि त्या सरकारास तें खरें वाटलें नाहीं. आपला नाश करण्यासाठीं नानानीं फ्रेंच लोकांशीं कांहीं तरी गुप्त रीतीनें तह केलेला आहे हीच त्यांची अद्यापि समजूत होती. 'पुरंदरच्या तहाच्या शर्ती तुम्ही पाळणार कीं नाहीं' असा मुंबई सरकारानें जो शिरजोरपणानें सवाल विचारिला होता, त्यास पुणें दरबाराकडून उत्तर 'त्या तहाच्या शर्ती तुम्ही पाळा म्हणजे आम्ही पाळूं' असें आलें तें त्यांस अर्थातच आवडलें नाहीं. पेशवाईचा कारभार नाना फडनवीस यांच्या हातीं आहे तो त्यांजकडून काढावा, आणि दादासाहेबांची मुख्याधिकारावर स्थापना करावी, हा बेत मुंबई सरकारच्या मनांत रात्रंदिवस घोळत होता. ही गोष्ट सामोपचारानें घडून न येईल तर लढाई करून बळजबरीनें तडीस नेण्याची त्यांच्या मनांत खुमखुम होती; आणि ज्या अर्थी मोरोबा वगैरे मंडळी त्यांस अनुकूळ होण्याजोगी होती त्या अर्थी त्यांची ती खुमखुम अगदींच निरर्थक होती असें म्हणतां येत नाहीं. अशा स्थितींत जूनच्या प्रारंभीं मोरोबादादाकडून चिंतो विठ्ठल मुंबईस घाई-घाईनें आले व दादासाहेबांस घेऊन पुण्यास चला असें म्हणूं लागले;

परंतु मोहिमेचे दिवस निघून गेल्यामुळें दसरा होईपर्यंत मुंबई सरकारास स्वस्थ बसणें भाग पडलें. पुढें मोरोबा कैदेंत पडल्याची व शिंद्यांच्या द्वारें होळकरांची समजूत होऊन ते नानास अनुकूल झाल्याची बातमी मुंबईस येऊन धडकली, त्या वेळीं मि. मॉस्टिन् व दादासाहेब यांनी मुंबईचे गव्हर्नर व कौन्सिलर यांची समजूत घातली कीं, मोरोबादादा कैदेंत पडले तरी भिण्याचें कारण नाहीं. कारण कीं, मर्जीस वाटेल तेव्हां सुटका करून घेऊन त्यांस आपणाकडे निघून येतां येण्याजोगें आहे! होळकरानीं नानाशीं सख्य केलें हें खरें, पण त्यानीं तसें न करावें तर काय करावें? दसरा झाल्यावर आपण फौजेसह घांटावर जाऊं तेव्हां होळकर आपलेच आहेत. मोरोबा व त्याचे सोबती हेही संधि साधून आपणाकडे निघून येतील. नंतर जुलईपासून सप्तंबर अखेरपर्यंत पुण्यास काय काय चाललें आहे याचा मुंबई सरकार बारकाईनें तपास करीत होतेंच. त्यांत त्यांस असें दिसून आलें कीं, सखारामबापूचें नाना व शिंदे यांशीं वांकडें, होळकराचें नानाशीं वांकडें, शिंद्यांचा नानावर रुसवा, शिंदे होळकर यांचें परस्परांविषयीं मन शुद्ध नाहीं, कोणाचें कोणाशीं जुळत नाहीं व कोणी कोणास जुमानीत नाहीं; दक्षिणप्रांतीं हैदराचा धिंगाणा चालूच आहे. पैठण वगैरेसंबंधाच्या भानगडीमुळें निजामअल्ली अद्यापि नाखुषच आहे, याप्रमाणें दरबारची व राज्याची दुर्दशा आहे. ती स्थिति पाहून मुंबई सरकारास फार हुरूप आला. आपण घांट चढून जाण्याचा अवकाश कीं, आपले सर्व मनोरथ परिपूर्ण झालेच; याप्रमाणें त्यांस व श्रीमंत दादासाहेबांस वाटूं लागलें. तीन वर्षांपूर्वी गुजराथेंत हरीपंत फडक्यांशीं इंग्रजांच्या लढाया झाल्या होत्या तेव्हांपासून मराठ्यांच्या मर्दुमीबद्दल मुंबईकर इंग्रजांच्या मनांत तिरस्कार—बुद्धि उत्पन्न झाली होतीच, त्यांत अर्धें राज्य आपणास आगाऊ अनुकूळ आहे, अर्धें प्रतिकूल आहे तें सुद्धां आपापसांतल्या वैमनस्यामुळें दुर्बल झालें आहे; याकरितां आपणास मराठ्यांशीं झगडारगडा करण्याचा प्रसंगच येणार नाहीं, नुसता लढाई करण्याचा आव घातला म्हणजे शत्रूवर दरारा बसून ते पळून जातील व पुण्यास जाण्याचा मार्ग आपणास खुला करून देतील, असा मुंबई सरकारचा ग्रह होऊन बसला! वारन् हेस्टिंग्स्

यांच्या हुकुमावरून बंगालखात्याचीं सहा पलटणें त्यांच्या कुमकेस येत होतीं त्यांचीही वाट त्यांनीं पाहिली नाहीं; सर्व यश आपणच घ्यावें अशी हांव धरिली, आणि नोव्हेंबरच्या अखेरीस आपली चार हजार फौज निर्धास्तपणें पुण्यावर रवाना केली ! त्या फौजेबरोबर दादासाहेब, त्यांचे पुत्र अमृतराव व दिवाण चिंतो विठ्ठल हेही निघाले. स्वार व गारदी मिळून दोन हजारपर्यंत फौज व कांहीं तोफा असा सरंजाम त्यांजबरोबर होता. हें इंग्रजी लष्कर इतक्या सावकाशीनें चालत होतें कीं, मुंबईहून निघाल्यापासून बोरघांट चढेपर्यंत त्यांस पक्का एक महिना लागला !

चार महिन्यांपूर्वी पुण्यावर स्वारी करण्याचा बेत मुंबईचे गव्हर्नर व कौन्सिलर यांनीं पक्का केला तेव्हां तो बेत गुप्त राखावा असा त्यांचा ठराव झाला होता. परंतु मुंबईस दररोज काय वर्तमान घडत होतें, तेथील 'कौसल' व 'शिलेट' ( select ) कमिटींत काय काय मसलती चालल्या होत्या, हें गुप्त हेरांच्या द्वारें नानास तात्रडतोब कळत असे. त्यामुळें पुढें येणाऱ्या अरिष्टाचें निवारण करण्यास त्यांस स्वस्थपणें तजविजी योजितां आल्या. सालमजकुरीं इंग्रजांशीं युद्ध खचित होणार असें पक्कें कळल्याबरोबर त्यांनीं प्रथम महादजी शिंद्यांस पूर्णपणें अनुकूल करून घेतलें. पूर्णपणें ह्मणण्याचें कारण, कांहीं ताजा नैवेद्य दाखविल्याशिवाय पाटीलबावांची मर्जी सुप्रसन्न होईना, याकरितां त्यांस सरकारांतून बऱ्हाणपूर द्यावें लागलें ! दादासाहेबांचें राजकारण अद्यापि होळकरांकडे गुप्तपणें घाटत आहे ही नानांस बातमी होतीच. शिवाय सखारामबापूविषयीं त्यांस पक्का संशय होता. त्यामुळें हें इंग्रजप्रकरण कोणत्या थरास जाईल ही त्यांस मोठी काळजीच होती. पण आतां शिंद्यांशीं पूर्णपणें निश्चय झाल्यामुळें सर्व काळजी दूर झाली. नानानीं जें जें ह्मणावें तें तें सिद्धीस जाऊं लागलें. शिवाजीपंत लिहितो, " हुजरातीस पैका नाहीं, याकरितां सरंजामदार यांनीं निम्मे सरंजामाची बेरीज सरकारांत द्यावी असा ठराव झाला. रास्ते, प्रतिनिधि, आनंदराव गोपाळ व उभयतां कारभारी सरंजामीच आहेत, त्यांसुद्धां निम्मे निम पैका सरकारांत घेतला. निम्मे पैका देऊन शिवाय कराराप्रमाणें फौज बाळगावी येणेंप्रमाणें ठरलें ! होळकर शिंदे यांनीं पंधरा पंधरा लक्ष द्यावे, त्यांत

पांच पांच लक्ष तूर्त द्यावे, येणेंप्रमाणें ठराव झाला. राहिल्या सरंजामीयांस तगादा करून दारीं माणसें बसवून पैके घेतात." शिंद्यांचें पाठबळ असल्याशिवाय नानाचा कारभार इतक्या सुयंत्रपणानें चालला नसता! सखारामबापूनीं बाह्यात्कारें संमति देऊन सरंजामी सरदारांस आंतून पैका न देण्याविषयीं चिथावून देण्यास कधी केलें नसतें! कारण कीं पूर्वीं त्यानीं असे अनेकदां केलें होतें. परंतु हल्लीं शिंद्यांच्या भयामुळें त्यांस साळसूदपणानें वागावें लागत होतें.

दसरा झाल्यावरोबर आपापली फौज जमा करून पुण्यास येण्याविषयीं नानानीं सरदार मंडळीस ताकीद केली होती त्याप्रमाणें फौज जमा होत चालली. शिंदे होळकरांची फौज बहुतेक जमून तयारच होती. रास्ते, प्रतिनिधि व आनंदराव गोपाळ परशुरामभाऊंकडे जावयाचे होते त्यांस थांबवून धरून नानानीं इंग्रजांच्या मोहिमेवर नेमिलें. शिंदे पंधरा हजार, होळकर सहा हजार, हुजरात दहा हजार, इतर पथकें चार पांच हजार, शिवाय भिवराव पानशांचें तीन हजार निवडक पायदळ, मिळून एकंदर सुमारें चाळीस हजार सैन्य या मोहिमेवर रुजू झालें. तोफा मारण्याच्या कामांत इंग्रजांची बहादुरी पूर्वींपासून प्रसिद्ध आहे. भिवराव पानशे हे पेशवे सरकारच्या तोफखान्यावरचे मुख्य अम्मलदार असल्यामुळें तोफा मारण्यांत इंग्रजांवर सुद्धां ताण करून लौकिक मिळवावा ही त्यांस ईर्ष्या होती. त्यामुळें या मोहिमेकरितां तोफांचा व बाणांचा सरंजाम त्यानीं फारच चांगला तयार केला होता.

इंग्रजांची बिनी म्हणजे अघाडीची टोळी घेऊन इष्टुर फांकडा (Captain Stuart) घांट चढून वर आला. पेशवाईंत तीन फांकडे प्रसिद्ध आहेत. पहिला कोन्हेर फांकडा. हा कोन्हेर त्र्यंबक एकबोटे नांवाचा एकांड्या शिलेदार होता. दुसरा मानाजी फांकडा. याविषयीं पूर्वीं वर्णन आलेंच आहे. तिसरा हा इंग्रजी अम्मलदार इष्टुर फांकडा. 'फांकडा' ही पदवी ज्यानें शूरत्वाची अगदीं कमाल करून दाखविली असेल त्यासच मिळत असे. इष्टुर फांकडा हा शत्रुपक्षाकडील असतांही त्याच्या शौर्याबद्दल मराठ्यानीं प्रांजलपणें साक्ष भरावी हें त्यांस भूषणावह होय! असो. तर याप्रमाणें हा इष्टुर फांकडा घांट चढून वर येतांच भिवराव पानशांची व त्याची गांठ पडून झगडा

झगड सुरू झाली. रोज चार सहा घटका तोफातोफी होऊन केव्हां त्यानीं यांस तर केव्हां यानीं त्यांस मागें सारावें, याप्रमाणें चार दिवस चाललें होतें. इतक्यांत तळेगांवास रामचंद्र गणेश व बाजीपंत अण्णा येऊन राहिले होते ते पानशांच्या मदतीस आले. तेव्हां तिकडून इष्टुर-फांकड्याच्या मदतीस इंग्रजांची सर्वच फौज दादासाहेबांसुद्धां घांटा-खालून आली. ती बातमी येतांच उभयतां कारभारी शिंदे होळकर-सुद्धां वानवडीवर होते ते तळेगांवच्या रोंखें आले. अघाडीस शिंदे, मध्यें होळकर, व पिछाडीस हुजरातसुद्धां नाना फडनवीस, सखारामबापू व हरीपंत फडके याप्रमाणें व्यवस्थेनें ही मराठी फौज इंग्रजांच्या मुकाबल्यास आली. होळकरांस मध्यें घालण्याचें कारण ते इंग्रजांकडे पळून जातील म्हणून!!! इतकें होतें तों तिकडून इंग्रजही तोफा वगैरे भारी सामान व बुणगें बरोबर घेऊन हलक्या मजली करीत व पानशांशीं लढत लढत तळे-गांवास आले.

हल्लींच्या मोहिमेंत लढाई कशी होईल याचा अजमास इंग्रजांनीं गुजराथच्या स्वारीवरून बांधिलेला होता, परंतु त्या वेळच्या व हल्लीं-च्या स्थितींत मोठेंच अंतर होतें हें त्यांच्या लक्षांत आलें नाहीं! त्या वेळीं दादासाहेब व गोविंदराव गायकवाड मिळून निदान पंचवीस हजार मराठी फौज इंग्रजांच्या मदतीस होती ती नित्य दाणविरण मिळवून आणीत असल्यामुळें त्यांस पोटाची पंचाईत कधींच पडली नव्हती. हल्लीं अशी घोडेस्वारांची फौज मदतीस नसल्यामुळें सर्व ल-ष्करास महिना दोन महिने पुरेल अशी नित्योपयोगी व ऐषआरा-माची सुद्धां शिधासामग्री त्यांस बरोबर बाळगावी लागली होती. ही शिधासामग्री नेण्यास गाडे, छकडे, तट्टें, बैल वगैरे असंख्य लागले होते! शिवाय डेरे, राहुट्या, तोफा, दारूगोळा हें सामान ने-णारीं जनावरें, पुनः इतक्या जनावरांस सांभाळणारीं माणसें, असें हें एकं-दर अपरंपार लटांबर जमलें होतें! एवढें हें लटांबर संभाळणें, वाट चालणें व शत्रूशीं लढणें हीं तिन्ही कामें चार पांच हजार इंग्रजी पायदळानें एकाच वेळीं करावयाचीं होतीं! आणि तीही चपळ व हिय्ये-बाज अशा चाळीस हजार शत्रूंसमक्ष! गुजराथच्या स्वारींत इंग्रजांशीं हरीपंताची फौज लढत होती ती उपाशीं, उदासीन, किंबहुना फितु-रानें अर्धीमुर्धी ग्रासलेली होती. हल्लींची मराठी फौज मराठी राज्याच्या

प्रत्यक्ष राजधानीवर इंग्रज चालून येत असल्यामुळें अभिमानानें व एकदिलानें लढण्यास तयार होती व जेथें लढाई होणार तो सारा मुलूख तिचा स्वदेशच होता. तींत एक दोन जागीं फितूर होता हें खरें, पण त्याचा बंदोबस्त आगाऊच झाला होता. मुख्य गोष्ट मोहिमेचा सर्व भार नानानीं महादजी शिंद्यांवर टाकिला असल्यामुळें युद्धाच्या सर्व तरतुदी शिंद्यांच्या तंत्रानें होत होत्या, आणि इंग्रजांस पराजित करण्याची शिंद्यानीं प्रतिज्ञा केली होती! ती प्रतिज्ञा ते पूर्ण करितील असा त्यांच्या कर्तृत्वासंबंधें सर्व सरदारांचा भरंवसा होता. इंग्रज घांटमाथ्यावर होते तेव्हांच सुरापूरच्या स्वारींतून परशुरामभाऊनीं लिहिलें होतें कीं, " इंग्रज बळावत चालले, त्यांच्या पारिपत्याची तजवीज सरकारांतून कशी होत नाहीं, म्हणून (तुम्हीं) लिहिलें; त्यास राजश्री महादजी शिंदे यांची निष्ठा श्रीमंतांचे पायांशीं चांगली आहे. दुसरा प्रकार किमपि नाहीं. त्यानीं इंग्रजांचें पारिपत्य खामखा करावें हीच हिंमत धरिली आहे. प्रस्तुत इंग्रज जी जागा बळावून आहेत ती जागा अडचणीची आहे यास्तव शिंदे त्यांवर चालून जात नाहींत. ती जागा सोडून इंग्रज मैदानांत यावयाची वाट पहातात. खालीं मैदानांत येतांच गांठ घालोन पारिपत्य करितील."

वर सांगितलेल्या गोष्टींचा प्रभाव इंग्रजांच्या अनुभवास घांट चढल्याबरोबर येऊं लागला. ते तळेगांवास येतपर्यंत भिवराव पानशानीं त्यांस एक दिवस देखील चैन पडूं दिलें नाहीं. नित्य लढाईशीं प्रसंग पडत असे. खंडाळ्यास लेफ्टनंट कर्नल के बाण लागून जायां झाला व कारल्याच्या मुक्कामीं तोफेचा गोळा लागून इष्टुर फांकडा मेला. आणखीही शें दोनशें नामी माणूस इंग्रजांच्या बाजूचें पडलें. मराठे प्रकरणीं माहीतगार मि. मॉस्टिन् स्वारीबरोबर होता तो दुखण्यानें मेला. या सर्व गोष्टींमुळें इंग्रजांचा कांहींसा हिरमोड झालाच होता. त्यांत आणखी निराशेची भर पडत चालली. तुम्हाशीं लढण्यास फौज जमा करणें हेंच मुळीं नाना फडनविसांच्यानें होणार नाहीं असें मुंबईहून निघतांना मि. मॉस्टिन् यानें सांगितलें होतें, पण आतां नाना फडनविसानीं आपणाशीं लढण्याकरितां प्रचंड सैन्य जमा केलें आहे अशी इंग्रजी फौजेवरच्या मुख्य अंमलदारास बातमी

३१ दिसेंबर.

४ जानेवारी १७७९.

लागली. घांट चढल्याबरोबर वीस हजार फौज तुह्माकडे येईल असें चितो विठ्ठलानें सांगितलें होतें त्याप्रमाणें कोणी आले नाहीं गेले नाहीं ! होळकरानीं अनुकूळ होण्याचें वचन दिलें होतें, पण ते आतां ह्मणूं लागले कीं, तुमची फौज फार थोडी असल्यामुळें तुह्मास यश येणें कठिण दिसतें. मी तुह्मास मिळाल्यानें तुमचा फायदा न होतां माझा मात्र नाश होईल; याकरितां मला तुह्माकडे येतां येत नाहीं. स्वारीबरोबर शिधासामग्री आणिलेली होती ती आतां सरत आली होती. मुंबईहून पुरवठा व्हावा तर मराठ्यांची वीस हजार फौज कोंकणांत उतरून बोरघांटाच्या पायथ्यापासून पनवेलपर्यंत पसरली होती तिनें मुंबईचें दळणवळण बंद केलें होतें.

अशा संकटांत इंग्रज तळेगांवानजीक येतात तों मराठ्यांची फौज त्यांच्या दृष्टीस पडली. त्या फौजेवर महादजी शिंदे व हरीपंत फडके मुख्य सरदार होते. मराठ्यानीं इंग्रजांवर तोफांचा मारा केला तेव्हां इंग्रजानींही तोफा सुरू केल्या. मराठ्यानीं वेगानें हल्ला करण्याचा डौल दाखविला तों त्यांवरच इंग्रज लढाईच्या तयारीनें चालून गेले. पण मराठ्यांस मुळींच लढाई करावयाची नसल्यामुळें ते मागें सरकून उभे राहिले व पुनः तोफा मारूं लागले ! इकडे याप्रमाणें अघाडीस लढाईचा मोहरा दाखवून त्याच वेळीं कांहीं टोळ्या इंग्रजी लष्कराच्या मध्य भागाच्या आसपास घिरट्या घालीत होत्या आणि कांहीं पिछांडीस बुणगें होतें त्यावर लगट करूं पहात होत्या ! परंतु त्या सर्वांस मोठ्या कष्टानें हुसकून लावून आपलें बुणगें वगैरे लटांबर आंवरून इंग्रज बंदोबस्तानें तळेगांवांत शिरले. लगेच मराठेंही कोस दोन कोसांच्या अंतरानें भोंवतीं गराडा देऊन राहिले. इंग्रज तळेगांवांत जातात तों तेथें एक देखील माणूस किंवा गुरूं त्यांच्या दृष्टीस पडलें नाहीं आणि मूठभर धान्य किंवा वैरणीची पेंढी हेंही दृष्टीस पडलें नाहीं ! सर्व गांव जळून भस्मसात् झाला होता ! पुण्यापर्यंत वाटेंतलीं सर्व गांवें व खुद्द पुणें शहरही याचप्रमाणें जाळून फस्त करण्याविषयीं नानानीं तजवीज केल्याची बातमी इंग्रजांस लागली. ती बातमी अगदीं खरी होती. पुण्यांतलीं सर्व माणसें सामानसुमानसुद्धां बाहेर लावून देऊन नानानीं शहर रिकामें

९ जानेवारी.

करून ठेविलें होतें व शनवारवाड्यांत कडवाही भरून ठेविला होता! शिंदे होळकरांचें मत पुणें जाळूं नये असें होतें, पण श्रीमंत दादासाहेबांविषयीं व इंग्रजांविषयीं नानाचा द्वेष निस्सीम होता. त्यानीं निर्धार केला कीं, इंग्रजांच्या जोरावर श्रीमंत पुण्यास येणार तर येवोत; पण नांदती राजधानी मी त्यांच्या हातास लागूं देणार नाहीं. पुण्याची राख रांगोळी करीन. मग राखेच्या पुंजीवर बसून श्रीमंतानीं खुशाल राज्य करावें! इंग्रजांनीं तळेगांवाहून पुढें कूच करितांच पुण्यास आग लावण्याचें नानानीं ठरविलें होतें. तें वर्तमान ऐकून इंग्रजांस दहशत वाटली. तळेगांवाजवळ येतांच महादजी शिंद्यानीं लढाईचा जो थोडासा मासला दाखविला त्यावरून हें गनिमी काव्याचें झोंबट एक दोन झुजांत सुटणारें नसून महिनो महिने सुरू रहाणार, अशा स्थितींत आपण हट्टानें पुढें जावें तर उपासानीं हैराणगत होऊन आपली सबंध फौज मराठे कैद करितील किंवा मारून नाहींशी करितिल, अशी इंग्रजांची खात्री झाली; त्यामुळें त्यानीं मुंबईस परत जाण्याचा निश्चय केला.

नंतर वरील निश्चयास अनुसरून ता० ९ जानेवारीच्या रात्रीं आपल्या मतें शत्रूस चाहूल लागूं न देतां ते हळूच परत निघून वडगांवाकडे चालले. परंतु मराठ्यांच्या चौक्या त्यां भोंवती दाट बसल्या होत्या त्यांस तत्काळ ती चाहूल लागून त्यांनीं वर्दी देतांच सारीच फौज धांवून आली. त्या फौजेशीं लढत लढत इंग्रज उजाडतां वडगांवास पोंचले तों मराठ्यांनीं त्यांस फारच घाबरें केलें. शिवाजीपंत लिहितो— 'इंग्रजांचा मोड झाला. चार पांचशें माणूस मारिलें. पांच, तोफा व दोन गरनाळा सरकारांत पाडाव आणिल्या.* शिवाय दोन हजार बंदुखा वगैरे लूट सांपडली." अशी दुर्दशा झाल्यामुळें भयभीत होऊन इंग्रज वडगांवांत शिरले तों मराठ्यानीं येऊन गराडा दिला. तो सबंध दिवस मराठ्यांनीं इंग्रजांवर तोफांचा भडिमार व बाणांचा वर्षाव केला, आणि दुसरे दिवशीं प्रातःकाळीं स्वार व पायदळ मिळून हल्ला केला. तो हल्ला इंग्रजांनीं मर्दुमीनें लढून मोठ्या शर्थीनें मागें हटविला तों दुसऱ्या हल्ल्याची तयारी झाली. तेव्हां या-

* मराठ्यांनीं तोफा व गरनाळा घेतल्याचें इंग्रज इतिहासकार लिहीत नाहींत.

उपर आपला निभाव लागत नाहींसें पाहून इंग्रजांनीं शिंदे व नाना व बापू यांजकडे सांगून पाठविलें कीं, आमचा इलाज थकला. आह्मी शरण आलों. आह्मांस परत जाऊं द्यावें. या युद्धाची हकीकत आह्मी बहुतेक शिवाजीपंताच्या पत्रांच्या आधारानें दिली आहे, याकरितां पुढील वृत्तांत त्याच्याच शब्दानीं येथें दाखल करूं. तो ता० २२ जानेवारीच्या पत्रांत लिहितो— " इंग्रज वडगांवावर जात तोंच फार करून लुटले गेले. पुढें परिणाम नाहींसें समजोन थैली पाठविली कीं, (या) पत्राचें उत्तर येतांच भल्या माणसास पाठवूं. तेव्हां (इकडून )पत्राचें उत्तर गेलें. त्यांजकडून भला माणूस आला. त्यानें लिहून पाठविलें त्याजवरून ( इंग्रजांकडून ) यखत्यारी आला. त्याचें नांव मेस्तर होम-( Mr. Holmes ) त्याणें ठराव केला कीं, " साष्टी, उरण व जंबूसर वगैरे गुजराथचे महाल सरकारचे व गायकवाडाकडील घेतले आहेत त्यांसुद्धां झाडून सोडून देऊन श्रीमंत नानासाहेब व माधवराव साहेबापासून तहनामा चालत आला त्याप्रमाणें चालवें. श्रीमंत राजश्री दादासाहेबांस हवालीं करून द्यावें. कलकत्याहून ( बुंदेलखंडांत ) कंपू आले आहेत त्यांस (इकडून )दस्तक द्यावें ह्मणजे ते परत जातील."- येणेंप्रमाणें ठराव झाला. साष्टी वगैरे ठाण्यांसाठीं इष्टुर फांकड्याचा पुतण्या ( Lieutenant Charles Stuart ) ओलीस राहिला. आणि दुसरा फरमार ( Mr. Farmer ) म्हणून इंग्रजच. येणेंप्रमाणें ओलीस राहिले.…………………… ( इंग्रज ) इतके दमानें आले असें असतां असें कसें जाहलें असें आपण म्हणतील, त्यास मुख्यत्वें श्रीमंतांचें पुण्य विचित्र, अवतारी पुरुष, त्यासारखे योग घडले ! ज्या माष्टीमानें ( मॉस्टिन् यानें ) मसलत केली तो घांटावर येतांच समाधान नाहीं म्हणून मुंबईस गेला तेव्हां मृत्यु पावला. इष्टुर फांकडा मोटा लढाव, तो गोळा लागोन ठार झाला. कर्णेल की ( Lieutenant Colonel Kay ) ह्मणून होता त्यास बाण लागोन जेर झाला. आकारिक होते त्यांची अशी अवस्था झाली. इकडून फौज तिकडे येईल म्हणून ( त्यांस ) भरंवसा होता, ( पण ती ) फौज मिळाली नाहीं. इकडील फौजेंत देण्या घेण्याचा दंगा, यास्तव फौज ( एकत्र ) मिळणार नाहीं असा त्यांचा समज; त्यास उभयतां सरदारसुद्धां पन्नास हजार फौज जमा झाली. चोंहोंकडून फौजांचे भार पहातांच

छाती तडकली; तेव्हां माघारें कूच केलें. सारांश श्रीमंतांचा प्रताप हें खरें !!! शिवाय ता १७ जानेवारीच्या पत्रांतही या संबंधें उल्लेख आहे तो—" इंग्रजांकडील वकिलांचें बोलणें चालणें ठरलें. श्रीमंत राजश्री दादासाहेबांस हवालीं करावें, दादासाहेबांपासून तहनामे वगैरे दस्तऐवजी कागदपत्र ज्या ज्या समयीं घेतले आहेत ते ( इंग्रजांनीं ) माघारे द्यावे, याप्रमाणें ठराव होऊन परस्परें करारनामे जाहले........ श्रीमंत राजश्री दादासाहेब आज अमावास्या ह्मणून न आले. उदईक शिंद्यांच्या गोटांत येणार. उभयतां कारभारी यांचें मानस भेटी न घ्यावी असें आहे. तसेंच घडेल. ( दादासाहेबांचा ) पाहिजे तसा बंदोबस्त शिंदे याणीं करावा. बंदोबस्ताचा हवाला शिंद्यांकडे. सारांश श्रीमंत राजश्री रावसाहेबांचें पुण्य विचित्र ! इंग्रज ह्मणजे सर्वांस मसलतीविशीं भारी. नबाब ( निजामअल्ली ) व हैदरखान वगैरे सर्वांस त्याची आंच. अशाचें पारिपत्य जसें ह्मणावें तसें झालें ! "

वर सांगितल्याप्रमाणें ठराव झाल्यावर दादासाहेब इंग्रजांस सोडून शिंद्यांचे गोटांत येऊन राहिले. त्यांबरोबर तीनशें स्वार, बारातेराशें गारदी व तेरा तोफा असा सरंजाम होता. श्रीमंतांच्या गोटाभोंवती शिंद्यांच्या चौक्या दुरून दुरून होत्या. त्यांबरोबर चिंतो विठ्ठल व माजी पेशव्यांच्या मारेकऱ्यांपैकीं खरकसिंग म्हणून होता त्या दोघांस शिंद्यांनीं निराळें कैदेंत ठेविलें. इंग्रज कूच करून मुंबईस परत गेले.

याप्रमाणें या मोहिमेची समाप्ति झाली. उभयतां कारभाऱ्यांनीं शिंद्यांच्या विद्यमानें श्रीमंत दादासाहेबांपासून इतउत्तर राज्याच्या मालकीशीं आपला कांहीं एक संबंध राहिला नाहीं, अशा अर्थाचें बेदावापत्र लिहून घेतलें. नंतर सखारामबापूनीं आपली कन्या पंतसचिव यांच्या मुलास देण्याचें ठरविलें होतें तो लग्न समारंभ उरकण्यासाठीं ते तळेगांवाहून वाईस गेले. त्यांनीं व नानांनीं दादासाहेबांची भेट घेण्याचें टाळिलें ते टाळिलेंच !

---

# प्रकरण तेरावें.

---

## बापूंच्या कारकीर्दीचा शेवट, वगैरे.

श्रीमंत दादासाहेब लबाड व विश्वासघातकी आहेत, त्यांचें आह्मांस दर्शनसुद्धां नको, त्यांचा बंदोबस्त करण्याचा व पोटापाण्याची व्यवस्था करण्याचा जिमा शिंद्यांकडे लागला, ते यासंबंधें जी तजवीज योजितील ती आह्मांस कबूल आहे, असें बोलून उभयतां कारभाऱ्यांनीं श्रीमंतांविषयीं द्वेष, तिरस्कार व अनास्था दाखविली. चिंतो विठ्ठल व खरकसिंग यांस आमचे स्वाधीन करा, आह्मी त्यांचें पारिपत्य करणार, असें त्यांचें शिंद्यांकडे बोलणें सुरू झालें, या गोष्टी दादासाहेब व चिंतो विठ्ठल यांच्या मनास फारच झोंबल्या. श्रीमंतांस नानाबद्दल कांहींच ह्मणतां येण्याजोगें नव्हतें. परंतु आपण शिंद्यांच्या गोटांत येऊन आठ पंधरा दिवस झाले तरी सखारामबापूंनीं आपली कांहीं विचारपूस न करितां मुलीच्या लग्नास निघून जावें हा अपमान त्यांस सहन झाला नाहीं! चिंतो विठ्ठलासही सखारामबापूचा सोंवळेपणा चवाठ्यावर आणावयाचा होताच. तो शिंद्यांस ह्मणाला कीं, मी फितुरी म्हणून जर मला कैदेंत टाकणार तर तुह्मी याच अपराधाबद्दल हीच शिक्षा सखारामबापूस कां करूं नये? कारण तोही मजप्रमाणेंच फितुरी आहे हें मी तुम्हास दाखवून देतों! श्रीमंतांस विचारितां त्यानींही ती गोष्ट खरी आहे असें सांगितलें. मग त्या मतलबी पाटीलबावानीं गोडगोड भाषणें करून त्यांच्या पोटांत शिरून बापूचे दस्तऐवज त्यांजजवळ होते तेवढे काढून घेतले! हे दस्तऐवज ह्मणजे बापूच्या हातच्या दोन चिठ्या, इंग्रज घांट चढून आल्यावर एक चिंतो विठ्ठलास व दुसरी दादासाहेबांस लिहिलेली अशा होत्या. चिंतो विठ्ठलाची चिठी—"विनंति उपरी. दक्षिणेकडे (हैदरअल्लीकडे) सूचना केली आहे. आम्ही पाय पसरून बसलों आहों. अशांत जलदी कराल तितकी उपयोगी आहे!" अशी होती. श्रीमंतांच्या चिठींतही हाच मजकूर होता. या चिठ्या हातीं आल्यावर शिंद्यांनीं चोंहींकडे स्थिरस्थावर होईपर्यंत हें प्रकरण असेंच दाबून ठेविलें.

इंग्रज गेल्यावर एक महिनाभर लष्करचा मुक्काम तळेगांवावर होता. मुलीचें लग्न करून बापू परत आले ते तेथेंच आले. नंतर दादासाहेबांचें पुढें काय करावें ही चर्चा निघाली. तेव्हां असें ठरलें कीं, दरसाल पांच सात लक्ष रुपये खर्चास घेऊन श्रीमंतांनीं झांशी येथें रहावें. तेथें शिंद्यांनीं त्यांचा बंदोबस्त ठेवून पुन्हां त्यांबद्दल दरबारांत बोभाट येऊं देऊं नये. हें काम शिंद्यांनीं पतकरलें खरें, परंतु कारभाऱ्यांनीं कांहीं नैवेद्य दाखविल्याशिवाय त्यांचें काम ऐकूं नये हा त्यांचा शिरस्ताच होता. त्यास अनुसरून ते तकरार सांगूं लागले कीं, श्रीमंतांचा बंदोबस्त राखण्याकरितां मला झांशीस नेहमीं दोन हजार स्वार बाळगावे लागतील. त्या स्वारांचा खर्च मीं कोठून द्यावा? याप्रमाणें ते अडून बसले, तेव्हां त्यांच्या इच्छेप्रमाणें झांशी प्रांतीं भांडर म्हणून चार पांच लक्ष रुपये उत्पन्नाचा तालुका नानांनीं त्यांस जहागीर देऊं केला तेव्हां पाटीलबावांची समजूत झाली! नंतर श्रीमंत दादासाहेबांची स्वारी स्वतःचा लवाजमा, तोफा व गारदी सुद्धां झांशीकडे रवाना झाली. त्यांबरोबर शिंद्यांनीं आपला हरी बाबाजी नांवाचा सरदार दोन हजार स्वार देऊन पाठविला. शिंद्यांजवळ कैदेंत सरकारचे गुन्हेगार होते त्यांपैकीं खरकसिंगास मात्र त्यांनीं सरकारच्या हवालीं केलें व नानांनीं त्या मारेकऱ्यास देहांत शासन केलें. पण बाकीचे दोन गुन्हेगार म्हणजे मोरोबास धरिल्या वेळीं पकडलेला सदाशिव रामचंद्र व नुकताच हातीं आलेला चिंतो विठ्ठल यांस शिंद्यांनीं सरकारचे हवालीं न करितां आपणाजवळ ठेवून घेतलें. ते दोघे गुन्हेगार नानांच्या हातीं येण्यास दोन वर्षें लागलीं. पण ते हातीं येतपर्यंत त्यांनीं शिंद्यांस अशीरगड दिला नाहीं! असो. हे सर्व कारभार आटपल्यावर फौजेस निरोप देऊन उभयतां कारभारी व शिंदे होळकर तळेगांवाहून कूच करून पुरंदराजवळ येऊन राहिले.

फेब्रुवारी.

मार्च.

राज्यांतील फंद फितूर मोडण्याचें सत्र महादजी शिंदे व नाना फडनवीस यांनीं वर्षभर सुरू केलें होतें त्याची पूर्णाहुति होण्याची आतां वेळ आली. सखारामबापूंच्या फितुरी चिठ्यांचा मजकूर शिंद्यांनीं नानास कळविला. नंतर दोघांचें खलबत होऊन बापूंस कैद करण्याचें ठरलें. मग महादजी

एप्रिल.

शिद्यांनीं पुरंदरास जाऊन सखारामबापूंस त्यांच्या हातच्या चिठ्या दाखविल्या आणि तत्काळ कैद करून सिंहगडास रवाना केलें ! सखारामबापूंचा व पटवर्धनांचा द्वेष बहुत दिवसांचा. असें असतांही त्यांस कैद केल्याचें वर्तमान ऐकतांच परशुरामभाऊनीं त्यांविषयीं जें मत दिलें आहे तें आज मितीच्या लोकांसही न्याय्य वाटेल. ते लिहितात--" गोष्ट वाईट जाहली. चांगला कर्ता पुरुष होता. परंतु वेळ न जात, यामुळें हें प्राप्त झालें. होणार सुटत नाहीं ! " सखारामबापू व मोरोबादादा यांचा जवाहीर वगैरे वित्तविषय लोकांकडे ठेवी होत्या त्यांसुद्धां गोळा करून नानानीं सरकारी जामदारखान्यांत ठेविला आणि पागेकडील घोडीं वगैरे अजबाब होता तोही सरकारी कामाकडे लाविला.

वैशाख शु. ५ ता. २१ मे या दिवशीं श्रीमंत सवाई रावसाहेब यांची मुंज पुणें मुक्कामीं झाली. त्या वेळीं त्यांच्या वयास पांच वर्षें पुरीं होऊन गेलीं होतीं. नानानीं मुंजीचा समारंभ थाटाचा करविला होता. या समारंभास शिंदे होळकर हजर असल्यामुळें फार शोभा आली होती. येथपासून पेशवे पुणें येथें नेहमीं राहूं लागले, त्यामुळें राजधानीची जागा मध्यें पांच सहा वर्षें पुरंदर किल्ला होती ती आतां पुनः पुणें शहर झालें.

' अधिकारयोग' अथवा ' नानाफडनविसांस राज्याधिकार मिळाल्याचा इतिहास' एवढा वेळ वर्णन कारण्यांत आला, आणि येथेंच हें पुस्तक संपलें. हें पुस्तक वाचतांना मुख्यत्वें नाना व महादजी शिंदे या दोनच व्यक्ति डोळ्यांसमोर उभ्या राहतात. यांत श्रेष्ठ कोण हें आतां ठरविण्याचा यत्न करूं. शिद्यांचें पाठबळ न मिळतें तर नानाच्या हातीं राज्याधिकार आला नसता, आणि आला असता तरी शिंदे प्रतिकूल झाले असतां तो राहिला नसता, यावरून नानापेक्षां महादजी श्रेष्ठ असें दिसतें. परंतु अशा रीतीनें ही श्रेष्ठता ठरवावयाची नाहीं. स्वार्थत्याग, देशाभिमान, व स्वामिभक्ति वगैरे सद्गुणांच्या कसोटीस कोण कितपत उतरले हें पाहूनच ही श्रेष्टता ठरविणें योग्य आहे. तसा विचार केला तर शिंद्यांपेक्षां नाना श्रेष्ठ ठरतात. कारण कीं, स्वार्थसाधनाच्या इच्छेमुळें आपल्या शीलापासून शिंदे वेळोवेळ पराङ्मुख झाले व त्यापासून राज्याचें मोठें नुकसान झालें. नानाच्या संबंधें तसें कोणासही म्हणतां येणार नाहीं. त्यानीं एकदां ज्या कार्याचा अवलंब केला तें

कार्य तडीस नेण्यासाठीं मरेपर्यंत आपलें तन मन धन वेंचिलें. शिद्यानीं तीतयाचें बंड मोडिलें, करवीरकरांस जेरीस आणिलें, मोरोबाचें खूळ मोडिलें, इंग्राजांचा पराजय केला, दादासाहेबांच्या बंदोबस्ताचें जोखीम पतकरलें व बापूस कैद केलें; या फार मोठ्या कामगिऱ्या त्यानीं केल्या हें खरें; पण आधींपासून जर ते दादासाहेबांस इंग्रजांकडे जाऊं न देते, तर या कामगिऱ्या करून दाखविण्याचें कारण तरी त्यांस कशाला पडलें असतें ? पंधरा लक्षांची जहागीर, अशीरगड व बऱ्हाणपूर घेतलें तेव्हां त्यानीं हीं कामें केलीं. निरपेक्ष बुद्धीनें राज्याची सेवा केलेली यांतली कोणतीच नाहीं. तेव्हां यामुळें नानापेक्षां शिद्यांची योग्यता कमी ठरते. जेथें शिद्यांची योग्यता कमी ठरते, तेथें त्या काळच्या इतर प्रमुख राजकीय पुरुषांची कमी ठरेलच. त्यांविषयीं बोलावयासच नको ! त्या सर्व राजकीय पुरुषांचीं चित्रें आम्हीं या पुस्तकांत रेखाटलीं आहेत व त्यांच्या इच्छा, द्वेष, लोभ, क्रोध इत्यादि मनोविकार व तदनुसार घडलेल्या त्यांच्या कृति, त्या कृतींचे राष्ट्रावर झालेले परिणाम, हे सर्व दाखवून दिलें आहे, तेव्हां याविषयीं ज्याचें त्यास मत ठरवितां येण्याजोगें आहे.

नानाच्या हातीं शिद्यानीं राज्याधिकार आणून दिला हें खरें, पण नाना म्हणजे केवळ आपण बनविलेलें मेणाचें बाहुलें असून वाटेल तो आकार त्यास आपण देऊं असें जें शिद्यांस वाटत होतें तो त्यांचा भ्रम यानंतर लवकरच दूर झाला ! गेलीं तीन साडेतीन वर्षें नानांस शिद्यांच्या ओंजळीनें पाणी प्यावें लागलें, तेव्हां त्यानीं अनन्यगतिक होऊन राज्याच्या कल्याणावर नजर देऊन तसेही दिवस काढिले. परंतु ते स्वाभिमानी असल्यामुळें जन्मभर शिद्यांचीच मनधरणी करून अधिकार चालवावा ही गोष्ट त्यांस अर्थातच आवडण्याजोगी नव्हती. रोग्याच्या प्रकृतींत घटके घटकेस चढउतार करून पैका उपटणाऱ्या दुष्ट वैद्याप्रमाणें शिद्यांची वृत्ति असल्यामुळें त्यांची मदत आतां पुरे; तीशिवायच आपणास राज्य चालवितां येतें कीं नाहीं हें पाहूं या; असा विचार करून नानानीं मुत्सद्दी व सरदार यांस अनुकूळ करून घेऊन व परकी राजांकडे स्वतंत्रपणें राजकारणें राखून राज्यांत आपला बोज रहावा व अधिकार चालावा असें धोरण धरिलें. तें शिद्यांस न खपल्यामुळें या दोन तेजस्वी पुरुषांत स्पर्धा उत्पन्न झाली;

व एकमेकांचे एकमेकांवर चातुर्याचे डावपेंच सुरू झाले. ते दिवस मराठी राज्याची अभिवृद्धि होण्यास प्रतिकूल होते. 'खूब शर्तीनें राज्य राखण्यांतच' नानाचा जन्म गेला. त्या राज्यरक्षणाच्या कामीं त्यांच्या प्रेरणेवरून पुढें इंग्रज, टिपू व निजामअल्ली यांशीं मोठमोठीं युद्धें होऊन मराठ्यांस यश आलें. नानांच्या स्वतंत्र कारकीर्दीत बहुतेक अंशीं राज्यांत शांतता होऊन रयतेस सुख झालें व राज्य कारभारांत निरनिराळ्या खात्यांची व्यवस्था लागून ती सुयंत्रपणें चालूं लागली. या सर्व गोष्टी फार मनोरंजक व बोधप्रद आहेत. परंतु त्यांचा समावेश नानाच्या चरित्राच्या उत्तरार्धांत होतो, याकरितां त्यांचा विचार येथें करण्याचें कारण नाहीं. पूर्वार्धाबद्दल आम्हांस काय लिहावयाचें होतें तें लिहून झाल्यामुळें येथें आमचें काम संपलें. आतां वाचकांचा निरोप घेतांना एवढेंच कळवून ठेवितों कीं, नानाच्या चरित्राचा उत्तरार्ध जो राहिला आहे त्याचाही विचार असेंच एक स्वतंत्र पुस्तक लिहून आम्ही करणार आहों.

